1975 (शके 1897)



रु. 17.00

मूळ बंगाली नाव—पूर्ण कुंभ
Poorna Kumbha (Marathi)

वितरक :
पॉप्युलर प्रकाशन
35-सी, ताडदेव रोड, मुंबई 34 डब्ल्यू. बी. 400 034

प्रकाशक :
संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया, ए-5 ग्रीन पार्क,
नवी दिल्ली 110 016

मुद्रक :
सयद इस्हाक, संगम प्रेस लिमिटेड, 17 ब कोथरूड,
पुणे 411 029

# भूमिका

बंकिमचंद्र चट्टोपाध्याय यांच्या साहित्याची चांगली ओळख होण्यापूर्वीच, पूर्वीच्या बंगाली मुलामुलींची मने बंकिमचंद्रांचे वडील बंधू संजीवचंद्र चट्टोपाध्याय यांनी आकर्षून घेतली होती. ही गोष्ट एखाद्या परप्रांतीय माणसाने ऐकली तर त्याला आश्चर्य वाटणे अगदी साहजिक आहे; शालेय पाठ्य पुस्तकांतील जी काही मोजकी निवडक अशी थोडी वाक्ये सामान्य शिक्षित बंगाली लोकांच्या मनांत कायम ठसली त्यांपैकी काही पुढीलप्रमाणे आहेत. "वन्य असती वनात सुंदर, शिशू शोभती मातृकडेवरी "," बंगवासीच तेवढे सज्जन; शेजारी मात्र पापी","ऋषीच्या आश्रमा-शेजारी शेजाऱ्याला बसवा, तीन दिवसांत ऋषीचं ऋषित्व लयाला जाईल"... इत्यादी. 'पालामौ'मध्ये संजीवचंद्र ज्या गावाच्या प्रवासाला घेऊन जातात ती गावे आमच्या शेजारच्या प्रांतांत तर सापडत नाहीतच पण त्या जागा भूगोलामध्येही नाहीत. तरीसुद्धा 'पालामौभ्रमण' या पुस्तकाला जी आश्चर्य वाटण्यासारखी प्रसिद्धी मिळाली, त्यावरून असे वाटते की रामनाथ विश्वास यांचे भूपर्यटन म्हणजे त्याच्या-पुढे अगदी काहीच नाही.

बंगाली लोक घरकोंबडे असतात, त्यांना घरांतून अंगण म्हणजे जणू 'परदेशगमन'च वाटते. बंगालमधे कधीही मेगॅस्थेनिस किंवा ह्युएनत्सँग जन्माला आला नाही, हे सर्वांना माहीत आहेच ! तरी व्यक्तिस्वभावाप्रमाणे प्रांतीय स्वभावातही फरक असतोच की ! नाहीतर बंगाली लोकांनी अतीश दीपांकरला केवळ पंडित म्हणूनच एवढा मान दिला असता का ? हा बौद्ध पंडित हिमालयातील दुर्गम अशी वाट पायी चालत तिबेटला गेला होता ही गोष्ट बंगाली लोक मोठ्या अभिमानाने सांगतात. एकीकडे प्रपितामहांनी लावलेल्या आम्रवृक्षाची छाया त्यांच्या सात पिढ्यांतील जन्म, मृत्यू, विवाहादी गोष्टींची साक्ष देते, त्याचप्रमाणे समारंभाच्या वेळी ठसे उम-टवलेल्या भिंती बंगाल्यांच्या भटक्या मनाला गावाची सीमा ओलांडून फार दूर जाऊ

देत नाहीत. असे असले तरी गेल्या शतकातील इंग्रजी शिकलेले बंगाली नागरिक डॉक्टर किंवा शिक्षक म्हणून, तर कधी परकीय सरकारचे दाक्षिण्यपूर्ण सहचर किंवा अनुचर म्हणून सर्व भारत देशात पसरले होते. त्याशिवाय प्राचीन काळापासून वृद्ध स्त्रीपुरुष दूर हिमालयावर तीर्थयात्रेसाठी जात असतच. परंतु गृहप्रेमी बंगालीसुद्धा भावुकच म्हणायचा. दूरच्या देशाची आवड असलेला; मात्र घरात बसूनच दूरच्यांसाठी तहानेलेला ! म्हणूनच तर गेल्या शतकातील संजीवचंद्रांचे 'पालामौ' इतके लोकप्रिय झाले.

नाही म्हटले तरी समाज सुसंस्कृत झाल्यानंतरच 'पालामौ' प्रकाशित झाले होते. जे ज्ञात नाही ते समजून घेण्याचे बंगाली लोकांचे कुतूहल आणि त्याचा आनंद या दोन गोष्टींमुळे एकोणिसाव्या शतकात ते लोक प्रशंसेला पात्र झाले होते. परंतु राजशाही, पाबना, फरीदपूर, नोआखाली, चट्टग्राम ही गावे कलकत्तावासियांना फार दूर होती का ? नद्या असलेल्या या जागा तशा काही अगम्य नव्हत्या. तरी पण त्यांच्या लिखाणावरून असे वाटते की ईश्वर गुप्तांनी जणू काय मोठी बहादुरी केली होती ! 'पालामौ' प्रकाशित होण्याच्या पंचवीसएक वर्षे अगोदरच 'संवाद प्रभाकर'च्या संपादनाचे काम तात्पुरते स्थगित करून ईश्वर गुप्त पर्यटक झाले होते तेव्हा त्यांच्याच वृत्तपत्रांतून त्यांची प्रवासवर्णने – 'भ्रमणकारी बोंधूर पत्र' (प्रवासी मित्राची पत्रे) – गौड जनांनी (बंगाली लोकांनी) मनापासून वाचली होती. 'कोण म्हणतो ईश्वर गुप्त आहे, ईश्वर तर चराचर व्यापून आहे' असे स्वभावसिद्ध अहंकाराने ईश्वर गुप्त एकदा म्हणाले असले तरी ते चराचर म्हणजे "उत्तर बंगालचा एक अंश आणि पूर्व बंगालचा दुसरा अंश" एवढेच होते. नदीपथांवरून भ्रमण करणाऱ्या या संपादक महाशयांनी निरनिराळ्या उपयुक्त वर्णनांबरोबरच मनोरंजक आणि आश्चर्यकारक अशी कितीतरी वास्तव वर्णने दिलेली आहेत. ...... "मडमा ज्या पिसांचे पोषाख घालतात, जी पिसे त्या डोक्यावर धारण करतात, त्या पक्ष्यांच्या पिसांचा धंदा इथे पाबन्याला मोठ्या प्रमाणावर आहे." ...... "कलकत्त्याची बोट नोआखालीला पोचायला ८-१० दिवस उशीर झाल्यामुळे "कलकत्ता ट्रेझरीमधे पाठवायचा खजाना – सुमारे आठ लक्ष रुपये पेटीबंद होऊन कोषागारात पडून राहिला आहे. दोन वेळा त्या पेट्यांवरले गोणते वाळवींनी खाऊन टाकले. तिसऱ्यांदा पुन्हा एकदा त्यावर गोणते लावले आहे. आतासुद्धा काय होणार ते सांगता येत नाही." "भुलुयारजवळ असलेल्या सन्दीप या ठिकाणी अनेक ब्राह्मण आहेत, ते सर्वत्र मिसळू शकत नाहीत. ते मागासलेलेच राहिले आहेत

त्याचे कारण पूर्वी इथे एक मुसलमान राजा होता. विवाहाच्या बाबतीत जातीचा विचार करायचा नाही, असा त्याने नियम केला होता. वर सुंदर आणि गौरांग असेल तर त्याचा विवाह सुंदर व गौरांगी कन्येबरोबरच झाला पाहिजे. "या राजाच्या न्याय व शासनानुसार ब्राह्मण–शूद्र हा विचार तर दूरच; ब्राह्मण-मुसलमानांत विवाह झाला होता". "बारिसालमधल्या दुर्गेच्या मूर्तीचे वैचित्र्य म्हणजे तिच्या डाव्या अंगाला गणेश व उजव्या अंगाला कार्तिक आहे. दुर्गोत्सव १५ रुपयांपासून ४० रुपयांपर्यंत सहज पार पडतो". "बारिसालला एक आणा दक्षिणा मिळत असेल तर ब्राह्मण शूद्राच्या घरी जेवतात." कुठलाही आनंदाचा प्रसंग असू दे, या प्रदेशातील स्त्रिया उच्च स्वरात जोराने हुलुध्वनी[1] करतात. इथे या हुलुध्वनीला 'जोकार' म्हणतात." कदाचित कोलंबसलादेखील रेडइंडियन लोकांविषयी यापेक्षा चमत्कृतिपूर्ण माहिती गोळा करता आली नसेल. चट्टग्रामविषयी ईश्वर गुप्तांनी पुढील मजकूर लिहिला आहे : "परंतु या प्रदेशातील लोकांचा सर्वोत्तम गुण म्हणजे इथे कनिष्ठ जातींतील स्त्रियादेखील बाजारहाट, रस्ता, घाट अशा ठिकाणी बाहेर पडत नाहीत."

"भ्रमणकारी बोंधूर पत्र" या पुस्तकाला बंगाली साहित्यात जे एक विशिष्ट स्थान प्राप्त झाले ते त्यांतील आधुनिक वर्णनशैलीमुळेच. परंतु या पुस्तकापेक्षा पुष्कळ प्राचीन असूनदेखील मानवी मूल्ये व वास्तवता या गुणांच्या दृष्टीने पाहता अत्यंत गाजलेले असे 'गोविंददासेर कॉरचा' (गोविंददासाचे चरित्र) हे हिणकस नव्हते. या पुस्तकामध्ये चैतन्यदेवांच्या गया, काशी, नीलाचल, दक्षिण देश इत्यादी देशांतील प्रवासांची दैनंदिनी दिलेली आहे. प्राचीनतम बंगाली साहित्यात प्रवासवर्णनात्मक लेखांचा आस्वाद घेण्यासाठी 'मंगलकाव्या'कडेच वळावे लागते. तरी त्यातील सर्व वर्णने सत्याला किंवा वास्तवाला धरून होती असे म्हणता येत नाही. ज्या बंगाली राजपुत्राने विनासायास लंका जिंकली होती असा आमचा समज आहे, किंवा जे बंगाली व्यापारी (सौदागर) सात बोटी सजवून ताम्रलिप्तीहून (बंगालचे प्राचीन नाव) समुद्रयात्रा करीत, त्यांची ती प्रवासवर्णने नाहीत, तर त्या सर्व काव्यकथाच आहेत. परंतु या सर्व कथांचा खरा उद्देश निरनिराळ्या देवदेवतांच्या माहात्म्य-प्रचाराचाच होता. तरीदेखील हल्लीच्या प्रवासात्मक कादंबरीचे 'मूळ' मंगल-काव्या'च्या प्रवासकथांमध्येच सापडते असे म्हणता येईल.

---

१. शुभ प्रसंगी "हुलुलू" असा तोंडाने आवाज करण्याची बंगालमध्ये पद्धत आहे. त्याला 'हुलुध्वनी' म्हणतात.

प्राचीन बंगाली साहित्यामध्ये तीर्थयात्रांच्या प्रवासकथा निदान संख्येने तरी नगण्य नाहीत. त्या दृष्टीने पाहाता " पूर्णकुंभा"च्या मागे कित्येक शतकांचा इतिहास आहे. नवद्वीप, ब्रह्मधाम, काशीधाम, वृंदावन, मथुरा, द्वारका या ठिकाणांच्या प्रवासांची वास्तव वर्णने बंगाली साहित्यात अनेक आहेत आणि ती हौसेने वाचणाऱ्या वाचकांचीही कधीच कमतरता भासली नाही. परंतु साहित्यगुणांच्या दृष्टीने ही सर्व पुस्तके किती परिपूर्ण आहेत यांविषयी मतभेद आहेत. तरीदेखील अठराव्या शतकाच्या अखेरीस लिहिलेले कविराज विजयराम सेन विशारद यांचे 'तीर्थमंगल' हे पुस्तक ऐतिहासिक सत्यांनी समृद्ध तर आहेच पण साहित्य गुणांच्या दृष्टीनेसुद्धा त्याचा दर्जा मुळीदेखील कमी नाही असे म्हणता येईल आणि म्हणूनच ते चिरस्मरणीयही झाले आहे. तरी असे म्हणावयास हरकत नाही की एकोणिसाव्या शतकाच्या दुसऱ्या उत्तरार्धात आधुनिक बंगाली माणसाला तथ्यनिर्भर आणि साहित्यगुण असलेल्या प्रवासलेखांची प्रथम गोडी लावली ती 'भ्रमणकारी बोंधूर पत्र' आणि 'पालामौ' या पुस्तकांनीच. याच्याही अगोदर प्रिन्स द्वारकानाथ ठाकूर यांच्या पत्रांत काही ठिकाणी किंवा देवेन्द्रनाथांच्या आत्मचरित्रामधील हिमालयाच्या प्रवासवर्णनांमध्ये आधुनिक मनाला मान्य होईल असा थोडा कथाभाग होता. परंतु ते साहित्य पूर्णार्थाने प्रवासवर्णनात्मक नसल्यामुळे त्यांनी वाचकांचे खरे समाधान झाले नाही.

बंगाली साहित्यातील ही उपनदी एकोणिसाव्या शतकातच निरनिराळ्या लेखकांच्या अमाप लिखाणांनी भरून वाहू लागली होती. परंतु नदीला पूर्ण रूप प्राप्त झाले ते मात्र विसाव्या शतकाच्या सुरुवातीलाच. संवादप्रभाकर, शिवाय 'बंगदर्शन' 'तत्त्वबोधिनी', 'भारती', 'नव्य भारत', 'बंगबासी' या गत शतकातील नियतकालिकांनी प्रवासवर्णनात्मक लेख द्यायला सुरुवात केली होती. त्या वेळी केवळ बंगालच्या आसपासच्या प्रदेशांतूनच नव्हे तर साऱ्या भारतातून आणि युरोपमधूनही असे लेख येऊ लागले होते. त्यांपैकी काही आजकालच्या वाचकांनादेखील परिचित आहेत. परंतु त्यांतले अनेक लेख कायमचे गहाळ झाले आहेत. राजनारायण बसू, जलधर सेन, शिवनाथ शास्त्री, रमेशचंद्र दत्त, सत्येंद्रनाथ ठाकूर आणि स्वतः रवींद्रनाथांच्या किशोरावस्थेतील प्रवासकथा आजही काही कौटुंबिक ग्रंथसंग्रहांमध्ये पाहायला मिळतात. त्या सर्व ग्रंथांचा आता विसर पडला असला तरी त्याकाळच्या लोकप्रिय झालेल्या प्रवासवर्णनांमुळे जिज्ञासू वाचकांची बाहेरच्या जगाबरोबर ओळख झाली होती आणि त्या लिखाणांत साहित्यिक मूल्यांचा अभाव असला तरी त्या सर्वांची ऐतिहासिक मूल्ये आपल्याला नाकारता येत नाहीत. गेल्या शतकाच्या

अखेरीस आणि चालू शतकाच्या सुरुवातीला कित्येक प्रवासिनी बंग महिलांनी-देखील त्यांच्या स्त्रीसुलभ शैलीमध्ये स्वदेशी प्रांगणात विदेश आणून बसवला होता. त्यांचा अनुभवसुद्धा काही कमी वैचित्र्यपूर्ण नव्हता हे त्यांच्या प्रवासकथांच्या नावांवरूनच स्पष्ट दिसून येते – राजकुमारी देवीचे 'इंग्लंडमध्ये बंगवधू', प्रसन्नमयी देवी यांचे 'आर्यावर्त', स्वर्णकुमारी देवी यांचे 'दार्जिलिंगची पत्रे', हरिप्रभा ताबेदार यांचे 'बंग महिलेची जपानयात्रा' इत्यादी. व्यक्तिगत अनुभवांबरोबरच सर्व लोकांना आनंददायी व उपयुक्त अशी माहिती देणे हाच या युगातील रचनेचा हेतू होता. सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल की तेव्हाच्या प्रवासलिखाणाचा मुख्य उद्देश होता वाचकांची जिज्ञासा तृप्त करण्याचा.

परंतु विसाव्या शतकाची काही पावले पुढे पडताच या देशातसुद्धा साहित्याची प्रकृती बदलली, " माझा 'विषवृक्ष' समाप्त केला, घराघरांतून यामुळे अमृत फळास येईल असा विश्वास वाटतो, " बंकिमचंद्रांनी त्यांच्या 'विषवृक्ष' या कादंबरीत दाखवलेला या प्रकारचा मोठेपणा आता कादंबरीकाराला तसाच प्रवासकथाकारालादेखील शोभत नाही. वाचक म्हणजे काही शाळेत जाणारा विद्यार्थी वा अजाण कनिष्ठ भाऊ नव्हे की ज्याला हात धरून सन्मार्गावर घेऊन जाणे हेच लेखकाचे पवित्र कर्तव्य असते. कवी असो की कादंबरीकार, नाटककार असो वा प्रवासकथालेखक असो, ते सर्व रम्यरचनानिर्मिती करणारे, रसाचा परिपोष करणारे असतात. लेखक कोणता धंदा करीत असेल तर तो मुख्यतः रसाचा, ज्ञानाचा नव्हे. म्हणूनच बंगाली साहित्यात या प्रवासकथांच्या प्रवाहामध्ये लक्षात येण्यासारखे परिवर्तन झाले. त्याचा परिणाम असा झाला की, प्रवासवृत्तात वाचक लेखकाबरोबर जितका प्रवास करीत असे त्यापेक्षा त्याचे लक्ष लेखकाच्या चित्ताकर्षक गोष्टींकडे जास्त लागायला लागले. वाचकाच्या या दौर्बल्याचा फायदा घेऊन काही लेखकांनी खऱ्याखुऱ्या अनुभवावर आधारित नसलेल्या प्रवासकथा लिहायला सुरुवात केली. खरोखरीच्या प्रवासवृत्तांतांपेक्षा कल्पित, चित्ताकर्षक गोष्टींचे प्रमाणच जेव्हा त्यामध्ये अधिक दिसून येते तेव्हा त्या लिखाणाला प्रवासात्मक कादंबरी हीच संज्ञा देणे सयुक्तिक ठरते. अशा तऱ्हेच्या प्रवासात्मक कादंबऱ्यांना फार मागणी असते. म्हणूनच ऐतिहासिक कादंबऱ्यांबरोबर यांची मोठी स्पर्धा असते. काही लेखक तर रहस्यकथामालेप्रमाणे प्रवासात्मक कादंबऱ्यांची मालिकाच लिहीत सुटलेत असेही पाहायला मिळते.

अर्थात याचा अर्थ असा नव्हे की यथार्थ प्रवासवृत्तांतकथा लिहिण्याचे त्यामुळे

बंद झाले. प्रवासवृत्तांताव्यतिरिक्त यामध्ये वरवर ज्या गोष्टी सांगितलेल्या असतात त्या केवळ कपोलकल्पित नसतात. लेखकाची काही विचारपूर्ण टीका किंवा काही स्वानुभवही त्यामध्ये गोवलेले असतात. विसाव्या शतकातील वाचक, लेखक आणि त्यांच्या अनुभवाचे जगत् यांची स्पष्ट कल्पना यावी म्हणून सर्वांना परिचित अशा दोन समकालीन प्रवासकथांचा उल्लेख यापूर्वी केला आहेच. चालू शतकातील वैशिष्टये असलेल्या उल्लेखनीय अशा ज्या दोन प्रवासकथांचा नामनिर्देश करता येईल त्या लोकप्रिय असूनही त्यांमध्ये महत् असे साहित्यगुणही आहेत. अन्नदाशंकर राय किंवा मुजतबा अली यांची प्रवासवर्णनात्मक पुस्तके रम्य कथांच्या जवळजवळ उंबरठ्यावरच असल्यासारखी वाटली तरी ' पॉथे प्रवासे ', आणि ' देशे विदेशे ' ही दोन प्रवासवर्णने आपापल्या वैशिष्टयाने प्रवासकथांच्या प्रवाहावरची दोन चमत्कृति-पूर्ण पुस्तके आहेत असेच म्हणावे लागेल. अन्नदाशंकर हे भाषेचे जादूगार आहेत आणि मुजतबा अली हे निवेदनशैलीच्या दृष्टीने अद्वितीय आहेत. ही दोन्ही पुस्तके इतकी परिचित आहेत की बंगाली वाचकांसाठी त्यांतील उदाहरणे देण्याची जरुरी नसली, तरी मोह आवरणे फार कठीण आहे. १९२७ सालामध्ये या युवकाने युरोपच्या प्रवासवर्णनात जी चातुर्यपूर्ण वाक्यरचना केली आहे त्यावरून आताच्या कला-निपुण आणि परिमितभाषी अन्नदाशंकरना सहज ओळखता येते.

" भारतवर्षाच्या भूमीवरून मी अखेरचे पाऊल उचलले आणि नवजात शिशू-प्रमाणे आईबरोबरचा माझा संबंध एका क्षणात तुटला. एका पदक्षेपाने जेव्हा साऱ्या भारतवर्षापासून अलग होऊन मी अनंत शून्यात पाऊल पुढे उचलले तेव्हा ज्या जागेवरून मी पाऊल उचलले होते ती माझ्या पावलाची खूण उमटलेली जागा जणू काही समग्र भारतवर्षाच्याच विरहाची जाणीव मला करून देत होती. प्रिय माण-साच्या नुसत्या अंगुलिस्पर्शाने जसा त्याच्या सबंध शरीराचा स्पर्श झाल्याचा अनुभव येतो, तसाच हा अनुभव होता...." मी प्रथम लंडननगरी पाहिली ती गोरज मुहूर्तावर. माझी दृष्टादृष्ट होते ना होते तोच नतमस्तक होऊन तिने अंधाराचा घुंघट पुढे ओढून घेतला," ... " ग्रीन हाऊसमध्ये लोकांना कोंडून जे नीतिनिपुण जबरदस्तीने त्यांना सती किंवा यती करण्याचा प्रयत्न करतात, त्यांना सांगितले तर कदाचित त्यांचा विश्वास बसणार नाही की भारतातसुद्धा सती वा यतींची कमतरता नाही. परंतु जे आहे ते समाजातील नियमानुसार नव्हे तर स्वेच्छेने " ... " ते जेव्हा शंभर मैल वेगाने विमान चालवून त्या शिरशिरीच्या भरात मूर्च्छासुखाचा अनुभव घेतील त्या वेळी बैलगाडीत बसून ताशी एक मैल जाण्यामध्ये जी तंद्री लागते त्याचे

सख त्यांना कळणार नाही." अन्नदाशंकरांच्या प्रवासवर्णनात ज्या बौद्धिक सौंदर्याचा प्रत्यय येतो तो या प्रांतातील साहित्यात अतिदुर्मिळच होता. अर्थात, रवींद्रनाथांच्या प्रवासवर्णनात मात्र हाच सर्वात मोठा गुण होता.

पहिले एकच पुस्तक लिहून कायमची लेखणी बंद ठेवली असती तरी जे लेखक मान्यता पावले असते अशांपैकीच बंगालमधील मुजतबा अली हे एक होत. या तोडीचे दुसरे पुस्तक त्यांनी लिहिले नाही असे म्हटले तर वावगे होणार नाही. इतकेच नव्हे तर आपण असेही म्हणू शकतो की बंगाली भाषेत या दर्जाची किती पुस्तके लिहिली गेली ? मी असे विधान केल्याबद्दल साहित्यरस कोर्टात अतिशयोक्ती केल्याच्या आरोपाखाली मला उभे राहावे लागणार नाही, याची मला खात्री आहे. परंतु माझी बाजू मांडण्यासाठी काही पुरावे मांडायला हवेत असे मला वाटते. परंतु स्थलाभावी ' देशविदेश ' मधून उतारे देणे सोपे नाही. कारण, मुजतबा अलीचे वैशिष्टच छोटयाछोटया वाक्यरचनेमध्ये जितके दिसून येते त्यापेक्षा कितीतरी पट अधिक त्यांच्या सामान्य घटनांचे असामान्यत्व दाखवण्याच्या कसबामध्ये, हुबेहूब वर्णन करून डोळयांसमोर चित्र चितारण्यामध्ये, स्वभावचित्रणामध्ये आणि त्यांच्या प्रसन्न विनोदामध्ये दिसून येते. या सर्व लेखनशैलींची उदाहरणे द्यायची म्हटले तर त्यासाठी थोडी जागा ही लागणारच. पण जाऊ द्या ते ! ......" मी असं ऐकलंय की पठाणाचा गुंड सरदार चार वेळा पुराव्याच्या अभावी निर्दोष सुटला. परंतु पाचव्या खेपेला जेव्हा हकीम इजाज हुसेन खान यांच्या कोर्टात तो हजर झाला तेव्हा मात्र ते चिडले, "याच अपराधासाठी तू माझ्यासमोर पाचव्यांदा उभा राहिला आहेस, तुला लाज शरम नाही ? " गालातल्या गालात हसत तो सरदार म्हणाला, " हुजूर प्रमोशनच नाही मिळालं तर काय करणार ? " ...... " पठाणाला बइमान म्हटलं तर त्याचं रक्त खैबर खिंडीतील तपमान सर्वत्र पसरवतं, त्याच्या भावाला वाचवण्यासाठी तो अत्यंत शांत मनानं योगासन घालून बसतो आणि त्याला कमीत कमी किती खून करावे लागतील ते तो बोटांवर मोजतो. परंतु हिशोबाच्या बाबतीत तो साक्षात विद्यासागर असल्यामुळे त्याची बहुतेक चूकच होते आणि दोनचार माणसे तरी निष्कारण प्राण गमावतात, त्याबद्दल त्याला दरडावून विचारले तर तो पठाण कातर स्वरात म्हणतो – " परंतु माझ्या बंदुकीच्या चार गोळ्या खर्च झाल्या त्याचं काय ? " आपल्याला हे माहीतच आहे की या लोकांचा आणि आपला तसा परिचय नाही. असंख्य प्रवासकथांच्या द्वारे दोन शतकांत युरोपशी आपला जितका परिचय झाला आहे त्याच्या एकशतांशसुद्धा परिचय आपल्या शेजारच्या

राज्यांशी झालेला नाही. अशा या एका अपरिचित देशाला, अफगणिस्तानाला, मुजतबा अलींनी बंगाली लोकांच्या घराशेजारी आणून बसवले ... नव्हे त्यांच्या हृदयामध्येही त्या देशाला जागा मिळवून दिली आहे. चेहेऱ्याने दिसायला नरदानव वाटला तरी सेवाधर्मात, गृहकृत्यात, स्वयंपाक करण्यात बंगाली गृहिणीला मागे टाकील असा त्यांनी रेखाटलेला तो नोकर अब्दुर रहमान, त्याच्याविषयी कुणाला आपुलकी वाटत नाही ? काबुलीवाल्याचे आणखी एक आगळेच स्वभावचित्र,...... " मस्करी करणारे असे आणखी दोनचार पठाण तोपर्यंत चित्रित केलेले होते. सर्वच काबूलमधे राहाणारे, पोहणे कसे ते त्यांना माहीत नाही. पाण्यात उतरताच ते अगदी दगड होतात. त्यांच्यापैकी एक मात्र चारी बाजूंना हातपाय मारतो आणि समुद्र वेगाने तरून जाणाऱ्या गोयालन्दी जहाजालाही पराभूत करून मोठ्या कष्टाने दुसऱ्या काठावर पोचून धापा टाकीत उभा राहतो. या तीरावर एकसारखा प्रशंसा-ध्वनी आणि पलीकडच्या तीरावर एकसारखी बढाई होत असते. जिथे तो पोहतो त्या जागी काबूल नदीची रुंदी जेमतेम फक्त २० गज असेल नसेल इतकेच." आता आणखी जास्त उतारे नकोत, एवढेच पुरेत.

भारताच्या धर्मात, साहित्यात, इतिहासात, राजकारणात हिमालयाला एक अनन्य-साधारण महत्त्व आहे. मी अगदी आकडेवारी घेऊन पाहिले नाही, तरी आपल्या देशातील प्रवासवर्णनांत हिमालयाला निम्मे तरी स्थान असतेच असे म्हटले तर ते सत्याला सोडून होणार नाही. चालू युगातील बंगाली लोकांच्या बाबतीत बोलायचे झाले तर देवेंद्रनाथ ठाकूर हेच हिमालयाचे पहिले मार्गदर्शक होत असे म्हणायला हरकत नाही. तेव्हापासून आता १९७३ सालापर्यंत हिमालयाची वर्णने काही कमी लिहिली गेली नाहीत. तीर्थयात्रा, गिरिशृंगविजय, लुप्तप्राय झालेल्या एखाद्या जमा-तीचा शोध किंवा हिममानवाचा पाठलाग अशा नाना कारणांनी किती तरी लोक हिमालयावर जात असतात आणि कितीतरी लिहीत असतात. परंतु देवतात्मा हिमा-लयाचे आपले रहस्य काही आगळेच !

बहुरूपी हिमालयाने नाना लोकांना नाना आकर्षणांनी आकर्षित करून घेतले आहे. " मणिमहेश " या पुस्तकातील नीरस वर्णनामध्येसुद्धा त्या सर्वनाशी आकर्ष-णाचा थोडा अनुभव घेऊन गृहस्थाश्रमी वाचक धन्य होतात.

श्रीमती राणी चंद यांचे ' पूर्णकुम्भ ' म्हणजे हिमालयाचेच एक घरगुती चित्र आहे. या प्राचीन देशातील प्राचीनतम अशा मेळ्याच्या वर्णनामुळे या चित्राला जास्तच रंग चढला आहे. हा मेळा प्राचीन असून, कालप्रवाहाबरोबर गंगेप्रमाणे संथ

वाहाणारा आहे. कोणा विस्मृत युगापासून साऱ्या भारतातील माणसांचा स्रोत इथे येऊन मिसळला आहे. हिमालयाची चुम्बक शक्ती आर्यावर्त आणि दाक्षिणात्य या दोघांनाही अशा तऱ्हेने एकाच केंद्रबिंदूकडे आकृष्ट करते. या ' महामानवाच्या सागर-तीरावर ' येऊन उभे आहे, श्रद्धा – अश्रद्धा, आवड – औदासीन्य यांच्या हिंदोळ्या-वर हेलकावे घेणारे परंतु जिज्ञासू असे एक मन ! जे मन शांतिनिकेतनच्या, कवि-गुरूच्या स्नेहस्पर्शाने पुलकित झाले होते, तेच मन प्राचीन भारताचे आणि त्याच्या आत्म्याचे दर्शन घेते आणि ज्या डोळ्यांनी अवनींद्रनाथांकडून रसग्रहणाची दीक्षा घेतली होती त्याच डोळ्यांनी हिमालयाचे दर्शन घेते. या दृष्टीने पाहता राणी चंद या अत्यंत भाग्यवान होत.

ज्या सराईत हाताची साक्ष या ' पूर्णकुम्भा'त पाहायला मिळते ते हात एका नाविन्यपूर्ण परिस्थितीमध्ये तयार झाले होते. वार्धक्यकाळी शक्तिहीन अशा अवस्थेत अवनींद्रनाथांनी सांगितलेल्या गोष्टी लिहून घेण्यासाठी, रवींद्रनाथांनी त्यांच्या या आवडत्या विद्यार्थिनीला मुद्दाम नियोजित केले होते. अवनींद्रनाथांचा ब्रश त्या वेळी थकला होता, लेखणी चालत नव्हती, पण कुडीमध्ये प्राण सुरक्षित होता. दररोज तोंडी गोष्टी सांगून त्यांनी तोच प्राण साकार केला आहे. आणि राणी चंदने त्या सर्व गोष्टी सर्वांसाठी चिरस्थायी करून ठेवल्या आहेत. एरवी या सर्व अमूल्य स्मृति-कथा नेहमीप्रमाणे लुप्त झाल्या असत्या. सुदैवाची गोष्ट ही की त्या काळी या देशा-मध्ये टेपरेकॉर्डर पोचला नव्हता. म्हणून तर या स्फूर्तिदायक लेखिकेची मूर्तिमंत उपस्थिती अवनींद्रनाथांना प्रेरक ठरली आणि त्याचमुळे अवनींद्रनाथांच्या स्मृतींच्या चोर कप्प्यात प्रकाश पडला. एखाद्या टेपरेकॉर्डरला ते साधले असते का ? अवनींद्र-नाथांच्या भाषेतच सांगायचे तर ' आँतर बाजे तो जाँत्रो बाजे तो जाँत्रो बाजे ' (अंतर वाजे तर यंत्र वाजे, तर यंत्र वाजे) स्वत: अवनींद्रनाथ एकदा म्हणाले होते की जर राणी चंदने त्यांनी सांगितलेल्या गोष्टी झोळीतून काढून सजवून, जुळवून ठेवल्या नसत्या तर त्या सर्व विस्कळित गोष्टी टाकाऊ म्हणून तशाच अडगळीत पडून राहिल्या असत्या. राणी चंद यांना लेखिका म्हणून प्रथम प्रतिष्ठा, मिळाली ती ' घरोया ' आणि ' गोडा सांकोर धारे ' – या दोन पुस्तकांमुळेच आणि त्या अवनींद्रनाथांकडे आल्या तेव्हाच बंगाली स्मृतिसाहित्यात ही दोन पुस्तके अत्यंत मोलाची ठरली होती. दुसऱ्यांनी तोंडी सांगितलेल्या गोष्टी – सांगणारा स्वत: त्यांच्या मोठेपणामुळे कितीही तज्ज्ञ असला – तरी त्यांच्या त्या गोष्टी त्यांच्याच भाषेत जपून ठेवणे हे काम सोपे नाही. स्वत:च्या व्यक्तित्वाला झाकून ठेवून स्वच्छ

काचेप्रमाणे, त्यांतूनच दुसऱ्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडवणे फार कठीण काम असते. या गोष्टीची जाणीव स्वतः अवनींद्रनाथांना झालेली होती. म्हणूनच या श्रुतिधारांची प्रशंसा करून ते म्हणाले होते, "तोंडी सांगितलेल्या गोष्टी लेखनशैली-मध्ये गुंफणे सोपे नाही, वाऱ्यावर जाळे टाकून वारा पकडण्यासारखीच ती गोष्ट आहे." तरी राणी चंदने वाऱ्यावर जाळे टाकून अलक्ष्य, अगोचर अशा विश्वातून काहीतरी आणून आपल्याला भेट म्हणून दिले आहे. त्यासाठी वाचक त्यांचे फार कृतज्ञ आहेत.

राणी चंदच्या स्वतःच्याही काही प्रवास-स्मृती आहेत – 'जनाना फाटक'. राणी चंदचे व्यक्तित्व जसे बहुरंगी तसाच त्यांचा अनुभवही मृदू आणि कठोर असा संमिश्र आहे. शांतिनिकेतनमधल्या काव्यात्मक वातावरणामध्ये लहानाचे मोठे होऊन आणि जवळजवळ आजन्म रंग व ब्रश यांचा खेळ करून शेवटी गांधीजींच्या 'भारत छोडो' आंदोलनात भाग घेऊन कारावासात जाणे या सर्व गोष्टी आश्चर्यकारकच होत, काही प्रमाणात अकल्पनीयच ! काव्य, शिल्प आणि राजकारण ही तिन्ही क्षेत्रे परस्परविरोधी नाहीत याचा एक पुरावा म्हणजे राणी चंदचे जीवन. तुरुंगातील चार भिंतींमधून या जगतामध्ये पाहाण्यासारखी चित्रे, ऐकण्यासारखे काव्य याची तर काही कमतरता नाही. तेच पाहाणे, तेच ऐकणे यांचे फलस्वरूप म्हणजेच हे " जनाना फाटक ".

'पूर्णकुम्भ' लिहिले ते उतार वयात आणि लेखणी तयार झाल्यावर. या पुस्तकात तीर्थयात्रा करणाऱ्या स्त्रीचा अप्रगल्भ उच्छ्वास नाही, हिमालयाच्या विराट पार्श्व-भूमीवर क्षुद्र असे मन नाही. देवाण-घेवाणाची खरीखुरी कथा गुंफण्याचा यात प्रयत्न आहे. म्हणूनच यात रसपरिपोष भरपूर झाला आहे. परंतु तो रस मादक नाही. पौष महिन्यातील उषःकालाच्या हिमशीतल खजूर रसाप्रमाणे तो गोड आहे. त्याचा स्वाद, लेखिकेचा दृष्टिकोन पहिल्या प्रकरणाच्या पहिल्या ओळीतच आपल्याला पाहायला मिळतो. – " त्या दिवशी स्वयंपाकघराच्या दाराला टेकून बसून माझी वैष्णव मैत्रीण म्हणत होती, " या जीवनात काय मिळालं आणि काय मिळालं नाही, काही मिळालं असतं तर विशेष काय झालं असतं आणि ते मिळालं नाही म्हणून काय नुकसान झालं – जीवनातील या नफ्यातोट्याचा हिशोब पडताळून पहाण्यासाठी एकदा मी बसले होते पण जमलं नाही ......" अशा रीतीने लिहिणे म्हणजे वीरभूमीच्या (बंगालच्या) बाउलांच्या नजरेने उत्तर भारताकडे पाहाण्यासारखे आहे. राणी चंदच्या लेखणीमध्ये प्रेम आणि वैराग्य असे परस्परविरोधी सूर सहजपणेच

येतात. उगीच काहीतरी सांगण्याचा अट्टहास नाही, कल्पित हकीकती नाहीत, चटकदार वर्णने नाहीत तरी कथाकथनाची शैली, चित्र रेखाटण्याचे कसब अफाट आहे. राममय महाराजांची गोष्ट, वसुमती मांचे जीवन, हरकी पौडीवरून पाहिलेले साधूंचे स्नान, किंवा भंडाराचे वर्णन या सर्व गोष्टी मनश्चक्षूंसमोर उभ्या राहातात. सुन्दर पहाडी नदीप्रमाणे खळाळत अगदी सहजपणे त्यांच्या प्रवासवर्णनाचा ओघ वाहत जातो. कधीकधी असे वाटते जणू लहान मुलीसारखे चौकस डोळ्यांनी त्या पाहात आहेत. सर्व तीर्थयात्री, वैचित्र्यपूर्ण मंदिरे, अलख निरंजन साधू, माकडांचा उत्पात, गुरुकुलातील मुलांची तपश्चर्या, तिलभाण्डेश्वराचा शृंगार – इत्यादी सर्व काही. त्यांच्या भक्तिमती, शुद्धचारिणी सोबतिणींपेक्षा त्यांची श्रद्धा कदाचित कमी असेलही, तरी त्या निष्कारण वाद घालीत नाहीत, त्यांच्या मनात कदाचित असा प्रश्न उभा राहिला असेल, " इतक्या सर्व लोकांची मिळून जी इतकी श्रद्धा आहे त्याला काहीच किंमत नाही का ? एका या श्रद्धेच्या जोरावर लाखो, लाखो लोक एकत्र येतात – याच्या मुळाशी काय नुसते शून्यच आहे ? " परंतु मनातल्या या प्रश्नाला त्यांनी फार वेळ थारा दिला नाही, अर्थातच या प्रश्नाचे उत्तर नकारात्मक असते तर कुम्भ पूर्ण भरून आणण्यासाठी त्या हरिद्वारला गेल्याच कशाला असत्या ? वाचकांच्या मनातील असंख्य शंकांना त्या तात्पुरत्या तरी बांध घालतात. कारण जे निर्मळ जल त्यांनी गंगेतून या तीर्थयात्रेच्या निमित्ताने आपल्यासाठी आणले आहे त्या नदीने संस्कृतीच्या सुरुवातीपासून आजतागायत आपल्याला काही कमी समाधान दिलेले नाही.

**गौरी अय्यूब**

त्या दिवशी स्वयंपाकघराच्या दाराला टेकून बसून माझी वैष्णव मैत्रीण म्हणत होती, " या जीवनात काय मिळालं अन काय मिळालं नाही; काही मिळालं असतं तर विशेष काय झालं असतं अन ते मिळालं नाही म्हणून काय नुकसान झालं—— जीवनातील या नफ्यातोटयाचा हिशोब पडताळून पहाण्यासाठी एकदा मी बसले होते, पण काही जमलं नाही. आसवांमध्ये सर्व वरच्यावर मिसळून गेलं. शेवटी तो हिशोब विसरण्यासाठीच सर्व काही मागं टाकून मी बाहेर पडले."

आगगाडीच्या खिडकीपाशी हातावर डोके टेकून बसून मी तिचाच विचार करीत होते.

मी चालले होते हरिद्वारला कुम्भमेळयासाठी.

आक्का जात होत्या, बरोबर हेमदादाही होते. त्यांच्या सोबतीने मीही निघाले. मी आताच पाहून आले होते अंगणातील शिवरी अन पळसाच्या वृक्षांना अगदी शेंडयावर फुले आली होती. ही नुकतीच तर पतझड संपली होती. एकदम येणाऱ्या झंझावाती वाऱ्यामुळे सारी पिकलेली पाने गळून पडली. हा पतझडीचा नाच दिवसा मी डोळयांनी पाहिला होता अन रात्री शिवरीच्या झाडाखाली अंधारात पाय मोकळे करताना कानांनी ऐकला होता. सबंध वर्षभर याच वेळेची प्रतीक्षा करीत मी दिवस मोजीत असे. निळया निळया आकाशाच्या पार्श्वभूमीवर लवलेल्या या काळया फांद्यांकडे मी सतत पाहात रहात असे. बघता बघता एकाएकी एखाद दिवशी काळसर कळयांनी फांद्या भरून जायच्या अन मग सुरू व्हायचा फुले उमलायचा बहर. थोडयाच दिवसांत फुलाफलांनी तोच वृक्ष बहरून जाईल असे मनात यायचे. लाललाल पाकळयांच्या संभारांनी फांद्या लवून वाऱ्याबरोबर झोके घेतील. निर-निराळया पक्ष्यांचे थवे येतील. साळुंकी, गावसाळुंकी, मोठया चिमण्या (seven birds) कोकीळ अन कावळे. पहाट झाली नाही तोच काय ती त्यांची किलबिल ! त्यांच्या त्या किलबिलाटामुळे साऱ्या आसमंतात बाजार भरल्यागत वाटायचे. पाठीवर

शेपटया चढवून फांद्याफांद्यांवरून खारकुंडया पळापळ करू लागायच्या. दोन्ही हातांनी फुले तोडून त्यातला मध खायच्या त्या कित्येकदा. दुपारी खिडकीजवळच्या खाटेवर एकटी पडून त्यांचा तो खेळ मी एकाग्र चित्ताने पाहिला होता. त्यांच्या चपळाईला सीमा नसायची. शिवरीच्या फुलांमध्ये वाटीभर मध असतो का ? खारी फुले खात तेव्हा त्यातला कितीतरी टपटप पडायचा. माझ्या मनात यायचे, इतका हा सर्व खराच मध आहे, की ते सर्व जमलेले दवबिंदू आहेत ?

शिवरीच्या झाडाच्या जरा पुढेच पळसबागेच्या त्या कोपऱ्यातून मातकट शेंदरी रंगाची उष्णतेची लाट शन्यापर्यंत, उसळते अन त्या आगीतच काळे, तिरकस नाजूक ओठ असलेले काळे भुंगे उडत असतात. रात्रंदिवस झाडाखाली लाल वाळू पसरून पळस जणू लाल बिछायतच घालीत असतो, आईकडे जाता–येताना जमिनीवरची फुले मी ओंजळ भरून घ्यायची. कधीकधी आईचे देवघर मी या फुलांनी सजवायची तर कधी स्वतःच्या घरीच ही फुले घेऊन यायची अन खिडकीत ठेवलेल्या भाजलेल्या मातीच्या थाळयात ती सारी काठोकाठ भरून ठेवायची. व्हरांडयाच्या कोपऱ्यात छपरापर्यंत चढलेल्या नीलमणी वेलीला निळया निळया फुलांचे गुच्छ लागले आहेत. वेल कशी अगदी जीर्ण झाली आहे. वेलीच्या मुळाशी वाळवी लागली आहे. अन वाळवींनी जणू काही वेलीवर मातीचे लेप चढवले आहेत. वेलीला आता पहिल्यासारखा जोम राहिलेला नाही. अगदी शेंडयाला काही मोजकी हिरवी पाने बाळगून ती कशीबशी तग धरून आहेत. पूर्वी याच सुमारास हा कोपरा नीलमणी फुलांच्या निळया रंगाने आच्छादून जायचा. कितीतरी दुरून त्या निळया रंगाची झाक दृष्टीस पडायची. आतासुद्धा फुले येतात परंतु तितकी नाही. तरी जेवढी दिसतात तेवढीच मी पहात रहाते अन पूर्वीच्या त्यांच्या बहराचे सौंदर्य ओढूनताणून डोळयांसमोर आणते. वाऱ्याबरोबर गिरक्या घेत घेत नीलमण्याचा सडा पडायचा व्हरांडयाच्या लाल लाल जमिनीवर. दररोज पहाटे निळया तारकांचा गालिचा घालून ती वेल कुणासाठी बैठक घालते कुणास ठाऊक. आपल्या साऱ्या फुलांची दौलत वाहून ती हे जे निवेदन करते त्यांना तिला कुणाला काय शिकवायचे आहे बरे ? हाच विचार कितीदा तरी मनात आला होता. आताही पुन्हा तेच; एक फूल असू दे नाहीतर दोन असू दे, मी त्यांच्याकडे पहात रहाते, जणू काही तिला मी हवीच असते. नाही पाहिले तर विसरेन तिला अशी भीती वाटते मनात. सबंध वर्षभर आठवण ठेवून वेलीला पाणी घालते आणि थोडीतरी हिरवी पाने शिल्लक आहेत का वेलीवर ते पहाते वर मान करून. दर वर्षअखेरीस याच सुमारास तो बहर

पुन:पुन्हा येतो. घराच्या मागच्या बाजूच्या बागेत कांचनाला असा बहर आला आहे! गडद हिरव्या रंगाचा आंबा आणि पेरू या झाडांच्या शेंड्यांवर एकाएकी फिकट जांभळ्या रंगाचे एक एक कारंजेच दिसू लागते जणू. काय तो त्यांचा बहर ! शिवरी, पलाश, नीलमणी, कांचन या सर्वांच्या सौंदर्यरूपी ऐश्वर्याने चारी दिशा भारून जातात नुसत्या.

मी तोंड फिरवले. मनाची दृष्टी पुढे नेली.

प्रवासाला निघाल्यावर मागून येणाऱ्या हाकेला ओ देऊ नये, असे ऐकले होते आजीच्या तोंडून.

माझे निघण्याचे एकाएकीच ठरले. ते कसे काय जमून आले त्याचे माझे मलाच आश्चर्य वाटते. दोन दिवसांसाठी असो की दहा दिवसांसाठी असो घरातून स्वतः बाहेर पडणे म्हणजे महा कठीण काम. कितीतरी गोष्टींची व्यवस्था लावून मगच तयार होता येते.

आक्कांबरोबर निघायचे असा मनातल्या मनात जेव्हा नक्की बेत केला तेव्हा अभिजितनं त्यात व्यत्यय आणला. एक दिवस त्याला हिव भरलं अन त्यानं अंथ-रूणच धरलं.

सामान सर्व बांधून तयार होतं. जमिनीवरून ते खाटेखाली सरकवून ठेवलं. एक, दोन, तीन दिवस झाले, तापाचा जोर वाढतच होता अन तिकडे आक्कांकडून निरोप आला, " तिकीट काढलेलं आहे. आता वेळ नाही, लवकर कलकत्त्याला निघून ये. "

मी काही बोलले नाही, उत्तर दिलं नाही. एक एक औषधाचा भाग काचेच्या ग्लासमध्ये ओतायची अन शांतपणे डॉक्टर अन रुग्ण यांच्या तोंडांकडे पहात रहायची.

शेवटी यात्रेला निघायच्या शेवटच्या दिवसाच्या शेवटची गाडी निघायच्या ऐन वेळी या दोघांमधून माझी सुटका झाली.

जशी होते तशीच निघाले. होल्डऑलचा पट्टा बांधता बांधता रमूनं मला गाडीत कसंबसं ढकललं. खिडकीतून डोकावून अभिजितनं आश्वासन दिलं.

आम्ही चौघे यात्रेकरू होतो. मी, मोठ्या वन्स – आक्का, मेहुणे – दादा अन व्रजरमण – एक वैष्णव ब्राह्मण, तीर्थयात्रा करण्यासाठी यांना दादा मुद्दाम गावाहून घेऊन आले होते.

एकाच प्रवासातले हे सोबती. यांना कोणत्या नावानं संबोधू ? सहजासहजी एखादं नाव नक्की झालं म्हणजे रोज बोलायचालायला सोपं जातं. आक्कांना वैष्णव म्हणा-

यचे 'आई' अन दादांना 'बाबा'. त्या नात्यानं पाहिलं तर मी त्यांची मामी — जिथं नातं जवळचं असतं तिथं आपोआपच आपलेपणा वाटतो. तरी मला थोडा परकेपणा वाटतच होता. आक्का म्हणाल्या, " भाच्याचं नातं लागतं, नावानंच हाक मार." वैष्णवसुद्धा बहुतेक या संधीचीच वाट पहात होते. एकदम जवळ येऊन, ते काय करीत होते ते मला कळायच्या आतच मला चटकन नमस्कार करून वैष्णवाला साजेशा विनयाने म्हणाले, " मामी, भाच्याला तर नावानंच हाक मारतात."

व्रजरमण मोठे विद्वान, शांत, विनयशील अन भक्तिमान होते. — कोणाच्या बाबतीत काही चूक होईल या भीतीने ते नेहमीच संकोचाने वागत. वैष्णव माणसाचं विनय हे भूषण. व्रजरमण या नियमांचे अक्षरशः पालन करीत असत.

व्रजरमणना हिंदी चांगले लिहिता वाचता येई. स्वच्छ उच्चार करायचे ते. तरीही बंगाली बोलताना त्यात सिल्हेरी हेल अजूनही अचूक यायचा.

शेजारच्या बाकावर दोन मारवाडी बसले होते; — वय असून असे कितीसे असणार — फार तर बावीस, तेवीस किंवा चोवीसच्या आसपास. परंतु एवढ्या दरम्यानच काय शरीर कमावलं होतं ! पाहून कीव यायची. शरीर वाढेल नाहीतर काय ? समोरासमोर बसून काय खाल्लं त्यांनी; चवडच्या चवड पुऱ्या आणि भाजी, त्यानंतर त्यांनी जणू क्षणातच संदेश अन रसगुल्ल्यांचं दुकान रिकामं केलं. बापरे, काय तो त्या एकेका संदेशाचा आकार ! लढाई सुरू झाल्यापासून कित्येक वर्षांत इतका मोठा संदेश मी पाहिला नव्हता. बदाम-पिस्त्यांनी भरलेला, हिरवा, केशरी, शुभ्र, स्वदेशी संदेश पुढं वाकून, हाऽऽ मोठा 'आ' करून या दोन तोंडांत ठासून ठासून कोंबीत होते. हांडीतून हातांनीच रसगुल्ले काढून पानांत घेत होते. किती घेतले त्याची गणतीच नव्हती. नुसतं पाहूनच थक्क झाले.

आमचे दादा अतिशय बोलके; त्यांनी आडवे पडल्या पडल्याच गप्पा सुरू केल्या. ते म्हणाले, दोन एक दिवस बरोबर प्रवास करायचाय तेव्हा ओळखदेख असलेली बरी. " काशीविश्वनाथ समितीतर्फे तेही हरिद्वारला निघाले होते. तिथे येणाऱ्या यात्रेकरूंना मदत करायची हाच त्यांचा महान हेतू होता अन म्हणूनच स्टेशनवर एवढा मोठा निरोपसमारंभ झाला असावा. गाडी सुटायच्या वेळी दहाबारा जणांनी त्यांच्या गळ्यात मोठाले हार घालून कितीतरी वेळा जयजयकार केला. तेव्हापासूनच आक्कांच्या मनात त्यांच्याविषयी अपरिमित भक्तिभाव निर्माण झाला. त्या म्हणाल्या, " कळलं का ? हेच खरोखरीचे सेवक." तिथे सर्व व्यवस्था करण्या-

साठी सेवा समितीतर्फे हे अगोदरपासूनच चालले होते. नंतर त्यांना मदत करण्यासाठी निरनिराळ्या ठिकाणांहून स्वयंसेवक येणार होते. त्यांचे सर्वांत पहिले काम म्हणजे पाण्याची सोय. ते म्हणाले, " महाशय, तिथं येणारे जितके जितके म्हणून यात्रेकरू असतील त्यांना पहिल्यानं आम्ही पाणी प्यायला देतो. नंतर त्यांना पुरी-भाजी, मिठाई खायला द्यायची हे दुसरं काम. दुकानंसुद्धा असणारच. तिसरं काम म्हणजे अग्निसंस्काराचं, स्नान करायला म्हणून आलेले पुष्कळ यात्री मरतात-देखील."

यांचं दुसऱ्या क्रमांकाचं काम ऐकून माझा उत्साह दुणावला होता. वाटत होतं त्यांना म्हणावं त्या कामाला आगगाडीतच करा ना सुरुवात, आम्ही तरी तिथे जाणारे यात्रेकरूच आहोत ना. परंतु त्यांच्या तिसऱ्या क्रमांकाच्या कामाबद्दलचं विवरण ऐकल्यावर मनातला विचार मनातच विरून गेला. तीर्थस्नानाला जाऊन सेवासमिती-कडून सेवा करून घेतल्यावर शेवटी आणखी कसली जबाबदारी पडते कुणास ठाऊक ?

मोठ्या उत्साहाने बॅग उघडून त्या दोघांनी त्यांच्या कार्याचा हिंदीत छापलेला अहवाल दादांच्या हातात दिला. तो अहवाल म्हणजे त्यांच्या कार्याची एक गाथाच होती. मोठ्या धीराने दादांनी सर्व वाचूनही टाकला. ते म्हणाले, " वेळ फुकट कशाला घालवू ? जरा हिन्दी पक्कं तरी होऊ दे." दादा जितका प्रयत्न करून वाचीत होते तितकाच त्या मारवाड्यांचा उत्साह वाढत होता. सारखे उठून बाका-वरून पुढे वाकून पुन्हापुन्हा ते समजावून देत होते, " हा जो फोटो पाहता ना, हे गृहस्थ क्रोडोपती आहेत. कमीत कमी हजार एक लोकांना जेवण देतात. कित्येक ठिकाणी त्यांनी सेवाकार्य केले आहे."

मनात आले, म्हणावे, का करणार नाहीत ? तुपात जितकी भेसळ केली असेल तितकीच जास्त दानधर्माची खैरात करीत असतील.

आगगाडीत जेव्हा वेळ जाता जात नाही तेव्हा झोपेसारखा दुसरा उपाय नसतो. सकाळी चहा पिऊन एक झोप काढली की दुपार; दुपारी वल्लभदासकडच्या जेव-णाच्या थाळीनंतर आणखी एक झोप. ती होते ना होते तो संध्याकाळ. संध्याकाळी डोळे चोळीत उठून बसले. कशी हुडहुडी भरत होती अंगात. आजच पहाटे फैजाबादला, वर्तमानपत्रवाला पोरगा ' ताजी बातमी ' देऊन गेला होता. त्यात बातमी होती-- बलुचिस्तानमध्ये बर्फ पडला आहे. एक थंडीची लाट येत आहे. या ठिकाणी, त्या ठिकाणी किती पाऊस पडला. घाबरून गेले मी. थंडीची लाट. आगगाडीच्या

डब्यातही येऊन घुसेल का ? कदाचित नाहीही येणार.

गोरज मुहूर्त. दूर अंतरावर धुळीचे लोट उठत होते. चारी दिशांना अंधूक दिसत होते. त्या अंधूक प्रकाशामागेच घनदाट जंगलाच्या खालून, पश्चिमेला आकाशात म्लान सूर्य अस्तास जात होता. डब्यात एका कोपऱ्यात आक्का शांतपणे बसल्या होत्या.

बेचैन मनाची समजूत घालून त्याला शांत करण्याचा मुहूर्त म्हणजे दिनान्तरीचा हा मुहूर्त. मनातील सर्व बेचैनी शांत करून, कोणत्या तरी तन्मयतेत मन बुडवून टाकते ही वेळ. कसं काय, त्याचा काही हिशोब लागत नाहीं. अर्धवट जाग आणि अर्धवट चैतन्यशून्यता यांच्या एका अद्‌भुत अशा आत्मविस्मृतीचा अनुभव प्रत्ययाला येतो. एकाएकी सुगंध आणि दुर्गंध यांच्या मिलावटीचा एक चमत्कारिक वास येऊ लागला आणि त्याने माझी मिजास बिघडवून टाकली. मी डोळे उघडून पाहिलं; समोरच्या बाकावर समोरासमोर डोक्याला डोकं लावून बसून--चिलमीचं भांडं ओळखते मी--श्रीमान मारवाडीद्वयाचं आलटूनपालटून चिलीम ओढणं चाललं होते. त्यात खंड पडत नव्हता गांजा संपल्यावर पुन्हा त्यात भरत होते आणि चिलीम ओढूनओढून विस्तव विझवून टाकीत होते. हा सारा प्रकार अशा तऱ्हेने रात्री आठपर्यंत चालला होता.

आक्कांचा चेहरा गंभीर होता. त्या पाठमोऱ्याच बसल्या होत्या. आणखी जास्त वळून बसण्यासाठी त्यांनी जरा हालचाल केली. घरी किंवा बाहेर निघाल्यावर वाटेत जिकडेतिकडे जशी काही आक्कांचीच मुलं पसरलेली असतात. सगळी त्यांचीच ' बाबा ' आणि ' बाळ '. अगोदरच दिवसा आक्का त्या दोघांना म्हणाल्या होत्या, " बाबांनो, तुम्हांला स्वयंसेविकांची गरज असली तर आम्हांला सांगा, तुमच्या सेवासमितीच्या कामात दररोज काही वेळ आम्ही दोघी मदत करू शकू. काय खरं ना राणी ?" मी उत्तरले, " वाईट काय त्यात ? परत जाण्याचा खर्च दिला म्हणजे झालं. "

सेवाधर्माबरोबर स्वार्थ जोडण्याचा माझा प्रयत्न पाहून आक्का थोड्या विचलित झाल्या. एकसारखं त्या ' बाबां'चे कार्य किती थोर होते हे पुनःपुन्हा वर्णन करून सांगत होत्या. आणि त्याच ' बाबां'चे हे असे वागणे ? गांजा ओढण्याचा कार्यक्रम संपल्यावर वल्लभदामकडच्या मस्तपैकी थाळ्या मागवून त्या मांडीवर घेऊन दोघे बसले. शेवटी बोकाणे भरून जेवण संपवून जीवघेणी घाणेरडी ढेकर देता देता दादांना म्हणाले, " अहो महाशय, खास ऑर्डर देऊन आम्ही परोटे करवले आहेत.

पैशाची काळजी करू नका." असे सांगितले. "जे काही उत्तम असेल ते आणा. घरीसुद्धा असा परोटा कधी खाल्ला नव्हता. गत वर्षी मी माझ्या वाईफला घेऊन गेलो होतो. तेव्हा वाटेत चांगलं जेवण मिळालं नाही. आजचं जेवण फार चागलं आहे. घरचंच जेवल्यासारखं वाटतं. परंतु पैसे मात्र थोडे जास्त घेतले."

मी म्हणाले, " खर्च कोणाचा ते विचारा ना आक्का. त्यांचा स्वतःचा की सेवा-समितीचा ?" आक्कांनी तोंड फिरवले.

अजूनसुद्धा आगगाडीच्या हादऱ्यांमुळे डब्याच्या लाकडावर आपटून शिळे झालेले हार त्यांतील मोगरा आणि जुईचा सुगंध डब्यात पसरवीत होते. गरम कपड्यांच्या आतदेखील थंडीने हाडे गारठून जात होती. लाकडाच्या आणि काचेच्या सर्व खिडक्या बंद करून, कांबळे पांघरून, अंगाचे मुटकुळे करून झोपले होते, तरी थंडी-पासून बचाव होत नव्हता. दोन्ही गुडघे दुमडून छातीशी घेतले. कांबळे डोक्यावरून घेतले. कारण, मी ऐकले होते श्वासाच्या उष्णतेमुळे लवकर ऊब येते. पण छे—— निःश्वाससुद्धा गारठून त्याचा बर्फ झाला जणू. म्हणजे शेवटी आम्ही बलुचिस्तानला जाऊन पोचलो की काय ? असं वाटतंय की जणू काही बर्फावरूनच चालत होते. हात थंड पडले. पाय जड झाले, डोकेसुद्धा सुन्न झाले. नाही, आता अगदी सहन होत नव्हते. थोडेसे झोपण्यासाठी किती या यातना ! त्यापेक्षा उठून जागत बसलेले पुष्कळ बरे. थंडीने हुडहुडत मी उठून बसले. गाजावाजा करून दुसऱ्यांना जागे करून गप्पागोष्टी सुरू केल्या. बाकी रात्र कशीबशी निघून गेली. सर्वजण एकाच गोष्टीची चेष्टा करीत होते. चारी बाजूंनी कडेकोट घट्ट बंद असलेला हा डबा आणि तिच्यात हे हाडाला झोंबणारं वारं आलं तरी कुठून ? जाऊ दे झालं. जयजय श्रीविश्वेश्वर! गाडी हरिद्वारला येऊन थांबली. सामानसुमानाची उतराउतर, चढवाचढव करून दोन टांग्यांत स्वार होऊन आम्ही चौघे निघालो कनखळला.

दादा म्हणाले, " रामकृष्ण मिशनकडे चलायचं." रामकृष्ण मिशन म्हटलेले टांगेवाल्याला समजले नाही; त्याने विचारले, " मिशन काय म्हणता ते मला कळत नाही. बंगाली दवाखाना ?"

दादा म्हणाले, " हो, हो, तेच. तिथंच चल." इथले लोक रामकृष्ण सेवाश्रमला बंगाली दवाखाना म्हणूनच ओळखतात. दुसरे काही म्हटले तर त्यांना कळत नाही. गोंधळतात ते. स्वच्छ पक्क्या रस्त्यावरून टगबग, टगबग टांग्याचा घोडा धावत होता. भोवतालचे दाट धुके अजूनही निवळले नव्हते. रस्त्यात लोकांची वर्दळ अजूनही

सुरू झाली नव्हती. गंगामातेचा जयजयकार करीत झाडूवाले रस्त्यावरून झाडू मारीत होते. लाकडी चिपळ्यांचा आवाज करीत, स्वतःशीच मीराबाईची भजने गात, रस्त्याच्या एका बाजूने एक वेडा बैरागी चालला होता. त्याच्या खांद्यावरची पातळ अशी नामावली वाऱ्याने खाली घसरायची, त्याचे त्याला भानच नव्हते. बांधलेल्या पाटांतून गढूळ पाण्याचा स्रोत साऱ्या शहरामधूनच वाहात होता. बरोबर त्याच रस्त्याने टांगा चालला होता. हीच वाटतं गंगा. हरिद्वारच्या गंगेचं वर्णन किती ऐकलं होतं. कल्पनेनं त्याची किती चित्रं रेखाटली होती मी. आणि आज प्रथम तिचं दर्शन होताच मनाला धक्काच बसला. या गढूळ पाण्यावरून झेंडूच्या फुलांचे पिवळे हार वहात जात होते. कुणाच्या पूजेचे निर्माल्य गंगेच्या पात्रात सोडले होते कोण जाणे ? आणि ते धावत जातंय तरी कुठं ? कुणीही त्यांना अडवू शकत नव्हते. हात झटकून बाजूला वळून सटकत होते ते हार. खरंच की, ते काय अजूनही दिसताहेत. झाडांच्या बुंध्यांमधून, ते काय, ते काय दिसताहेत, ओह......आः......आता गेले पुलाच्या पलीकडे......दृष्टीच्या आड झाले.

सभोवती पिवळ्या रंगाचा तट असलेल्या रामकृष्ण सेवाश्रमापुढे टांगा येऊन थांबला.

अगोदरपासूनच इथल्या स्वामीजींना कळवले होते. ते आले आणि आमच्यासाठी राखून ठेवलेल्या तंबूत आम्हांला घेऊन गेले. आंबराईतील झाडाखालच्या सावलीत ओळीने कितीतरी तंबू बांधले होते. आंब्याच्या झाडांच्या पानांमधून टप् टप् दवाचे थेंब पडत होते, तंबूवर, आमच्या डोक्यावर आणि तोंडावर. ओलसर गवताखाली चिखल होता, आणि पावलागणिक 'छप छप ' असा आवाज येत होता. दोन दिवसांपूर्वी जोराचा पाऊस येऊन गेला होता. अनुभवानंद स्वामी म्हणाले, " ऊन पडल्यावर सर्व वाळेल. खालची जमीनसुद्धा घट्ट होईल. चला आधी गरमगरम चहा घ्या. काय थंडी आहे. जरा बरं वाटेल."

आंब्याच्या झाडाखालील तंबूपासून जरा अंतरावरच स्वयंपाकघर होते. स्वयंपाकघराच्या पुढच्या व्हरांड्यात दर्भासने मांडली होती. टिनाच्या छोट्या मगमध्ये गरमगरम चहा मिळाला. एरवी गरम चहा भरलेला टिनचा मग धरण्यासाठी पदर ओढून हातात घ्यायची आणि आता नुसत्या हातांनी मग धरला तरी थंडीने बोटे वाकडी होतच होती. एवढ्या थंडीत ती सरळच होईनात. चहाचा मग धरायचा तरी कसा ? आमच्यापैकी दादाच जास्त हैराण झाले होते. त्यांच्या दोन्ही हातांची बोटे

थरथरत होती. पोळीचे तुकडे करताना पोळी बोटातून निसटत होती. सेवाश्रमामधले संन्याशी म्हणजे सेवाधर्माचे मूर्तिमंत प्रतीक. प्रत्येक यात्रेकरूसाठी ते प्रयत्नांची शिकस्त करीत होते. एका ब्रह्मचाऱ्याने एका मोठ्या लोखंडी पळीत जळत्या लाकडाचे धगधगणारे निखारे समोर आणून ठेवले. त्या निखाऱ्यांवर हात उलटसुलट करून शेकले आणि नंतर चहाचा मग तोंडाला लावला. पोळी आणि गूळ अमृतासारखा वाटत होता आणि मनात विचार येत होता अशीच एखादी शेगडी कपड्याच्या आत गळ्यात अडकवता आली तर स्वर्गसुखच लाभल्यासारखं होईल !

आम्ही सर्व आमच्या तंबूत परत आलो. एक, दोन. तीन, चार, असे नंबर होते सर्व तंबूंना. एक नंबरचा होता आमचा तंबू. साऱ्या जमिनीवर चटई अंथरलेली, स्प्रिंगच्या कॉटस्, जणू काही एक मस्त मोठं घरच ! घरचा आराम पण बाहेरची कटकट नाही या दोन्ही गोष्टींमुळे तंबूचा मोह मला पहिल्यापासूनच होता. मी अगदी खूष झाले.

आक्कांना स्वस्थ बसवेना. त्या लागल्या कामाला. सामानसुमान आवरून सर्व नीटनेटके ठेवायला हवे होते. सध्या काही दिवस आमचा सारा संसार इथेच रहाणार होता. सामानाचा ढीग पडला होता. एवढं सारं सामान आलं तरी कसं बरोबर ? हावरा स्टेशनवर आगगाडीतील बाकाखाली भाचरांनी सामान कसेबसे ढकलून दिले होते तेव्हा कळले नाही. तरी बरे या वेळी सामान जास्त होऊ नये म्हणून आक्कांनी कडक लक्ष ठेवले होते. पुष्कळ जागी हिंडा-फिरायचे होते, सामान जितके हलके राहील तितके चांगलेच. पुन्हापुन्हा पत्र लिहून त्यांनी मला सूचना केली होती, " दोनचार जरुरी कपड्यांव्यतिरिक्त जास्त काही सामान बरोबर घेऊ नकोस. अंथरुणा-पांघरुणाची गरज नाही. मी घेईन भरपूर, त्यातच तुझी सोय होईल. "

दादा खुणा करून बोलत होते, " हे आणखी काय पहाता ? ही हिरवी मिलिटरी पिशवी पहा. ही करंडी उघडून पहा. नाही, अमूक एक वस्तू नाही त्यात."

सामान आवरण्याचा बहाणा करून मी ती पिशवी उघडली. तांब्या, मग, पाण्याचा खुजा, बिस्किटांचा डबा, किटली, स्पिरिट, स्टोव्ह, पंच्याच्या कोपऱ्यात बांधलेली हळद, लाल तिखट, पितळी, तांब्या भरून तांदूळ, त्यातच मोहरीच्या तेलाची काचेची बाटली घट्ट बसवलेली, मीठ, सुरी, विळी, कुकर, चुना,–परप्रांतात पान खायला नाही मिळाले तर– जादूगाराच्या पोतडीप्रमाणे पिशवीतून एकेक सामान बाहेर निघतच होते. लोखंडाची सांडशी, उलथणे, रॉकेल तेलाचे दोन कंदील,

डोक्याला लावायचे तेल, ग्लिसरिन, पाचक गोळ्या –एक ना दोन, किती न काय !

दादा म्हणाले, "माणशी दोन डाग घ्यायचे ठरले होते. तेच बरोबर होते. तुमच्या आक्कांनी स्वतःच सर्व आवरायला जाऊन शेवटी ह्यातले त्यात आणि त्यातले ह्यात करून काय गोंधळ केलाय ! मी आपला एक शांत माणूस, बसून नुसता बघत होतो. मोज बघू. सर्व मिळून किती वस्तू आहेत त्या."

मी मोजून पाहिल्या–जास्त नव्हते सामान– प्रत्येक दोनच्या ऐवजी प्रत्येकी फक्त सहा डाग झाले होते. आक्का तिकडे बाहेर जरा कामाला गेल्या होत्या. त्या येऊन म्हणाल्या, " राणी ग, तुझी शाल कुठंय ? तुझ्या अंगावर दिसत नाही ती ! "

हरिद्वार स्टेशनवर झोंबरे वारे होते. माझ्या अंगात खरखरित कांबळ्यांचा लांब कोट होता. म्हणून आक्कांच्या शुभ्र शालीवर मी माझी शालदेखील लपेटून दिली होती. मला वाटले दोन शालींमुळे त्यांना थोडी ऊब येईल. इतक्या उशिरा लक्षात आले ! वरची शाल केव्हा, कुठे पडली कळलेच नाही. शोधून शोधून आक्का अगदी हैराण झाल्या. कुठेसुद्धा सापडेना तेव्हा आक्का म्हणाल्या, "काय झालं असेल ?" मी म्हणाले, " एकच शक्यता आहे. टांग्यात राहिली असेल, उतरताना आपण कुणी पाहिलं नाही. "

" केव्हा पडली आणि कशी पडली मुळीसुद्धा कळलं नाही मला. " आक्कांची काळजी वाढतच चालली होती.

मी त्यांना म्हणाले, " असं समजा की तीर्थक्षेत्री येऊन प्रथम शालच दान करून टाकली म्हणजे झालं."

परंतु त्यांना ते पटलं नाही. इकडेतिकडे त्या आपल्या शोधीतच होत्या. चादर, उशी झटकून पहात होत्या आणि दुःखी होऊन म्हणत होत्या, " अरेरे काय केलं मी हे ? सध्याच्या दिवसांत एकएक वस्तू जमवायला किती त्रास पडतो. "

नेमक्या याच वेळी पाठीमागे हात लपवून टांगेवाला तंबूच्या बाहेर हजर झाला, " माईजी, बकशीस मिलना चाहिए."

गालातल्या गालात हसत आक्का म्हणाल्या, " हाँ, हाँ, जरूर बकशीस मिलेगा." एवढे बोलून घाईघाईने पुढे येऊन आक्कांनी शाल हातात घेतली आणि त्या पुन्हा तंबूत शिरल्या.

दादा म्हणाले, " आश्चर्य आहे. टांगेवाल्याने स्वतः शाल परत आणून दिली. नसती दिली तर आपण काय केलं असतं ? परकी जागा, परके लोक ! "

एव्हाना आक्का निश्चित होऊन डोक्याला तेल लावीत बसल्या होत्या. थोड्या

वेळाने त्या म्हणाल्या, " चला आता गंगास्नान करून येऊ या. इतके करून इथं आलो. आज पहिला दिवस. गंगास्नान करायचं नाही म्हणजे काय ! " कपडे, पंचा वगैरे गोळा करण्याच्या आंघोळीच्या तयारीत आक्कांना पाहून स्वामीजी धावत आले. " छे, छे, वाटेल ते झालं तरी हे काम आज करू नका. आज तर नाहीच नाही–फक्त आजच का–उद्याही नाही. परवाही नाही. आणखी चांगले तीनचार दिवस गंगेत उतरायचं नाही. दोन दिवसांपूर्वीच मसुरीला चांगला सहा इंच बर्फ पडलाय. माहीत आहे ? बर्फाचं पाणी गंगेत वाहून येतंय. किती गढूळ झालंय पाणी ! येताना वाटेत पाहिलंत ना ? अशा वेळी गंगेत उतरणं म्हणजे स्वतःहून आजाराला बोलावण्यासारखं आहे. फिरायला आला आहात. पुण्यकर्मही करायचंय– मध्येच आजारी पडलात तर काय होणार आहे सांगा बघू. त्यापेक्षा बादलीत थोडं गरम पाणी घेऊन–नळाला पाणी आहेच, त्यातच विसण घाला आणि घरातच स्नान उरकून घ्या म्हणजे झालं. "

काय बोलणार यावर ? नाराज होऊनच आक्का मागे फिरल्या.

नवीन जागा आल्यावर एकाच जागी ठाण मांडून बसायला मला आवडत नव्हते. स्नान झाल्यावर बाहेर ऊन असेल या आशेने मी बाहेर येरझारा घालीत होते. समोरच्या रस्त्यावरून बँड वाजवीत कसली तरी मिरवणूक चालली होती. काय आहे ते पहाण्यासाठी इकडचे तिकडचे सर्वच लोक त्या बाजूला धावले. हातात फणी घेऊन केस विंचरीत विंचरीत आक्कांना बरोबर ओढून घेऊन, मीही धावले " मी का म्हणून मग एकटा थांबू ? " असे म्हणत अंथरुणातून उठून दादाही आले प्रवासाचा शीण घालवण्यासाठी म्हणून जरा लवंडले होते ते.

मस्तपैकी मिरवणूक चालली होती साऱ्या रस्त्यावरून. मिरवणुकीच्या पुढे झगझगित पोशाखांत सजलेले बँडपथक होते. त्यांच्या मागे झेंडूची फुले लावलेल्या लांब बांबूवर भगव्या रंगाच्या पताका फडकवीत शंभर एक साधू जोडीजोडीने चालले होते. मध्यभागी सुसज्जित हत्तीवर चांदीच्या अंबारीत मठाचे महन्त बसले होते. दोन्ही बाजूंनी दोघेजण चवऱ्या ढाळीत होते. डुलत डुलत हत्ती चालला होता, त्याच्या चालीने अंबारी डुलत होती, महन्त डुलत होते, झेंडयावरील झेंडूच्या माळा डुलत होत्या. तीर्थयात्रेसाठी महन्त बाहेरून आले होते म्हणून त्यांचे एवढे मोठे समारंभपूर्वक स्वागत. जवळच उभा असलेला एक रहिवासी म्हणाला, " आता रोज सकाळसंध्याकाळ अशा कितीतरी मिरवणुका पहायला मिळतील. एकएक करून

सर्व संप्रदायांचे महन्त येतील कुम्भमेळ्याला."

दुपारी प्रसाद खाल्ला. साधा वरणभात, भाजी, पोळी, चटणी आणि दही. सर्व शाकाहारी. पण काय त्याची चव होती. सर्व स्वामीजी मिळून स्वयंपाक करायचे, वाढायचे, सर्व कामाची जबाबदारी घ्यायचे, त्यांची कामावरची श्रद्धा अगदी अंतरी जाऊन भिडते. म्हणूनच किती सहजपणे समाधान मिळते. सगळीकडे कसे अगदी लखलखित—स्वच्छ. स्वयंपाकघरात कुठेदेखील चिखल, पाणी कशाचे म्हणून नाव नव्हते. स्वयंपाकघराच्या समोरच फुलाची बाग होती. बगीच्याच्या मध्यभागी राम-कृष्णांचे मंदिर होते. मंदिरामध्ये रामकृष्ण, श्रीमाताजी आणि स्वामी विवेकानंद यांचे फोटो लावले होते—फुलांनी व चंदनाने ते सुशोभित केले होते. छोटेसे सुंदर मंदिर, मंदिराच्या दरवाज्याला लावला होता चिकाचा पडदा, कसे थंड आणि शीतल वाटत होते. आत जाऊन तिथे थोडे बसावे असे आपसूकच मनात येत होते. दर-वाज्याबाहेर एका कोपऱ्यात एका लाकडी पेटीमध्ये प्रसादाचे चंदन आणि तीर्थ ठेवले होते. स्नान संपवून एकएक स्वामी येत होते. पेटीचे झाकण उघडून तीर्थ घेऊन, कपाळी चंदनाचा टिळा लावून पुढे जात होते. त्यांचे पाहून आक्का आणि मीदेखील गेलो.

फुलबागेच्या मध्यभागी एक उंच आम्रवृक्ष होता. वृक्षाचा वरचा भाग एका वेलीने झाकळून टाकला होता. वेलीचे नाव मला माहीत नव्हते. तरी ती नेहमी पाहिलेली होती—हौशी लोकांच्या बागेच्या फाटकावर लांब लांब कळ्यांप्रमाणे झुपकेदार फुले असतात तिची. गडद भगव्या रंगाची फुले. जणू काही आंब्याच्या हिरव्यागार पानां-वर संन्याश्याची भगवी शाल पसरली होती. खूप दुरूनच दिसत होती ती. आज जेव्हा मी बाहेर गेले होते तेव्हा दुरून ही भगव्या रंगाची ध्वजा पाहूनच मी घर ओळखले.

खरोखरच सेवाश्रम हे. गरीब आणि साधूलोकांचे हॉस्पिटल. हरिद्वार म्हणजे एक तपोभूमी, किती साधू येत तिथे. साधू झाले तरी त्यांना आजारपण यायचेच; औषधपाण्यावाचून त्यांना किती त्रास व्हायचा—त्या सर्वांना रोगमुक्त होऊन आराम मिळावा या उद्देशाने हे हॉस्पिटल उघडले होते. स्वामी विवेकानंदांची इच्छा होती. ती या ठिकाणी किती साधुसंतांनी आपले अंतिम निःश्वास सोडले असतील हे तिथे पडलेल्या फुटक्या तुटक्या करवंटयांच्या कमंडलूवरून लक्षात येत होते. गरीब भिकाऱ्यालासुद्धा इथे जागा मिळते. टांगेवाल्याचे हातपाय तुटले तो येतो इथे. भिकाऱ्याला कॉलरा झाला तो येतो इथे! आलेले यात्रेकरू एकदम रोगाच्या तावडीत सापडून हैराण झाले तर तेही येतात इथेच.

सेवाश्रमच्या मागच्या बाजूला भाजीचा मळा होता. मळा भरून पानकोबी, फुलकोबी, मुळे, वांगी, टोमॅटो, कांदे, पाहून मन अगदी उल्हसित झाले. इतके मोठ-मोठे कोबी–आमच्या बीरभूम जिल्ह्यातील लाल मातीत अशा मोठ्या कोबीची कधी कल्पनाही करता येत नाही आणि इथे किती थोड्या प्रयत्नांनी इतकी चांगली भाजी पिकते. त्याशिवाय इथे सेवाश्रमाच्या आतच जागोजाग किती नाना तऱ्हेची झाडे होती–लिंबू, केळी, बेल, आंबा, कडुनिंब, आवळा–किती आणि काय ! झाडा-झाडांनी जमीन झाकून टाकली होती. शांत परिसर आणि शांतपणे चाललेले घर-काम. इथले लोकच स्वत: भाज्या चिरतात, आंब्याच्या दिवसांत आंब्याचे लोणचे घालतात. मीठ लावलेले आवळे ताडपत्रीवर टाकून उन्हात वाळवून ठेवतात. चांगली चवदार मुखशुद्धी होते. डाळ, मिरची निवडून पाखडून कोठारात भरून ठेवतात. या सर्व कामाबरोबरच आजाऱ्यांची सेवा आणि पाहुण्यांची सरबराई. घड्याळाच्या काट्याप्रमाणे सर्व काही शांतपणे न बोलता होत असते. हे सर्व पाहून आम्ही बायका सरळसरळ बिनधोकपणे हार मानीत होतो.

संध्याकाळी बाहेर पडले आणि फिरत फिरत रस्त्यावर आले. घराच्या समोरच 'निर्वाणी संप्रदायाचे मोफत वाचनालय' होते. इथे संन्यासी, यात्रेकरू सर्वांना सर्व वर्तमानपत्रे आणि पुस्तके फुकट वाचायला मिळत होती. रस्त्यावरच अशी अनेक हंगामी वाचनालये उघडली होती. मोकळी जागा, छत, खुर्च्या, टेबले, विजेचे दिवे, दोरीला अडकवलेली वर्तमानपत्रे, रंगित चित्रे, पुस्तके कशाची म्हणून कमतरता नव्हती, कुम्भमेळा संपेपर्यंत दिवसरात्र सतत उघडी राहणार होती ती वाचनालये. येताना वाटेत जे पाहिले ते वाचनालय ' उदासी संप्रदाया'च्या एका पंजाबी साधूने, पन्नास हजार रुपये खर्च करून उघडले होते.'

निर्वाणी आखाड्यामध्ये डोंगरावर, ओळीने साधूसंतांसाठी कुटी बांधल्या होत्या. चारी बाजू बंद, फक्त एकच दरवाजा असलेली छोटी छोटी घरकुले होती ती. दुहेरी छपराच्या लांबट मोठ्या घराचे लहान लहान भाग पाडल्यासारखे वाटत होते. कुणी त्यात एकट्याने रहावे किंवा चारपाच जणांनी मिळून रहावे. आतापर्यंत पुष्कळ आलेही होते. लवकरच आणखीही साधू येणार होते. शेवटी जागेचीच टंचाई जास्त भासते. तेव्हा नाइलाज म्हणून सर्वांचीच धक्काधक्की झाडाखाली होते. प्रत्येक कुटी-मध्ये थंडगार जमिनीवर धुनी पेटलेली असायची. माझ्या मनात यायचे, खरेच आहे, नाहीतर हे सर्व रहाणार तरी कसे ? धुनीच्या विस्तवामुळे घराला चांगली ऊब येत असेल.

निर्वाणी आखाड्याच्या विरुद्ध दिशेला रस्त्याच्या या कडेलाच होता 'हरिहर मठ' दगडी उंच शिवमंदिराच्या कळसाचा त्रिशूळ गगनाला भेदून मेघापर्यंत जाऊन भिडला होता. मंदिरामध्ये शिवलिंग होते. आणि चारी बाजूंच्या चार भिंतींवर श्रीगणेश, पार्वती, विष्णू आणि सूर्य यांच्या जयपूरच्या कारागिरांनी तयार केलेल्या दगडी मूर्ती होत्या. मंदिराचा दरवाजा बंद झाला होता. दाराच्या लोखंडी गजांमधून डोकावून मी देवदर्शन घेतले. आत तेलाचा चकचकित रंग लावणे चालले होते; बाहेरून नव्याने यात्रेकरूंना मुद्दाम आकृष्ट करून घेण्यासाठी गुलाबी, निळा, हिरवा, पिवळा, जांभळा या साऱ्या रंगांचे लेप दगडी भिंतींवर आणि दरवाज्यावर चढत होते.

आक्का म्हणाल्या, " चल, मंदिराला प्रदक्षिणा घालू. "

जरा पुढे गेले नाही तोच आक्कांनी मला मागे खेचले अन म्हणाल्या, "आणखी पुढं नको जाऊ. शिवमंदिराला अर्धीच प्रदक्षिणा घालतात – हाच नियम. "

मंदिराच्या पाठीमागे एक छोटेसे दालन होते. समोर मैदान आणि बाजूला एक अंगण. अंगणाला लागूनच होती एक पक्की बांधलेली विहीर. उभ्या असलेल्या वट-वृक्षाने सारी विहीर झाकून टाकली होती. दालनाच्या समोरच चांगला रुंद व्हरांडा होता. दुपारचे ऊन पडले होते तिथे. त्या उन्हातच तिरकी अशी बाज टाकून एक वृद्ध साधू पुस्तक वाचीत पडले होते. जिन्याच्या दोन्ही कडांना कनक धोत्र्याची झाडे होती. गडद जांभळ्या रंगाच्या बऱ्याच कळ्या आलेल्या होत्या. एक फूलदेखील फुलले होते. कदाचित उद्या ते पूजेसाठी लागेल. काय सुंदर होती ती फुलं ! जणू काही कुणी उचलून एकात एक बसवली होती.

पायऱ्या उतरून आम्ही साधूजवळ गेलो. तोंडासमोरचे पुस्तक बाजूला करून साधूंनी आमच्याकडे पाहिले आणि म्हणाले, " मेहरबानी करके बैठिये " बोलता बोलताच हाताने खुणवून त्यांनी आम्हांला व्हरांड्याच्या जमिनीवर बसायला सांगि-तले. एक एक करून आम्ही सर्वच बसलो. वृद्धाचे बोलणे अतिशय मृदू होते. वेदान्त संप्रदायाचे हे मंदिर होते. ते साधू म्हणाले, " उद्या अकराच्या गाडीने महन्त येणार आहेत. तेव्हा आलात तर ते दिसतील. मेळ्यापर्यंत ते इथंच रहातील. सेवाश्रम तर शेजारीच आहे. जेव्हा मनात येईल तेव्हा या अन त्यांच्याशी गप्पागोष्टी करा. "

हरिहर मठातून बाहेर येऊन आम्ही पाहिले – रस्त्यातून आणखी एक मिरवणूक चालली होती. पुन्हा सर्व तेच. बँडपथक, हत्ती, घोडे, उंट, गायी, बकऱ्या, साधुसंत, दिगंबर साधू, चवऱ्या, ध्वजदंड, चांदीचा दंड, – यांच्या रक्षकांच्या हातांत चांदीचे

दंड असतात – हेसुद्धा सर्व साधूच, जमेल तसे धापा टाकीत वर चढत होते. सर्व रस्ता अडवून हे पथक चालले होते.

हातात वहीपेन्सिल घेऊन नागा साधूचे रेखाचित्र रेखाटीत मी चालू लागले. जाता जाता त्यांच्याच पैकी एकाकडून कळले की हे पथक काशीहून आले होते. गेली तीन वर्षे हे असेच पायीपायीच येत आहेत. घाईगर्दी नाही, आरडाओरडा नाही, दिवसा तीनचार तास पदयात्रा करायची, रस्त्याच्या कडेलाच थांबायचे, विश्रांती घ्यायची, जेवणीखाणी करायची, झोपायचे आणि पुन्हा दुसऱ्या दिवशी वाट चालू लागायचे. वाटेतली खेडी जवळजवळ असली तर तिथलेच लोक यांची सेवा करीत. असे करीत करीत ते आज हरिद्वारला पोचले होते. काही महिने ते इथेच मुक्काम करणार आणि नंतर असेच परत जाणार. दुसऱ्या कुम्भमेळ्यापर्यंत या नागा साधूंचे शरीर उघडे राहणार. थंडीतले हे झोंबरे वारे अंगाला किती बोचते. हातातल्या आणि छातीतल्या अगदी आतल्या मांसपेशींनासुद्धा राहून राहून कापरे भरत होते. गळ्यात झेंडूच्या माळा, दोन्ही हात मागेपुढे हलवीत ते चालले होते. जणू छोटी बाळे एकेक पाऊल टाकून चालली होती. त्यांच्या बरोबर चालत चालत त्यांना हरिद्वारच्या वेशीच्या जरा पुढे सोडून आम्ही परत आलो.

अजून हरिद्वार पाहून झाले नव्हते. राहू दे. मग पाहता येईल. आपण कोणखळला आहो. आधी इथलेच पाहून संपवू या. एकदा कुणीतरी, केव्हातरी कुठेसे म्हटले होते ' कोणखळ ' हे नाव का पडले ते माहीत आहे ? ही जागा इतकी पवित्र. असा कोणता ' खल ' असेल की ज्याला इथे येऊन आळवणी केल्यावर परमेश्वर पावला नाही. म्हणून याला नाव पडले ' कोणखळ '.

दक्षराजाचे राज्य म्हणून या जागेची प्रसिद्धी आहे. दक्षराजाची कन्या सती हिचा जन्म इथलाच, विवाह आणि मृत्यूही इथेच. सेवाश्रमातून बाहेर पडून, बाजारातून चालत येऊन शहराच्या बाहेर पडलो आणि दक्षघाटावर येऊन पोचलो. पूर्वी इथे राजप्रासाद होता – आतापर्यंत त्याची चिन्हे कोण संभाळून ठेवणार ? तरीसुद्धा रुंद तटाच्या पडक्या, विशाल दरवाज्यावरून मनात त्याची सहज कल्पना करता येत होती. वर पाहत पाहत विमनस्क होऊन मी पुढे चालले होते. इतक्यात एक काळीशी, प्रौढ, सुंदर संन्यासिनी अगदी अकस्मात माझ्या समोर येऊन उभी राहिली. तोंडभर हसू. जणू किती दिवसांची जुनी ओळख आहे. ती म्हणाली,

" कधी आला तुम्ही ? "

मी थक्कच झाले. उत्तरले, " आज. "

" छान, छान. "

आक्का म्हणाल्या, "तुम्ही तर बंगाली दिसता. "

" हो ग, मी बंगालीच आहे. तीस वर्षं इथं सतीघाटावरच आहे मी, येणार का पहायला ? चला ना माझ्याबरोबर. मी घेऊन जाते. " बोलता बोलता एकदम डोळे, तोंड विस्फारून, तोंड वाकडे करून, " मी – हा ... हा ... अं ... अ " असे बोलत हेल काढीत ती आणखीनच जवळ आली, घाबरून जाऊन मी मागे सरकले आणि आक्कांचा पदर घट्ट धरून ठेवला.

तीर्थयात्रेला आलो होतो, नवीन जागा, नवीन वातावरण, जे पाहत होतो ते सर्वच अपूर्व वाटत होते. अगणित साधुसंतांच्या किती अलौकिक गोष्टी पहायच्या, ऐकायच्या मनात होते – तर पहिल्याच दिवशी हे काय ? दादा वगैरे बरेच पुढे गेले होते. सन्यासिनीला डावलून, भराभर पावले टाकीत मी त्यांना गाठले. आम्हांला उशीर झालेला पाहून शगोमहाराज मागे परत येत होते, ते जरा चिडूनच म्हणाले, " तीर्थक्षेत्री आला आहात, रस्त्यात, घाटावर असे प्रकार पुष्कळ पहायला मिळतील, नुसते पाहूनच पुढं चला, कधीही थांबू नका. "

मन कसे उदासवाणे झाले. इथे जर सर्वच असे वेडसर भेटणार असतील तर त्यांतले चांगले निवडून तरी काढायचे कसे ? ही आत्ताच एक हास्यवदना पुढे आली तेव्हा किती बरे वाटले होते; क्षणात तिने भयभीत करून टाकले.

दक्षघाटावरचे थंडगार पाणी एक ओंजळभर घेऊन डोळ्यांना, कपाळाला लावले. घाट चांगला रुंद बांधलेला होता. नदीचा किनारा झाकून टाकून हा पुरातन वटवृक्ष गंगेवर झेपावत होता. नदी अगदी कोरडी पडली होती. फुलवेलींच्या आवरणाखाली जेमतेम थोडेसे पाणी पायऱ्यांजवळ थबकून शिल्लक होते. गरज ओळखून कनाल-डिपार्टमेंट पाणी सोडीत असे. दोन दिवसांनंतर हीच शुष्क गंगानदी पाण्याने दुथडी भरून खळखळ वाहू लागेल. शिवरात्रीला यात्रेकरू या घाटावर पुण्य स्नानासाठी येतील. रातोरात दरवाजा उघडा मिळाल्यामुळे गंगा याच वाटेने धावू लागेल.

घाटाच्या काठाशी शिवसतींची दोन वेगवेगळी मंदिरे आहेत. इथेच का तो राजवाडा होता ? असेल कदाचित. राजवाड्याला लागूनच तर घाट असतो ना ? कदाचित याच घाटावर अंतःपुरातून येऊन राजकन्या स्नान करीत असतील; पूजेच्या अगोदर दररोज सकाळी कुमारी सती आपल्या सख्यांबरोबर इथे स्नान करीत असेल. जुनी विटांची बांधलेली पडिक गच्ची मनात नाना चित्रे उभी

करते. मोठमोठ्या झाडांच्या सावलीने घेरलेला हा परिसर.........जरासे इथेच बसून थोडी विश्रांती घ्यावी असे मनात आले.

दक्षघाटानंतरच सतीघाट. ही सती म्हणजे ती सती नव्हे. ह्या मानवी सती. स्वेच्छेने किंवा अनिच्छेने पतीच्या चितेमध्ये ज्यांनी स्वत:ला जाळून घेतले त्यांचा हा घाट आहे. प्रत्येक सतीच्या स्मृतिप्रित्यर्थ एक हात, दोन हात, तीन हात अशा उंचीच्या लहानलहान मंदिरांची मालिकाच गुंफली आहे इथे. कित्येकांची नावे व तारीख आजही स्पष्ट दिसते तिथे. ही विटांची बांधलेली श्रेष्ठ-कनिष्ठ, लहान-मोठी, पडकी, पूर्ण स्मृतिचिन्हे असंख्य सतींची साक्ष अजूनही देतात.

आक्का म्हणाल्या, "जरा विचार करून पहा, किती थोर निष्ठावान होत्या त्या एकेकजणी." एवढे बोलून मानेवर पदर[1] धरून शक्य झाले तेवढ्यांच्या त्या पाया पडल्या.

दक्षघाट आणि सतीघाट पार करून गंगेच्या तीरातीराने चालत 'कोणखळ' मागे टाकून आम्ही पुढे निघालो. शशीमहाराजांना चालायला आवडायचे असे दिसले. आम्हांला पण आवडायचे. परंतु ते ज्याप्रमाणे लांब पावले टाकीत धावत सुटायचे त्याप्रमाणे आम्ही करायला गेलो म्हणजे आम्हांला धाप लागायची. पण बोलणार तरी कसे ? ओशाळे वाटायचे. उलट ते जेव्हा विचारायचे, "काय त्रास तर होत नाही ना ?" तेव्हा नसता आव आणून मी जोराने सांगायचे, "छे, नाही. मुळीसुद्धा नाही." आणि हलक्या आवाजात आपापसात कुरकूर चालायची.

शशीमहाराज म्हणाले, "इथून आणखी थोड्या अंतरावर सतीकुंड आहे. आणखी एखाद्या दिवशी घेऊन जाईन तिकडे. जंगलामध्ये एके ठिकाणी एक खळगा आहे, सध्या त्यात पाणी जमतं, लोकांचा असा अंदाज आहे की, हा खळगा म्हणजे पूर्वीचा यज्ञकुंडच आहे. इथंच दक्षानं यज्ञ केला होता. एका जागी वेदीसारखं काही विटांचं बांधलेलं पहायला मिळतं. अगदी दाट जंगलात लपलेली आहे ती जागा. ऐतिहासिक पुराव्यासाठी डोकेफोड कोण करतो, आपला विश्वास ठेवायचा की झालं."

चालता चालता 'पाणचक्की'पर्यंत येऊन पोचलो. गंगेला बांध घालून शहरा-मधून जो प्रवाह वाहत आणला होता त्याच्याच शक्तीवर ही चक्की चालवली होती. आणि ऐकका वस्तीतून लोक येऊन गहू दळून नेत होते. पोतीच्या पोती काहीही

१. बंगाली स्त्रिया नमस्कार करताना खाली येणारा पदराचा भाग मानेवर घेतात.

उपयोगी न पडता उगीच नाचत, गात गंगा नुसती वाहत जाईल तर तसं करायची तिला सोय नव्हती.

परत येताना शहरामधून वाहणाऱ्या पाटाच्या कडेकडेनेच आलो. दोन्ही बाजूंना भाजीचे आणि फळांचे मळे अगदी दाटीदाटीने होते. भाज्या आणि फळांची शेते अगदी गच्च भरली होती. लाल मातीच्या प्रदेशात राहणारे आम्ही, हिरव्यागार भाज्यांची रेलचेल पाहून मन भरून आले. रस्त्याच्या वळणावळणावर फराळाच्या दुकानांत मोठमोठ्या लोखंडी कढयांत म्हशीचे फेसाळ दूध उकळत होते. इतके दूध कित्येक वर्षांत पाहिलेसुद्धा नव्हते. युद्ध, दुष्काळ, पिकांचा अभाव, दारिद्रय, मारामारी, कापाकापी असल्या एकीमागून एक आलेल्या आपत्तींनी बंगालमधील सारे ऐश्वर्य नष्ट केले होते. पुस्तके वह्या काखोटीला मारून शाळेत जाणारी लहान लहान मुले इथे रस्त्यात पहाते. भिकारी मुले भीक मागत हिंडताना दिसतात, पण त्यांचे गाल कसे लाल टुकटुकित आहेत. ताज्या रक्ताचे तेज फाकलेले; काय त्यांच्या तब्येती ! दूध, पीठ, तूप जे खात होते ते सर्व ताजे आणि शुद्ध. मनात यायचे बंगालमधल्या लहान मुलांना आणून इथे सोडून द्यावे. काही दिवस ताजी हिरवी भाजी खाऊन जगू दे त्यांना. मला नेहमी भीती वाटते–त्यांचे ते क्षीण प्राण, त्यांची ती धुगधुगी छातीत टिकवून, ते या जगात किती दिवस टिकाव धरू शकतील ?

काही झाले तरी गंगास्नान आज करणार म्हणजे करणारच असा आक्कांनी हट्ट धरला होता. त्या म्हणाल्या, " इतकं गंगा गंगा करीत इतक्या दूर आलो अन त्या गंगेला जाण्यातच इतके अडथळे ! चला बाहेर पडू या कुणाला न सांगता सवरता. ' बर्फाचं पाणी बर्फाचं पाणी ' असं नुसतं ऐकतोय–काय प्रकार आहे तो जाऊन पाहू या तरी ! "

मी म्हणाले, " दादा काय म्हणतात ? "

" दादा आणखी काय म्हणणार ? त्यांना मी ओळखते. सुरवातीला थोडी हरकत घेतील, म्हणतील, " जाणार ? या थंडीत ते बरोबर होईल का ? तुम्हीच विचार करून पहा. माझी त्यात काय हरकत असणार ? "

" त्याउपर हेका धरून म्हटले, 'नाही, तरी' जाणारच, काय होणार आहे ? अन

काही होणार असलं तर ते होऊ देना, नंतर बघता येईल." तर दादा म्हणणार, "ठीक आहे. काय होणार अन काय होणार नाही याचा नुसता बसून विचार करण्यात काय फायदा ? गंगास्नान हाच तर तीर्थयात्रेचा खरा अस्सल भाग."

दादाच्या कुटुंबियांपैकी विशेष कोणी असते तर ते नक्की म्हणाले असते, "या सर्व बोलण्यानंतर गंगास्नान करून आजारी पडलात तर हेमबाबू म्हणतील," या थंडीत स्नान करणं बरोबर नाही असं मी अगोदरच सांगितलं होतं. सांगितलेलं मुळीसुद्धा ऐकत नाही तुम्ही. अन कुणाला त्रास झाला नाही तर ते म्हणणार." " मी तर तेच सांगितलं होतं – आणखी काय होणार ? गंगास्नानाचं माहात्म्यच निराळं."

परंतु दादा स्वतःच कबूल करायचे, " तू काहीही म्हण ताई, मी माझं मत कधीच देत नाही. दुसऱ्याचं ऐकून वागण्याचीच माझी जन्माची सवय. कचेरीमध्ये मी पक्ष-कारांचं ऐकतो, कोर्टात मॅजिस्ट्रेटचं ऐकतो, अन घरात तुझ्या आक्काचं ऐकतो."

लगेच पिशवीत कपडे घालून ब्रह्मकुंडात स्नान करण्यासाठी हरिद्वारकडे रवाना झालो.

इतक्या दिवसानंतर लक्षात आले आणि म्हणूनच चालता चालता मी आक्कांना विचारले, " खरंच की, आपण हे जे कुम्भमेळयाला आलो, ब्रह्मकुंडांत स्नानासाठी निघालो – कुम्भतरी काय अन ब्रह्मकुंडतरी काय ? त्यांचं महात्म्य काय ? "

दादा म्हणाले, 'ते माहीत नाही वाटतं ? सांगतो ऐक. समुद्रमंथन तर माहीत आहे ना ? देव अन असुरांच्या समुद्रमंथनाच्या वेळी किती धन, रत्न, लक्ष्मी – कुणाला काय मिळणार यासाठी हिसकाहिसकी चालली होती. समुद्रमंथनांतून निघता निघता एक अमृतपात्रही निघालं. असुर का अमृत ओळखणार ? ते तेव्हाही लक्ष्मीच्या मोहातच मग्न होते. इंद्रानं आपला मुलगा जयंत याच्याकडे ते अमृतपात्र घाईघाईनं दिलं 'अन ते घेऊन पळ काढ' असा इशारा त्यानं केला. आज्ञेबरहुकूम काम करणारा जयन्त, हातात पात्र घेऊन त्यानं लगेच पळ काढला. असुरांचा गुरू शुक्राचार्य, यांनी जयंताला पळताना पाहिलं आणि ते ओरडले – अरे मूर्खांनो, धरा, धरा त्याला. अस्सल वस्तू घेऊन तो पळतोय पहा. शुक्राचार्यांचं बोलणं ऐकून मंथनाचं काम तसंच सोडून असुर, जयंताच्या मागं धावले. प्राणपणाला लावून जयंतही पुढं धावत होता. आपलं एक वर्ष म्हणजे देवादिकांचा एक दिवस असतो. धावता धावता जयंत मेटा-कुटीला आला. सतत तीन दिवस धावल्यावर ते पात्र एके ठिकाणी ठेवून तो जरा विश्रांती घेतो न घेतो तोच असुर येऊन धडकलेच. पुन्हा पात्र घेऊन जयंत धावू

लागला. तीन दिवसांनंतर अमृतकलश पुन्हा खाली उतरवून ठेवला, पुन्हा असुर आले. एकामागून एक. दर तीन दिवसांनी जयंतानं चार जागी ते अमृतपात्र खाली ठेवलं. त्या चार जागा म्हणजेच हरिद्वार, नाशिक, प्रयाग आणि उज्जयिनी; तीन तीन वर्षांनी यांपैकी एकेका जागी कुम्भमेळा भरतो अन दर बारा वर्षांनी म्हणजे सर्व जागी कलश फिरून आल्यावर "पूर्णकुम्भ" होतो. अन ब्रह्मकुंडाचा विशेष म्हणजे अमृतकलश खाली ठेवताना त्यातले अमृताचे काही थेंब हिंदकळून इथे पडले होते. अन इथं स्नान करण्यासाठी देश-देशांतरीचे लोक धावून येतात – सोबतीची पर्वा करीत नाहीत, वेळेची पर्वा करीत नाहीत. मुहूर्त पाहात नाहीत. संबंध वर्षभर गर्दी लागूनच रहाते."

आक्का म्हणाल्या, "ब्रह्मकुंडाचं आणखी एक वैशिष्टच आहे. पुराणात जे वाचलंय तेच सांगते. दुसरं काय. भगीरथाचं स्तवन करीत गंगा पृथ्वीवर उतरली तेव्हा खाली उतरण्याच्या जलद वेगात स्वर्गातील ऐरावत अन वाटेत सापडेल ते सर्व वाहून घेऊन चालली होती. सर्व देवता अधीर झाल्या. 'थांबवा, थांबवा, गंगेला थांबवा.' त्या ओरडू लागल्या. ऐरावत ओरडत होता, 'वाचवा, वाचवा.' पण कोण थांबवणार तो वेग? सर्वच कचरू लागले तेव्हा घाईघाईनं ब्रह्मानं आपल्या कमंडलूंत गंगेला धरनं. तिला शांत करून ते म्हणाने, थकली आहेस, जरा आराम करून जा. म्हटलं आहे ना—

**"नारद-कीर्तन-पुलकित माधव विगलित करुण क्षरिया–**
**ब्रह्म कमंडलू उच्छल धूर्जटि जटिल जटापर झरिया।"**

पहा, नीट लक्ष देऊन पाहा. ब्रह्मकुंडामध्ये त्याच थकलेल्या गंगेला लोक दूध अर्पण करताहेत."

व्रजरमण काही एक न बोलता बरोबर चालले होते. मुद्दाम काही विचारल्याशिवाय ते जास्त बोलत नसत. त्यांच्या स्वतःच्या बोलीभाषेबाबत ते फार जागरूक होते. अगदी आमच्याशीसुद्धा बोलताना चर्चा करताना सुरवातीपासून शेवटपर्यंत ते पुस्तकी भाषाच वापरीत. "तादृश महानुभाव व्यक्ती मादृश क्षुद्र प्राण्यास." असं ते घडाघड बोलत रहात. सिल्हेटी भाषेच्या वाटेला जायचे नाहीत.

व्रजरमण म्हणाले, या विषयासंबंधी मला निराळीच माहिती आहे. भागवत आणि कृत्तिवासी रामायणात – विशेषतः महाभारतात असं सांगितलेलं आढळतं

की, नारदाच्या स्तुतीनं नारायण द्रवले. तेव्हा ब्रह्म्यानं त्याच गंगेला कमंडलूमध्ये भरून ठेवून दिलं. त्यानंतर भगीरथानं पूर्वजांचा उद्धार करण्यासाठी गंगेला आह्वान केलं तेव्हा गंगा म्हणाली, " काही अडचणी आहेत. सर्वात प्रथम म्हणजे माझा वेग कोण थांबवणार ? मी पृथ्वीवर उतरल्याबरोबरच माझ्या जलद गतीमुळे मी पाताळातच प्रवेश करीन. दुसरी गोष्ट म्हणजे मी पृथ्वीवर प्रवाहित होईन तेव्हा सर्व पापी माझ्यात स्नान करतील. ते सर्व स्वत: पापमुक्त होऊन जातील पण त्यांच्या पापांच्या भारानं मी मात्र थकून जाईन. "

"गंगेला आणण्यासाठी भगीरथाला अनेक प्रयत्न करावे लागले होते. भगीरथानं गंगेचं हे बोलणं श्रवण केल्यावर पुनरपि विष्णूची आराधना करायला सुरुवात केली. विष्णू प्रसन्न होऊन म्हणाले, ' बरं आहे, काळजी करू नकोस. गंगेचा द्रुत-प्रवाह धारण करण्यासाठी शंकराची आराधना कर. एक शंकरच काय तो वेग धारण करू शकेल. अन दुसरी गोष्ट म्हणजे गंगेत जे पापी स्नान करतील त्यांची पापं गंगेतच विलीन होतील; परंतु साधुसंतांच्या स्नानांमुळे गंगा पुन्हा शुद्ध होऊन जाईल. ती पापभारांतून मुक्त होईल. हे सारं ऐकल्यावर भगीरथानं शिवाची प्रार्थना केली. अत्यंद संतुष्ट होऊ शंकर म्हणाले, " भगवत्पादोदक मला मस्तकी धारण करायला मिळावं हे माझं सौभाग्यच. मस्तक पुढं करून शिव उभे राहिले. गंगा खाली अवतरली मात्र शिवानं तिला आपल्या जटांमध्ये पकडून ठेवलं. शंकराच्या जटांमध्येच गंगा गिरक्या घेऊ लागली. तिला बाहेर पडता येईना. आपला वेग कुणालाही धारण करता येणं शक्य होणार नाही असा गंगेला गर्व झाला होता, म्हणून महादेवानं याप्रमाणं तिचा गर्व नष्ट केला. शेवटी भगीरथानं स्तवन केल्या-मुळं शिवानं आपली जटा सैल केली. मंदाकिनी, अलकनंदा, सीता, गंगा हे चार प्रवाह त्या जटेतून वाहू लागले. ब्रह्मकुंडाविषयी रामायणात असं सांगितलंय की, ब्रह्मदेवानं इथं यज्ञ केला होता. गंगेचा प्रवाह वाहत येतो तेव्हा तो इथं येऊन पडतो. "

आक्का म्हणाल्या, " अरे, ते काय, ते दिसतंच आहे की, आपण कुंडापाशी येऊन पोचलोदेखील. थांबा जरा. दोन पैशांची फुलं, बेलपत्री विकत आणते इथून. "

टोपल्या भरून म्लान झालेली, कुसकरलेली फुले, बेलपाने आपल्या पुढ्यात घेऊन घाटाच्या किन्याऱ्यावरच कित्येक लहान मुले बसली होती. त्यांच्या जवळून दोनचार फुले, बेलपत्री हातात घेतली. मन पवित्र झाले. स्नानानंतर गंगामातेला अर्पण करता येतील ती.

विशाल बांधलेला घाट होता तो. सुरवातीपासून शेवटपर्यंत संगमरवरी दगडाच्या पायऱ्या आणि ओटा. पुरुषांसाठी वेगळा घाट होता आणि बाजूंनी भिंत घातलेला असा बायकांचा घाट वेगळा होता. वाटलेच तर पुरुषांच्या घाटावर बायकांनासुद्धा स्नान करता येत असे. त्याला काही हरकत नव्हती. काही वर्षांपूर्वीच बिर्लांनी गंगेपासून ब्रह्मकुंड वेगळे असे बांधून दिले आहे. गंगेच्या प्रवाहात पर्वतावरच्या गारगोट्या वाहत वाहत येऊन पुष्कळदा नदीचे पात्र उथळ होऊन चर तयार होतो. इथेही ब्रह्मकुंडाला लागूनच तसा चर पडला होता. ही जागा मजबूत बांधून बिर्लांनी त्यावर एक ' क्लॉक टॉवर ' उभारला आहे. त्याला नाव दिले आहे, ' हरकी पौडी ' म्हणजेच हराचा बसण्याचा पाट.

यात्रेकरूंचीदेखील सोय झाली होती. या किनाऱ्यावर, त्या किनाऱ्यावर असे दोन्ही किनाऱ्यांवर कुंडात स्नान करता येते.

अंगाभोवती गरम शाल चांगली लपेटून घेऊन चारी बाजूंना मी वळून पाहिल. साधूसंन्यासी आणि इतर लोक यांना स्नान करताना पाहून मलाही थोडे धर्य आले आणि मग मी फिरायला लागले. एका जागी पाहिले गंगेच्या घाटावर पंड्ये लोक काचेच्या गोल गोल बाटल्यांत गंगाजल थोडे थोडे भरून, बाटल्या निरनिराळ्या ठिकाणी ठेवीत होते.

हरिद्वारला, कोणखलला रस्त्यात बाहेर पडताच हे दृश्य आज कित्येक दिवस पहायला मिळत होते. खांद्यावर टोपल्यांची कावड घेऊन घुंगरांचा टुंग-टांग, टुंग-टाग असा आवाज करीत एकामागून एक असे कित्येक लोक जात होते. बैलाच्या गाडीवरच्या टपाप्रमाणे काठीच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत स्वस्त रंगित, रेशमी कपडा ताणून बांधला होता. त्यामुळे भर दुपारच्या उन्हापासूनही त्यांचे रक्षण होत असे. कातरीने कापलेल्या पतंगाच्या रंगित नक्षीदार कागदांनी कावडसुद्धा सुशोभित केली होती. चारी बाजूंनी लाल निळ्या रंगाच्या नकली जरीच्या झिरमिळ्या आणि सोनेरी, रुपेरी नकली जरीचे दागिने लोंबकळत असतात. त्यांच्या चालण्याच्या तालावर त्यांच्या गळ्यांतील छोट्या छोट्या घुंगरांचा आवाज होई. टुंग टुंग, टुंगुर टुंग. " कुठं निघालात ?" असे मी त्यांना हाक मारून विचारले होते, पण ते मुळीच थांबले नाहीत. चालता चालताच त्यांनी उत्तर दिले, ' मुरादाबाद '.

मी त्यांच्याबरोबरच धावले, " क्या ले जा रहे हो भाई ?"

त्यांनी उत्तर दिले, " गंगामाई की शिवरात्र आनेवाली है शिवजी के माथे पर चढाऊंगा–भांग छानूंगा. "

चारपाच दिवस हे लोक असेच चालत राहणार असे ऐकले होते मी. गंगामाता खांद्याखांद्यांवरच राहणार, जमिनीला स्पर्श करणार नाही.

मी त्यांना विचारले, " मान लो, कोई जरूरत आ पडे, कंधों से मा गंगा को नीचे उतारना पडे तो ? "

त्यांचे उत्तर, " तब आउर किसी के कंधे पर दे दूंगा. हम लोगों की टोली में तीनचार जने हाय ना. "

" रात को सोते कहाँ हो?"

" सोते नही. दिनरात ऐसेही चलते रहते हाय. "

ही एवढ्या कडाक्याची थंडीची रात्र, झापेविना कसे चालेल ? नक्कीच झोपत असणार, एकाने दुसऱ्याला साक्ष ठेवून. आणि म्हणूनच हे गुपित त्यांच्या त्यांच्यातच गुप्त राहते.

दादा एकदम दरडावून म्हणाले, " तुमच्या मनात सगळं वाईटच. अगदी सरळ गोष्ट. सहज विश्वास ठेवला तर त्यांत काय बिघडतं ? चारपाच दिवस सतत चालत जाण्यात इतकं अशक्य असं काय आहे ? त्यांच्याबरोबर अंथरूण पांघरूण नाही हे दिसतंय ना ?"

" का, ते काय प्रत्येकाच्या कमरेला दोरीनं घट्ट बांधलेली एक चौघडी आहे ना. रात्रीच्या वेळी शेकोटी पेटवून, चौघडी पांघरूण बसल्या बसल्या झोपलं म्हणजे झालं. स्टेशनवरच्या प्लॅटफॉर्मवर त्यांना बसून झोप घेताना कितीदा तरी पाहिलंय. आणि गंगामाता––झाडाच्या फांद्यांना बांधून ठेवायची––यात इतकं अवघड काय? परंतु कावडीमध्ये गंगामाता कोणत्या स्थितीत राहात असेल कोण जाणे ? अशीच झाकूनपाखून ठेवलेली राहील––पहायलाच नको. "

आज ब्रह्मकुंडाच्या घाटावर या रहस्याचा स्फोट झाला. या काचेच्या बाटल्या कापसात नीट बसवून ' हर हर बोम ' असा जयनाद करून त्यांना इथे निरोप देतात. स्नान करून शुचिर्भूत होऊन कावड वाहणारे नवीन साज चढवून तयार असतात. त्या बाटल्यांची खरेदीविक्री चालते पंड्यांकरवी.

झाडाचा एक एक खुंट बसवून गंगेच्या या तीरापासून त्या तीरापर्यंत पूल बांधणे चालू होते. मी असे ऐकले होते की कुम्भमेळ्याच्या अगोदर असेच पंधरा सोळा तरी पूल तयार होणार होते. नुकती तर कामाला सुरुवात झाली होती. सर्व पूर्ण होऊन संपणार तरी कधी ? कुम्भमेळा तर काय, हा आलाच. तरी अर्थातच अजून एकंदर सतत दोन महिने स्नान पर्वणी चालूच राहणार. कुम्भस्नानाच्या तीन पर्वणी असतात.

सर्वच सांगतात की, शेवटच्या पर्वणीलाच मेळयाची जास्त गर्दी होईल. तेव्हाच रोगराई, मृत्यूचा प्रादुर्भाव होतो. सुरुवातीलाच गर्दी नसताना पहिल्यानं पुण्यसंचय करून सुखरूप घरी परतायचं अशी मनीषा मनाशी ठेवून आम्ही इथं आलो होतो.

दादा म्हणायचे "तीर्थस्थानी देह ठेवणं हे अत्यंत पुण्याईचं असतं."

आक्का म्हणायची, " पुन्हा येणं नाहीच झालं तर बघता येईल. एकदमच सर्व काही साधण्याची काय घाई ?"

मी म्हणाले, " तेच तर. 'जे इथं देह ठेवतात' त्यांची गोष्ट निराळी. मी असं ऐकलंय ते हिंडून फिरून येतात अन वेळ पाहून देह ठेवतात. नवीन देहात प्रवेश करतात. आपल्या बाबतीत त्यालाच मृत्यू म्हणतात. तो येतो अन आपला विळखा घालून सर्व चिन्हे नाहीशी करून टाकतो. म्हणूनच तर आपण देवाच्या पायाशी डोकं टेकून पुन्हा-पुन्हा नवस करतो, " सर्व शतायुषी होऊ देत."

खुल्या घाटावर दादा ब्रजरमण यांची सोबत सोडून आक्का आणि मी पुढे बायकांच्या घाटाकडे गेलो. घाटाला भिंतीचा तट होता. तो असला म्हणून काय झाले; भिंतीच्या खाली जेवढी फट होती तीमधून बाहेरून सर्व काही स्पष्ट दिसत होते. कित्येक गौरवर्णी, स्थूलांगी, निर्वसना स्त्रिया अत्यंत निर्विकार मनाने पाण्यातून आतबाहेर करीत होत्या. आक्कांना वाटले, ' आपण पाहिलं ते पाहिलं. पण आणखी कुणी पाहू नये म्हणजे मिळवलं.' त्यांनी मोडलेल्या लज्जेनं आक्कांनाच घेरून टाकले. शक्य झाले तर या क्षीण देहाचा आडोसा करून ही लांबच लांब फट झाकून टाकावी, असे त्यांना वाटायला लागले. मला आठवण झाली, काल बोलता बोलता यासाठीच शशीमहाराज म्हणाले होते, " जास्त काही बोलू नका बाबा. पंजाबी बायकांची भक्ती नावाजण्यासारखी असली म्हणून काय झालं. त्यांना लाज, शरम काडीमात्र नसते. त्यांच्या या त्रासामुळेच ब्रह्मकुंडावर चोहोबाजूंनी भिंत घालून वेगळा घाट करावा लागला. तिथं जाल तेव्हा पाहालच.

आक्कांच्या गंभीर चेहऱ्याकडे पाहत चालत चालत मी घाटाच्या आत आले. पांढऱ्या शुभ्र दगडांच्या पायऱ्या असलेला तो घाट, चिखलाने भरला होता. पायऱ्यांवर वेगळ्या वेगळ्या लाकडी खाटा टाकून चार खाटवाल्या बसल्या होत्या. त्या सर्व पंड्यांच्याच बायका होत्या बहुतेक. कर भरून एकेक घाट त्या घेतात. यात्रेकरूंच्या कपड्यालत्त्यांची राखण करतात. स्नानानंतर त्यांच्या भाळी कुंकुमतिलक लावतात. स्नानाला येणाऱ्यांमध्ये पंजाबी स्त्रियांचा भरणाच अधिक. एवढ्या वेळात उभे राहिल्या राहिल्या कितीतरी धक्के खाल्ले. शरीर दिसायला थलथलित. पण काय

तो कोणाला न जुमानणारी शक्ती ! गरज असो-नसो धबाधबा धक्के मारून बाजूंनी निघून जात होत्या. स्नानासाठी सलवार काढता काढताच एकीला जणू एकाएकी कसली तरी आठवण झाली. सलवार तशीच काढून टाकून, अंगात फक्त खमीज घालून ती बाहेर धावली; या घाटावरून त्या घाटावर गेली, पायऱ्या उतरून खाली उतरली, वर चढली, ढकलाढकली केली अन परत आली. अशी एकच नाही. कित्येक पाहिल्या मी. वडिलांच्या कडेवरच्या मुलाच्या डोक्यावर गंगाजल शिपडण्यासाठी कुणी धावते, तर कुणी विसरलेली गंगाजली आणायला धावते. दुसरी एखादी गंगेला बोरे अर्पण करण्यासाठी पैशाला दोन बोरे आणायला धाव घेते. जणू काही शेवटच्याच घटकेला सर्व काही आठवते. जी जितकी जास्त स्थूलप्राय तितकीच ती लाजलज्जेबाबत बेदरकार.

आक्का म्हणाल्या, " अगबाई, यापुढं तुला कधीही लठ्ठ म्हणणार नाही. मी जे काही समोर पाहतेय त्याच्यापुढं तू म्हणजे छोटं बाळ. "

मी म्हणाले, " पण आक्का, काय एकेकीचा रंग आहे बघ ! शंभर नंबरी सोन्याचा रंग – पाण्यात त्या उतरतात तेव्हा वाटतं की जणू तळपत असतात. हेच तरुण, रूपवान एखादीला पाहिलं असतं तर मन वेडावून गेलं असतं. जणू काही यमुनेच्या पाण्यावर राधाच दिसली असती – काळ्या पाण्यावर चंद्र विहरताना दिसला असता. "

आक्का म्हणाल्या, " गोऱ्यापान राहतील नाहीतर काय ? सलवार-खमीजमध्ये अंग झाकून टाकतात म्हणून इतकं रंगाचं तेज, छातीला, पाठीला जन्मात सूर्यप्रकाश लागत नाही. "

अगदी मघापासून एक आमच्याच वयाची स्त्री दोन पायऱ्यांभर पाण्यात सारखी जोरात बुड्या घेत होती व पुन्हा मागे येत होती. ती मध्येच उठायची, घाटाच्या एका बाजूला जायची तिथला लाकडी दरवाजा उघडून आत जायची अन् दरवाजा लावून घ्यायची. पुन्हा थोड्या वेळाने कुडकुडत यायची आणि पाण्यात बसायची. दृष्टादृष्ट झाली तर दात काढून हसायची. वेडी की काय ? अंगावर बोटभर चिंधीही नव्हती तिच्या आणि ही झोपडी, ही काय भानगड होती ?

आक्कांनी मला हात धरून ओढले, " कुठं चाललीस ? हातपाय धुवायची जागा असेल ती. "

माझी उत्सुकता काही कमी होईना. एका बाजूला आक्कांना डावलून मी मान लांब करून डोकावून पाहिलं आत. अगदी लहानशी खोली होती ती. एका

कोपऱ्यात कोळसा, पितळी थाळी, एक पेला, जमिनीवर अंथरलेली फाटकी चादर, एक गाठोडे आणि मळक्या कांबळ्याचे काही तुकडे एवढे दिसले मला.

ज्या घाटवालीजवळ आमचे कपडे ठेवायला दिले होते ती म्हणाली, " ओ तो सेवावाली हाय. गंगामाई की सेवा करता. " गंगामाईची सेवा म्हणजे घाट, पायऱ्या धुवून ती स्वच्छ करते, फुलं, पानं, निर्माल्य उचलून टाकते; अन या खोपटात राहते. लाकडी कोळश्याच्या शेगडीवर भाकरी भाजून खाते, फाटकं कांबळं पांघरून गार जमिनीवर झोपते.

त्या वेळी पाण्यात विशेष कुणीच नव्हते. झपाझप एकदोन बुड्या मारून सर्वजणी काठावर गेल्या होत्या. " नुसतं पाहात उभं राहिल्यानं थंडी मुळीसुद्धा कमी होणार नाही. पाण्यात उतरायला चल. " आक्कांनी आदेश दिला. कमरेला पदर बांधून मी पुढे झाले. ' नमो गंगे, नमो गंगे, ' म्हणत डोक्यावर पाणी उडवले. काय भयंकर थंड होते ते. बर्फाचे पाणीच की. हाताची बोटे आखडून गेली. पायाचा तळवा पाण्याला लागताच मी पाय वर उचलून घेतले होते – पाण्यात उतरायचे धैर्य होत नव्हते. गंगास्तोत्र म्हणत म्हणत डोळे बंद करून आक्का मात्र पाण्यात उतरल्या होत्या – दिसल्या मला त्या.

मनाचा हिय्या करून दोन्ही पाय पाण्यात बुडवून घट्ट दाबून ठेवले. असे वाटत होते पायाचा जेवढा भाग पाण्यात बुडवला होता तेवढा जणू माझा नव्हताच; गुडघ्यापर्यंतचा भाग जणू कोणी कापूनच टाकला होता. कंबरेपर्यंत पाण्यात गेले. कंबरच कापली गेली. छातीपर्यंत बुडी घेतली श्वासच कोंडला; मरू दे नाही तर जगू दे, चटकन एक बुडी मारून पाणी झटकले. माझे डोके आता डोके राहिले नव्हते. बर्फाच्या एका लादीचा भार होता तिथे. पायऱ्या चढून लवकर लवकर वर आले. मला आठवण झाली घरून निघायच्या वेळी बहीण म्हणाली होती – माझं जायचं जमलं नाही तर माझ्या नावानं तूच गंगेत बुडी घे, आणि माझा बाबू, लाबू त्यांच्या नावानंही. कशानं काय होतंय – शांती नाही जिवाला. "

आज पहिल्यानंच माझं गंगास्नान होत होतं इथं. बहिणीचा करुण चेहरा आठवला. पुन्हा पाण्यात उतरले. तिच्या नावानं एक बुडी मारली. आईच्या नावानंही एक मारली. अन डॉक्टरसाहेबांची पत्नी–किती चांगली बाई ती – तिच्या नावानं गंगेत बुडी मारल्याशिवाय कसं राहता येईल ? बाबू, लाबू, छोटू, मंजू – या सर्वांच्या नावांची एक एक मिळून या चार. आणि रोमू तिच्यासाठीही एक. अन... अन ... अन आता शक्य नाही. गळ्यापर्यंत येऊन श्वास कोंडला होता, इकडं

तिकडं वळताही येत नव्हतं. निःश्वास सोडण्यासाठी 'आ' करावा तर तोंडात पाणी जायचं, निःश्वास जागच्या जागीच रहायचा, पटापट बुड्या संपवीत होते मी. आणखी दोन बाकी – आणखी एक – बस झालं समाधान.

वरती चढून आले.

आक्का म्हणाल्या, "कमी तर झाल्या नाहीत ना?" मोजून पाहिल्या मी.

हात पाय बधिर झाले होते. मोडक्या शेगडीवर काश्याच्या ग्लासमध्ये सेवावाली पाणी गरम करीत होती. तिथं जाऊन मी मटकन बसले.

गंगास्नान केलं होतं, आता चंदन लावलं पाहिजे. त्याशिवाय स्नानाचा आनंद पूर्ण कसा होणार ? मला आठवलं. लहानपणी कलकत्त्याला गेल्यावर गंगास्नानासाठी गंगेच्या घाटावर आई जायची. तिच्या मागं लागून आम्ही दोघी बहिणीही जात होतो. स्नानाची हौस म्हणून नव्हे. गढूळ पाण्यातील प्रवाहाच्या वेगाची काय भीती वाटायची. त्यातच लहान लहान खेकड्यांची पिल्लं नाकाकानांत शिरतील असं वाटायचं. काय तो गोंधळ ! तरी कसंही करून, दोन्ही कानांत बोटं घालून डोळे तोंड बंद करून एकदाची एक बुडी मारून नदीचा काठ गाठला की झालं. काठावर बांबूच्या छत्र्यांखाली चंदन कुंकू घेऊन पंड्ये बसलेले असायचे. घाई घाई करून आम्ही दोघी बहिणी तिथं जाऊन आपापली तोंडं पुढं करून समोरासमोर बसायचो. डाव्या हाताच्या तळव्यावर गंगेतील माती घासून त्याचा ठसा पंड्या कपाळावर उठवीत असे. आम्हांला ठसा फक्त कपाळावर चालत नसे. गालांवरही हवे असायचे. या गालावर, त्या गालावर. साऱ्या तोंडावर ओळीने छाप मारून घ्यायचे अन् हसत सुटायचे. पंड्याचा पत्र्याचा आरसाच आडवा उभा फिरवून चेहेरा पहायचा आणि पुन्हा हसायचं. त्या वेळच्या गंगास्नानात हीच हौस होती. आज इतक्या दिवसांनंतर ती हौसच का पुन्हा मनात जागृत झाली ?

कलकत्त्याला गंगेच्या घाटावर गंगेतील मातीचे छाप मारीत असत; परंतु इथं तसं नव्हतं. सर्वांच्या कपाळभर भाताच्या कणसासारखी पिवळ्या चंदनाची नक्षी उमटवलेली दिसायची. त्यातच लाल कुंकवाचे छोटे ठिपके असायचे. फार सुंदर, बारीक काडीनेच सर्व काढतात असं वाटायचं.

आक्कांना ओढून घेऊन चंदन लावायला जाऊन बसले. वाटीभर केशरमिश्रित चंदन, पाण्यात भिजवलेलं कुमकुम; घाटवालीने ते चंदन बोटाने घेताच मी तिचा हात घट्ट धरला. मी म्हणाले, "नाही नाही, बोटानं लावू नकोस." दुसऱ्यांच्या

कपाळावर पाहिला होता तसा नमुना मी जमिनीवर काढला आणि म्हणाले, " ऐसा, ऐसा."

घाटवाली मान हलवून हसत म्हणाली, " हा हा वैसाही होगा. ये देखिये ना." एवढे ती बोलली आणि आक्कांचे डोके डाव्या बाजूला कलते करून, डाव्यां हातावर थबथवित चंदन घेऊन तळव्याचा मधला भाग तिने कपाळावर दाबून धरला आणि एका बाजूकडून दुसऱ्या बाजूपर्यंत एका फटक्यांत हात आणून सोडून दिला. ह्या बोटांच्या ओढण्यांतच त्यांची ती खुबी होती. -- दोन्ही बाजूंना कपाळावर चंदनाचे ठिपके उमटले. एकंदर प्रकार काय होता तो इतक्या वेळानंतर माझ्या ध्यानात आला. आता निश्चित मनानं आधीच मान कलती करून मी बसले. " सोहाग भाग बना रहे," " बाल बच्चा अच्छा रहे, " अशी बडबड करीत घाटवालीने चंदन कुंकू लावले. स्नानपर्वणीची सांगता झाली.

ब्रह्मकुंडाच्या तीरावरील रस्त्यावर दोन्ही अंगांना ओळीने दुकाने होती. मनात इच्छा होत होती की फिरत फिरत सर्व पाहावे, हाताळावे. पण दादा होते बरोबर. ते रागावतील. ते म्हणतील, " निष्कारण दुकानदाराला त्रास द्यायचा हाच एक तुमचा स्वभाव. " बरोबर आठवण झाली. फिरकीच्या झाकणाचा एक तांब्या विकत घ्यायला हवा होता. गंगाजल आणायला आईनं सांगितलं होतं. दादांना ऐकू जावं म्हणून मी जोराजोरांत म्हणाले, " चला, आक्का चला, जरुरीच्यावस्तू घेऊ या ना, चला. "

काश्याच्या आणि पितळेच्या भांड्यांची आक्कांनासुद्धा मोठी हौस. भांडे दिसले की नेमक्या त्याच भांड्याची त्यांना जरुरी असायची, ते नसल्यामुळे किती अडचण व्हायची या सर्व गोष्टी त्यांना एकाएकी आठवायच्या. त्या म्हणायच्या " शनिवारचा उपास करते, मंगळवारी शाकाहारी जेवते तेव्हा अशी झाकण असलेली पितळेची बादली असली म्हणजे बरं, स्वच्छ पाणी उचलून एका बाजूला ठेवता येईल असं एखादं घमेलं असलं तर रोजच्या कामाला किती सोयीचं. अन या नक्षीदार (जाम-दानी) वाट्यांची घडण कित्ती सुंदर आहे ! आणि ही उंच काठाची थाळी पहा, रस्साभाजी वगैरे काढून ठेवायला छान होईल. नाही ? छोटे तांब्ये घेतले तर लक्ष्मी-समोर कलश ठेवायला कामी येईल. दर गुरुवारी लक्ष्मीव्रत करते मी. सोनादी, सुंदरी यांना पण मिळाला तर त्या खुश होतील. इतरांना गंगाजल देण्यासाठी गंगा-जळी न्यायलासुद्धा लागतील. या तर मला काही डझनभर लागतील. दोन विहिणी, टनि, किरण, मात्रैया, अन गात्रीसुद्धा घरी द्यायला लागेल एक. " आक्कांचा हा

सगळा हिशोब ऐकून भांडयाच्या दुकानात आणखी उभे राहण्याचा धीर होईना मला. आक्कांना ओढीत ओढीत समोरच्या एका अरुंद बोळात आम्ही शिरलो. अरुंद म्हणजे किती अरुंद ! तीन माणसांना शेजारी शेजारी चालता येत नव्हते. अशी दुकानांनी गच्च भरलेली अरुंद गल्ली दिल्लीला चांदणी चौकात अन काशीला विश्वनाथाच्या देवळाच्या वाटेवर पाहिली होती. दोन्ही बाजूंची दुकाने पाहात पाहात सावकाश चालायला आणि सावकाश चालत चालत दोन्ही बाजूंची दुकाने पाहायला फार छान वाटत होते. सबंध दिवस मला घालवता आला असता असा. चालत चालत गल्लीच्या टोकाशी येऊन आम्ही थांबलो. इथे आम्ही सर्वच नवीन होतो. शहराच्या कुठल्या भागात येऊन पोचलो, ते कुणालासुद्धा कळत नव्हते.

जवळच मागच्या बाजूला दणदण, झमझम बँड वाजलेला ऐकू येऊ लागला. नक्की पहिल्यानं पाहिली तशीच आणखी एखादी मिरवणूक असणार. आवाजाच्या दिशेने मी धावत गेले. मिरवणुकीसाठीच सर्व तयारी होती वाटते. खरेच रस्ता अगदी रिकामा होता; लोकांची ये-जासुद्धा बेताचीच चालली होती. रस्त्याच्या दोन्ही बाजूंच्या भिंतींना टांगे, रिक्षे, यात्रेकरू अगदी घसटून उभे होते. दर क्षणाला शिटी वाजवून पोलीस पहारा करीत होते. लोकांची गर्दी हटवण्यासाठी हातातला दंडुका वाऱ्यावरच फिरवत होते.

दादांनी विचारले, "ये किसका जुलूस आ रहा है भाई ?"

पोलीस म्हणाले, "हरिहर मठके मंडलेश्वर काशीसे आये हैं – इसी रास्ते जा रहे हैं "

अगदी तेच – त्या दिवशी काळया वृद्ध साधूंनी ज्यांच्याविषयी सांगितले होते तेच. सेवाश्रमच्या जवळच तर सांगितले होते. मन आनंदित झाले. जणू काही आमचे स्वत.चेच एक पथक येत होते असे वाटू लागले. विचार करीत असतानाच पुराच्या पाण्याच्या लोंढ्याप्रमाणे हुडकन् मिरवणूक आली आणि तिने सर्व रस्ता अडवून टाकला. तशीच, अगदी तशीच मिरवणूक होती ती. सर्वांत पुढे चालले होते बँड पथक. त्याच्यामागे चांदीचे दंड खांद्यावर घेतलेले व सोनेरी जरीकामांनी भरलेल्या लाल रंगाच्या शाली अंगावर घेतलेले साधू शिपायांप्रमाणे चालले होते. त्यांच्या मागून मानेवर उंच ध्वजदंड असलेले व पाठीवरच्या अंबारीत चांदीच्या सिंहासनावर देवाची मूर्ती असलेले असे दोन दोन हत्ती चालले होते. ध्वजदंडाच्या वरच्या पताका रस्त्याच्या बाजूच्या तिसऱ्या, चौथ्या मजल्याच्याही वर उडत होत्या. ध्वजदंडाला बांधलेली जाड दोरीसारखी ताणून धरून दोन्ही बाजूंनी दोन पथके

हत्तीच्या चालीने त्यांच्याबरोबर चालली होती. पडण्याची भीती नव्हती. यांच्यामागे गटागटांनी चालले होते नागा संन्यासी, त्यांच्यामागे चाळीस माणसांच्या खांद्यावर, फुलांच्या माळा सोडलेल्या चांदीच्या डोलीत बसले होते मंडलेश्वर. नेहमीच्या पद्धतीप्रमाणे रीतसर चांगले स्वागत केले जात होते. वाऱ्याने त्यांची रेशमी शाल व पटका उडत होता; चश्म्याच्या काचेवर प्रकाश पडत होता. हातातल्या पांढऱ्या रुमालाने ते कपाळावरचा घाम पुशीत होते. त्यांचा चेहेरा अतिशय गंभीर होता. गळ्यातल्या झेंडूच्या फुलांचा रंग आणि अंगावरील वस्त्राचा भगवा रंग यांमुळे ते अधिकच भारदस्त दिसत होते.

जरासे पुढे जाताच मायादेवीचे मंदिर होते. तिथे मिरवणूक थांबली. त्या देवळातील महन्त आले आणि त्यांनी सन्मानाने मंडलेश्वरांना खाली उतरवून घेतले. मायादेवीच्या मंदिरासमोरच्या अंगणात उंच वेदीवर दत्तात्रयाच्या पादुका होत्या. मंडलेश्वर सरळ गेले आणि वेदीच्या पायऱ्यांवर उभे राहिले. पुजाऱ्याने शिंग फुंकले. एक मिनिट, दोन मिनिटे, तीन मिनिटे – मंडलेश्वर खाली उतरून आले आणि सरळ मंडपात गेले. मंडप पुष्कळसा खोलीसारखाच होता. पुढचा भाग उघडाच होता. मंडलेश्वर तिथे गेले. गादीवर घातलेल्या गालिच्यावर एकदा बसले आणि बाहेर आले. नियम पाळायचा हे खरे, मग उशीर करून काय उपयोग ? कुम्भमेळ्याला जे कोणी साधू येत ते अगोदर मायादेवीच्या मंदिरातील ऋषिश्रेष्ठ दत्तात्रयाचे दर्शन घेऊन त्यांना मान देऊन नंतर आपापल्या निवासस्थानी जात.

डोलीच्या मागे एवढा मोठा उत्सुक जनसमुदाय – जणू काही शहर फुटून सर्व आबालवृद्ध, स्त्रीपुरुष यांच्या मागे मागे येत होते. आम्हांलासुद्धा सेवाश्रमला याच रस्त्याने जायला हवे होते. गर्दी केव्हा ओसरणार आणि आम्ही केव्हा जाणार ? आणि पुन्हा तिकडे जेवायची वेळ टळता उपयोगी नाही, स्वामीजींना त्रास होता कामा नये, हाही विचार मनात येत होता. विचार करीत करीतच जरा पुढे सरकत होतो. किती वेळ गेला कळलेच नाही. खाली मान करूनच चालत होते. मान दुखायला लागली तशी मान वर केली तर वळणाच्या टोकाशी तारांच्या कुंपणापलीकडून काही पंजाबी स्त्रिया, दुरूनच दोन्ही हात जोडून, आमच्याकडे पाहून भक्तिभावाने पुन्हा पुन्हा नमस्कार करीत होत्या.

आम्हांला कशाला नमस्कार ? मी चमकलेच. मी मागेपुढे पाहिले मुद्दाम. समोर नागा, मागे पण नागा, चालता चालता गर्दीमुळे नकळतच मी या लोकांत येऊन शिरले होते. नुकतेच स्नान करून, रेशमी वस्त्र परिधान केलेल्या, कपाळी चंदन-तिलक

लावून हातात कमंडलू घेतलेल्या आक्का दिसल्या. आजच सकाळी स्नान करायला गेलो, तेव्हा गंगाजल आणण्यासाठी वाटेत विकत घेतला होता तो कमंडलू, आक्का गंगाजल खोलीत ठेवणार होत्या. जरूर वाटेल तेव्हा बिछान्यावर शिंपडणार होत्या. जणू काही त्याशिवाय मनाला प्रसन्न वाटतच नाही. मी पुन्हा नीट पाहिले, त्या स्त्रिया तेव्हासुद्धा कपाळाला हात लावून, ओंजळ पसरून पुन्हा पुन्हा आमच्या कृपेची याचना करीत होत्या.

बरीच धक्काधक्की केल्यावर महाप्रयासांनी त्या गर्दीतून एकदाच्या सटकलो. आम्ही एखादवेळी वाट चुकतो तर......आमच्यावर लक्ष ठेवूनच दूर अंतरावरून दादा चालले होते. एवढ्यात संधी मिळताच जवळ आले आणि म्हणाले, " परतश्या आलात ? तुमचं वागणं पाहून मी तर तुमची आशाच सोडली होती. "

आज गंगेचे पाणी खूपच स्वच्छ होते. आणखी दोन दिवसांनी जास्तच स्वच्छ होणार म्हणे – नदीच्या तळातले गोटे अगदी स्पष्ट दिसतील. आणि मासे तरी किती – आजसुद्धा कितीतरी दिसत आहेत. हजारो माशाची गर्दी इथे पहायला मिळेल. त्या दिवशी स्नानासाठी उतरले होते तेव्हा गढूळ पाण्यात माशांची ढुशी खाल्ली होती, मोठमोठे मासे – दिसायला पुष्कळसे रुई माशासारखे पण त्यांची तोंडे मात्र रुई माशापेक्षा जास्त निमूळती. इथले लोक या 'माशाला' मासा म्हणतात. पितळेच्या थाळ्यांमधून पिठाच्या गोळ्या घेऊन लहान मुले फिरत होती. आणि माणूस पाहून एका पैशाला आठ गोळ्या किंवा बारा गोळ्या याप्रमाणे ती विकीत होती. पाण्यामध्ये त्या गोळ्या 'टप्टाप्' टाकून एकचित्ताने माशांचा खेळ पाहत लोक तासच्या तास घालवतात.

चालत चालत पूल ओलांडून आम्ही पलीकडे निघून गेलो. तिकडून इकडचे हरिद्वारचे दृश्य अपूर्व दिसत होते. पर्वताच्या पायथ्याला लागून अनेक दालने होती. आणि त्या दालनांमधून गंगा तुरुतुरू धावत होती. कधी कुणाच्यातरी पायऱ्या डुबवून टाकीत, कुणाचा तरी व्हरांडा भिजवीत, तर कधी कुणाच्या घरात पुन्हा पुन्हा चोरून डोकावून पाहत. त्या काठावरून गंगेची क्रीडा पाहून मन उल्हसित व्हायचे, पलीकडच्या बाजूला मोठमोठ्या झाडांच्या सावलीत हिरव्या गवताखालच्या मऊ जमिनीचा आश्रय घेऊन निळ्या प्रवाहाला गंगेच्या तडाख्यातून वाचवले होते.

इथूनच गंगेचा प्रवाह वळवून शहरामधून व्यवस्थित नेला होता. मोठमोठ्या लाकडी दरवाज्यांजवळ पाण्याचा जोराचा प्रवाह शांत होता. जरूर पडेल त्याप्रमाणे एकदोन दरवाजे उघडून टाकतात आणि मग गंगेच्या दक्षिणेला पाण्याचा प्रवाह किती तरी दिवस वाहात राहतो. सर्वांना आल्हाद देणारी अभिमानी गंगा, तिला तिच्या प्रवाहाला बांध घालून भाग पाडलेले सहन होत नाही; तिचेच वर्चस्व जास्त असायला हवे. बाजूलाच शांत निळी धार वाहत होती. चिखलाने भरलेले गोटे पसरलेल्या पात्रावर जणू काही भोळा शंभू महादेव भस्म चर्चून अनंत अशा आकाशाकडे पाहत पडून राहिला होता. धूसर वाळूवर सुकलेल्या गवतांचे गुच्छ पसरले होते. सर्व ठिकाणीच जणू काही संन्याशांच्या अंगाचा तो रूक्ष रंग, जणू त्यागाचा जुलूसच. हे सर्व एकच आकार झालेले गोटे, हिमालयावरून गडगडत, गडगडत, झिजत, झिजत कधी इथे येऊन पडले असतील कोण जाणे. आक्का म्हणाल्या, "पाहिलंस, असं वाटतं जसं काही कुणीतरी मुद्दाम तयार करून मांडून ठेवले आहेत हे गोटे,"

पाण्याच्या निळ्या प्रवाहाच्या पलीकडे, निळ्या आकाशाच्या पार्श्वभूमीवर निळ्या निळ्या पर्वतराई दिसत होत्या. किती गंभीर आणि शांत होता तो परिसर. लोक म्हणतात ही तपोभूमी आहे. खरोखरच तपोभूमी ! हे निळ्या रंगाचे आकर्षण मन खेचून घेते आणि कुठल्या कुठं घेऊन जाते. तिथून मन वळवावेसे वाटतच नाही. पतंगाच्या दोऱ्याप्रमाणे मनरूपी सुताला फिरकीमधून नुसते सोडीतच राहावे असे वाटत होते.

गंगेच्या त्या तीरावर गर्दी आणि या तीरावर सर्व कसे शांत. पलीकडे प्रासादांची रांगच रांग आणि तळपणारे ऊन; इकडे झाडांची शीतल सावली, पक्ष्यांचा किलबिलाट, पलीकडे प्रत्येक घरांघरांतून दिव्यांचा झगझगाट आणि इकडे कोवळ्या गवताची बिछायत. सारेच मोह पाडणारे.

दादा म्हणाले, "किती थोर थोर पुरुषांनी साधना केली असेल या तपोभूमीत. किती युगानुयुगं चालत आली आहे ही साधना, त्याचा प्रभाव जाणार कुठं ? इथल्या हवेत मिसळून एकरूप झाला आहे तो, मला वाटतं, त्यांच्या या तपश्चर्येचं सामर्थ्यच सर्वांना हलवून टाकीत असलं पाहिजे."

त्या काठावर मंदिरामंदिरांतून सायंआरतीचा घंटानाद सुरू झाला. या तीरावरून सावकाश चालत तिकडे गेलो. गंगेवर बांधलेला चबुतरा ब्रह्मकुंडापासून अर्धाएक मैल अंतरावर होता.

रंगित फुलांनी भरलेले हिरव्या पानांचे द्रोण तुपाची वात लावून स्त्रीपुरुष

पाण्यात सोडीत होते. काही लोक गंगामाईच्या नावाने दिवे सोडीत होते तर काही आपल्या प्रिय माणसांची आठवण करून त्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ ते सोडीत होते. गंगामाईला अर्पण केलेले हे द्रोण तरंगत जात होते, पाण्याच्या प्रवाहाच्या मुखाशी मंद प्रकाशाची वात दिसेनाशी होई, इतका वेळ आपण सोडलेल्या दिव्यांकडे स्थिर उभे राहून पाहणारी व्यक्ती एक दीर्घ नि:श्वास सोडून तीरावर चढून यायची. अतिशय करुण पण तितकेच गोड वाटते हे दृश्य. कुणाचा दिवा मध्येच थांबला किंवा दृष्टिपथात त्याची वात विझली तर त्याला फार दु:ख व्हायचे, मनात येणाऱ्या शंका-कुशंकांनी जीव आतल्या आत व्याकुळ होऊन जायचा.

दोन हातांत दोन फुलांचे द्रोण घेऊन आक्का म्हणाल्या, " मागं आले होते तेव्हा 'त्यांच्या' नावानं दिवा सोडला होता. या वेळी आणखी एक नाव वाढलं. नाही, आणखी दिवा सोडणार नाही." एवढे बोलून आक्कांनी एक द्रोण ठेवून दिला व दुसरा कपाळाला लावून पाण्यात सोडला. ओंजळीतून पाण्याच्या लाटेवर दिवा सरकवता सरकवता आक्का म्हणाल्या, " या वेळी फक्त गंगामाईच्या नावानंच दिवा सोडला."

मायादेवीचे मंदिर. नाव मायापुरी. सप्तपुरींपैकी एक पुरी. पीठस्थानच ते एक. त्या दिवशी बाहेर उभे राहूनच एकंदर प्रकार पाहिला होता. देवीचे दर्शन असे घेतले नव्हते. आज मात्र दर्शन घ्यायला हवे. मंदिरातील देवदेवतांकडेच आक्कांची ओढ जास्त. आतापासूनच एकेकाचे नीट दर्शन घेतले नाही तर नंतर गर्दीमध्ये अशी हुल्लड माजेल की, 'देव पाहू का माणूस पाहू' अशी अवस्था होऊन जाईल. मातीच्या पारावर बांधलेले हे एक छोटे मंदिर होते. हेच देऊळ पूर्वी आणखीनच लहान होते. आमच्या बरोबरच्या स्वामीजींना तेच हे मंदिर होते की काय ते ओळखता येईना. ते म्हणाले, " फार पूर्वी इथं आलो होतो. त्यानंतर पुन्हा आलो नाही. परंतु तेव्हा तर हे असं नव्हतं. जरा थांबा, मी विचारून येतो." असे बोलून जवळच शिपाई उभा होता त्याला विचारायला ते गेले.

मंदिराच्या चारी बाजूंना प्रदक्षिणा घालण्यासाठी म्हणून जो व्हरांडा होता तो एका भक्ताने वाढवला होता, शिपायाने सांगितले, " शेठजीकी बिमारी किसी तरह अच्छी नही होती थी, तभी कुछ मन्नत की थी, अच्छे होनेपर पचीस हजार रुपया लगाकर इस मंदिरको बढा दिया हाय, आउर इये जो दीवारपर दसमहाविद्याके चित्र हाय, बंगालके किसी चित्रकारको बुलाकर बनवाये थे."

ऐकून अभिमान वाटला. मी मंदिराकडे पाहत राहिले, दशमहाविद्यांच्या दहा

अंगांचे ब्रशने काढलेले चित्र डोळ्यांत भरत होते. बंगालचा संबंध नसता तर कदाचित इतके वाटले नसते.

आक्कांनी हाक मारली, " इकडं ये, देवीचं दर्शन घेऊन जा." आत एकाच ओळीत तीन चार देवी होत्या. पण यातली मायादेवी कोणती ? शिपायाने अंगुली-निर्देश करून सांगितले, " ओ जो बीचवाली हाय ओही मायादेवी हाय."

मायापुरीच्या जवळच गीताभवन होते. नवीन इमारत. नुकती आठएक महिने अगोदरच ही पूर्ण झाली होती. आत गायन चालू होते. गीतापठन चालू होते. बाहेर लाउडस्पीकरच्या आवाजाने सारा परिसर दुमदुमून जात होता. आत शिरताच एक मोठा हॉल होता. साऱ्या जमीनभर जाड गालिचा अंथरलेला होता. त्यावर बसल्या-वर आराम वाटतो, विशेषत: थंडीच्या दिवसात. हॉलच्या त्या बाजूला संगमरवरी दगडाची माणसाएवढी मोठी विष्णुमूर्ती होती. मूर्तीचे डोळे हसरे दिसत होते. नवीन कारागिराची ही निर्मिती होती. हॉलच्या भिंतीवरदेखील पुराणांतील कथावस्तू चित्रित केल्या होत्या. काही भिंतींवर ही अशी चित्रे होती तर काही ठिकाणी रिलीफवर्क (उठावाचे कोरीव काम) होते. मधूनमधून खाचांमध्ये लाल काळ्या रंगांच्या रेघोट्या ओढल्या होत्या. एकदा पाहिल्यावर लोकांना जणू सर्व सहज समजत होते.

रात्र झाली. लवकर परतायला हवे. पाठीमागच्या कोरड्या नाल्यावरून जाणाऱ्या शॉर्टकटचाच रस्ता धरला. सरकारतर्फे मोठमोठे लाकडांचे ओंडके गंगेतून काढून जोडून ठेवीत होते. लक्ष्मणझूल्याच्या बाजूच्या जंगलातून कापून हे गंगेत फेकून देतात आणि पाण्याबरोबर वाहात वाहात ते सरळ या बाजूला येतात.

चालता चालता ठेच लागून या लाकडांवर मी वरच्यावर धडपडत होते. काट्यांनी भरलेल्या एका जंगली झाडाखाली, निर्जन अशा जागेत धुनी पेटवून एक लठ्ठसा संन्यासी बसला होता. अंगात लाल बंडी घातलेला एक हिंदुस्थानी तरुण त्याच्या पायाशी धरणे धरून पडला होता. मी ऐकले, साधू त्याला हाताने हलवून सांगत होता, " देबता, अपदेबता सबको बस 'मैं' कर सकता हूं, शनि, राहू, केतूको दम घोंटकर मार सकता हूं, लछमीके पाऊमे बेडी डालकर गायकी तरह खूंटे से बांधकर रख सकता हूं —— सब कर सकता हूं, लेकिन, पहले खरच तो करेगा, तब ना फल पायेगा ?"

हंसदेव अवधूत मेळयासाठी आले होते. सप्तसरोवरांच्या तीरावर उतरले होते. आक्का म्हणाल्या, " सिद्धपुरुष आहेत ते. त्यांची फार प्रसिद्धी आहे. त्यांचे दर्शन मिळणे मोठे सद्भाग्याचे. "

हरिद्वारच्या पुढे गेल्यावर शहरामध्ये सप्तसरोवर आहे. तिथे जायला एक सरळ असा रस्ता नाही. जे कोणी आधी जाऊन आले होते त्यांच्याकडून ऐकले होते की टांगा वाटेतच थांबवून पुष्कळ अंतर पायीच जावे लागते.

कशीबशी हुज्जत घालून भाडे ठरल्यावर टांगेवाला एकदाचा तिकडे न्यायला तयार झाला. अगदी भर दुपारी डोक्यावर सूर्य तळपत असताना, श्रीसिद्धि-विनायकाचे नामस्मरण करून आम्ही निघालो.

शहरामधून टांगा ठीक चालला होता. त्यानंतर लागला ओबडधोबड कच्चा रस्ता. थोडा पायी चालायचा, थोडा बैलाच्या गाडीत बसून जायचा, रस्ता कुठं चिखलानं भरलेला तर कुठं दोन पावलं अंतराअंतरावर गवत आणि डबकी असलेला.

टांगेवाल्याला रस्ता माहीत नव्हता. सर्व काही ठीक होईल असे तो म्हणाला. त्याला वाटले होते रस्ता शोधून काढायला त्रास होणार नाही. या शहरात हा टांगेवाला नवीन होता. बहुतेक सर्व असेच नवीन होते. पश्चिम पाकिस्तानमधून आलेल्या निर्वासितांपैकी ते होते. त्यांपैकी अनेक जण अगोदर चांगली चांगली कामे करीत होते. इथे आल्यावर दुसऱ्यापुढे हात पसरून पोट भरण्याऐवजी त्यांनी हा व्यवसाय उचलला होता.

इतके दिवस त्यांच्याबरोबर राहून मी पाहिले, फार सज्जन होते हे सर्व लोक. दादा तर काय टांग्यात चढल्याबरोबर टांगेवाल्याशेजारी बसून बोलायला लागत. प्रथम सर्व विचारून घेत, कुठून आलात ? मुलेबाळे बरोबर घेऊन आला का गावा-लाच आहेत ?

मुलाबाळांचे नाव काढताच गप्पा चांगल्या रंगत, नाना दु:खांच्या हकीकती. सबंध रस्ता त्यांच्याविषयीच्या सहानुभूतीने मन भरून रहायचे. टांग्यातून उतरताना निरोप देणाऱ्या मित्राचा गळा भरून यायचा.

कालच एका टांग्यात बसलो होतो. नेहमीप्रमाणे दादांनी टांगेवाल्याबरोबर संभाषण सुरू केले. धडधाकट चांगला पुरुष तो. पण केसाला तेलाचा हात नव्हता, अन अंगात फाटका कोट होता. बोलता बोलता मध्येच तो इंग्रजीही बोलायचा. उच्चार अगदी स्पष्ट. त्याच्या बोलण्यावरून माझ्या लक्षात आले की तो सरहद्दी-वरच्या प्रदेशात एका मोठ्या ऑफिसमध्ये मुख्य कारकून होता. तो सांगत होता.

" क्या किया जाय ! औरत बच्चों को खिलाना तो होगा ? इथं कोण कुणाला नोकरी देणार ? काही पैसे हातात होते. त्यांनीच हा टांगा, घोडा विकत घेतला. दिवसभरात जी काही मिळकत व्हायची त्यातच दोन वेळचं निभायचं. " त्याचा धाकटा भाऊ एंजीनिअर होता. त्याला एका कापडाच्या दुकानात काम मिळाले होते. टांगेवाला म्हणाला, " पिछे इरादा हाय, दोनो भाई मिलकर कोई अपना रोजगार करेंगे" म्हणजे थोडी शिल्लक जमली तर ते दोघे भाऊ मिळून स्वतंत्र व्यवसाय करणार होते.

आजचा टांगेवालासुद्धा तसाच नवीन. अजूनपर्यंतदेखील त्याला रस्ता चांगला माहीत नव्हता. मैदानांतून इतक्या वाटा फुटलेल्या पाहून तो बावरून जायचा. मागे पुढे, जवळपास कुणी नव्हते की ज्याला विचारून घेईल.

पुष्कळ पुढे आलो होतो. मागे फिरून चालले नसते आता. अरुंद पायवाटेवरूनच मोठ्या धैर्याने टांगेवाला टांगा चालवीत होता. पायी चालायच्या वाटेवर खाचखळगे सांभाळून पावले टाकीत जाण्यात विशेष त्रास होत नव्हता. परंतु टांग्याचे चाक जेव्हा एकदा खाली जायचे किंवा एकदम वर यायचे तेव्हा त्याच्या हिसक्यापायी वरती टपावर आपटून आपटून डोके फुटायची पाळी आली नुसती. भीतीने मी नुसती मरत होते. जो तो आपले डोके दोन हातांनी घट्ट धरून ठेवीत होता. लागले तर हाताची बोटेच ठेचली जातील पण डोके तरी शाबूत राहील. एकीकडे पावसाचे जमलेले पाणी टांग्याच्या चाकांमुळे उडून उडून कपड्यांवर लहानमोठी नाना आकाराची खडी काढली जात होती. टांगेवाला हवेतच चाबकाचे फटके सपासप ओढीत होता. घोडा अडून बसला. मनाविरुद्ध थोडा चालायचा. पण नंतर काही केल्या एक पाय पुढे टाकीना. टांगेवाल्यानेच त्याची आशा सोडली. लगाम धरून हातात चाबूक घेऊन तो खाली उतरला आणि आम्हांला म्हणाला, " अब आगे पायदोल चले जाइये. देखिये ना, इसतरसे गाडी कैसा जाएगी ? " थोड्या थोड्या अंतरावर, पावसाच्या साचलेल्या पाण्यावर दोन हात लांब आणि आठ बोटं रुंद अशा लहान लहान बांबूचे पूल होते. खरेच होते, या वाटेवरून टांगा जाणार तरी कसा ?

टांगेवाला म्हणाला होता, "इथंच जरा पुढं गेल्यावर सप्तसरोवर सापडेल." पण कुठे ? सप्तसरोवरांपैकी एकसुद्धा सरोवर दिसत नव्हते नजरेपुढे.

तरीसुद्धा आम्ही खाली उतरलो. " गुडघ्यापर्यंत कपडे वर धरून पाण्यातून, चिखलातून झपाझप चालत राहिलो. आक्का म्हणाल्या, " बरोबर नाकासमोर चाला. इतकं दूर ओढून आणून हंसदेव आपल्याला तसंच का सोडून देणार ? "

अरुंद वाटेवरूनच पुढेपुढेच चालत राहिलो. रस्त्याच्या डाव्या बाजूला काही पडकी घरे होती. घर दिसले की तिकडे धावत जात होतो. असे वाटायचे इथेच हंसदेव सापडतील बहुतेक. जाऊन पहावे तर घरात नुसते भिरभिरणारे वारे. तिथे माणसाचा थांगपत्ताही नव्हता. एखादे घर मोडकळीस आलेले. एखाद्याला कुलूप लावलेले, तर एखादे झाडाझुडुपांनी झाकलेले, एका घरातून जसे काही लोकांचे कुजबुजणे मला ऐकू आले. गडबडीने मी पुढे गेले. हो, लोक होतेच की तिथे. एकच कशाला, तशी बरीच मंडळी होती तिथे. चांगल्या मोठमोठ्या खोल्या होत्या. चुनामाती लावून भिंतींची दुरुस्ती चालली होती. समोरच्या बागेत माळी गवत कापून साफ करीत होता. गंज धरलेली, मोठमोठी पितळेची, लोखंडाची पातेली, कढया या खोलीतून त्या खोलीत नोकर ने-आण करीत होते. सगळीकडे नुसती आरडाओरड, घाई धावपळ, मन कसे आनंदाने, उत्सुकतेने उल्हसित झाले. म्हणजे हंसदेव इथेच असणार. त्यांचे भक्तगण अनेक होते, ते त्यांना एकटे थोडेच राहू देणार ? इथे येऊन सर्वांनी मिळून डेरा ठोकला आहे असे ऐकले होते. कदाचित आतापावेतो आवराआवर करून झाली नसेल. परंतु सरोवर ? सप्तसरोवर म्हटले तरी सात नसू देत, कमीत कमी एक, ज्याची कल्पना करीत इथवर आलो ते मोठं सरोवर, ते कुठं आहे ? त्या दिवशी मणिबहादूरची पत्नी रेवादी आल्या होत्या. त्या म्हणाल्या होत्या, " बाई ग, पाण्याच्या तीरावर काय ती थंड हवा ! तिकडे गेलातच तर बरोबर गरम कपडे, शाल वगैरे घेऊन जा. " सप्तसरोवरांचे पाणी दिसेल म्हणून मी चोहोकडं पाहिले; मन अगदी खट्टू झाले. पण लगेच सावरले. न का दिसेना पाणी, जाऊ दे झालं. एवढ्या आशेनं ज्यांना पहाण्यासाठी आले ते हंसदेव तर दिसले.

आक्का पुन्हा पुन्हा मागे वळून पाहात होत्या. दादा मागे राहिले होते. सर्वांनी मिळून एकदम आत जावे अशी त्यांची इच्छा होती. महात्मादर्शनासाठी मागेपुढे कशाला ? "जा बोलाव ना त्यांना, जरा भराभर पाय उचलून येऊ दे. "

छाती धडधडत होती. –हंसदेव ! कसे दिसतील कोण जाणे ? प्रथमदर्शनच, वाईट झाले नाही म्हणजे झाले. मी माझे मन तयार करीत होते.

आम्ही फाटकातून आत गेलो. चौकशी करायला कोण आधी पुढे जाणार ? दादांनाच ढकलले त्या कामगिरीवर. सभ्य गृहस्थासारखा दिसणारा तिथलाच एक कुणी व्हरांड्यांत येताच दादा घाईघाईने त्यांच्याकडे गेले व त्यांनी विचारले, " हंसदेवांचं दर्शन केव्हा होणार ? फार दुरून आलो आहोत. " हे बोलणे ऐकल्या-

वर त्या गृहस्थांनी डोळे किलिकले करून, कपाळाला आठ्या घातल्या, "हंसदेव! ओ कौन हाय ? मैं नहीं जानता." असे म्हणतच त्याने बेपर्वाईने हात उडवले.

मी अगदी हताश झाले. दादांनी धीर दिला, "काही चिंता नाही. शोधून काढूच, जाणार कुठं ?"

पुन्हा चालायला लागलो. इतक्यात दोन-चार शेतकरी वाटेत दिसले. कोणी गवत घेऊन चालले होते, कुणी लाकडाची मोळी नेत होते, कुणी शहरातून परतताना पीठ, मीठ विकत घेऊन त्याच्या पुरचुंड्या पंचात बांधून घेऊन घरी परतत होते, जो भेटेल त्याला मी विचारायची, "हंसदेव कुठं आहेत ?" थाबून लक्ष देऊन ते ऐकायचे, ऐकून थोडा विचार करायचे आणि विचार करून मग कोणी एखादा मागचा, कोणी पुढचा, कोणी उजवीकडचा तर चौथा कोणी डावीकडचा रस्ता दाखवून घाईघाईने आपल्या वाटेला लागायचे. आम्ही मात्र भुईचक्राप्रमाणे फिरत रहात होतो. जेव्हा कुणी काही सांगायचे तेव्हा असे वाटे की त्यालाच बरोबर माहिती आहे आणि तो बरोबरच सांगतोय. आणि मग त्याने दाखवलेल्या रस्त्याने आम्ही तडफडत धावत सुटायचे. एकदा एकाच्या सांगण्यावरून पुढे जायचे, लगेच दुसऱ्याच्या सांगण्यावरून मागे परतायचे. मग मात्र अति झाले. अगदी अशक्य झाले. निश्चित माहीत नसताना पायपीट करण्याचे श्रम आता सहन होईनात. मनातल्या मनात चडफडून, शिव्याशाप देऊनही जेव्हा हंसदेवांचा ठावठिकाणा लागला नाही तेव्हा पुन्हा एवढी सगळी वाट मागे परत चालून जाऊन मग टांग्यात बसायचे या विचाराने अगदी रडू कोसळायची पाळी आली. तेवढ्यात पूर्वीसारखाच रस्त्यावरचा एकजण समोर येऊन उभा राहिला. त्याने विचारले, "काय हंसदेव पाहिजेत का ? ओ जो पाथरिला उंचा नीचा बांध हाय, उसीके बगल में सप्तसरोवर हाय. उसके किनारे किनारे बहुत से महात्माओं ने डेरा डाल रखा हाय. जाकर पता लगाओ, वहीं हंसदेव मिल जायेंगे."

हा खरे सांगत होता का इतरांप्रमाणेच अंदाजाने बोलत होता. कोण जाणे ? आत्ताच तर हे एकाच्या सांगण्यावरून बांधाच्या काठापर्यंत जाऊन परत आलो होतो आणि आता पुन्हा इतके दूर जायचे. काटेरी झुडुपांनी भरलेली ती सगळी वाट ! पायाला इतके काटे बोचले असून पायांची आगसुद्धा होत होती.

दादा म्हणाले, "इतकं झालं तसं आणखी एकदा पाहू जाऊन. पण आता मात्र हे शेवटचंच हं."

कसंबसं रेटत बांधापर्यंत जाऊन पोचलो.

" अहो दादा, अहो आक्का, लवकर या, धावत या. " मी एकदम ओरडायला लागले. पांढऱ्या रेतीच्या पात्रामधून निर्मळ निळी गंगा संथपणे वाहत होती.

वाऱ्याची एक थंड झुळूक तोंडाला शीतलसा स्पर्श करून गेली. एका क्षणात सर्व शीण निमाला.

गंगेच्या या काठाशी धरणाच्या बरोबर खालच्या बाजूलाच वाळूचा किनारा होता. तिथेच लहानमोठ्या अशा पिवळ्या गवताच्या अगणित झोपड्या होत्या. नेमक्या कोणत्या कुटीत हंसदेव राहात होते तेच माहीत नव्हते. ह्या इतक्या तंबूमधून शोधून काढायचे म्हणजे आणखी एक संकटच. आज सकाळी कोणाचे तोंड पाहून बाहेर पडलो होतो कोण जाणे !

आमच्यापैकी हंसदेवांना आधी प्रत्यक्ष असे कुणीच पाहिलेले नव्हते. पुस्तकात पाहिलेल्या फोटोवरून जी काय आठवण होती त्यावरच दादा, आक्कांचा भरवसा होता. त्याशिवाय आणखी एक आशा वाटत होती. फार दूर अंतरावरूनदेखील हंसदेवांच्या बिऱ्हाडातील गडबड चांगली ऐकू येईल असे वाटत होते. तिथे कितीतरी लोकांची गर्दी होणार, यात्रेकरूंची ये-जा, धक्का-धक्की असणार, झेंडे, पताका, विशेष थाटमाट नक्कीच असणार. त्याकडे लक्ष जाणार नाही असं कसं होईल !

प्रत्येक कुटीत दुरूनच बारकाईने पाहत पाहत चालत होतो. जास्त जवळ जायला भीती वाटत होती. कोणता साधू कसा असेल कोण जाणे ? एकदम कुणी संतापला तर ? साधूंमध्ये दुर्वाससुद्धा असतातच.

हातात खापराचे कमंडलू घेऊन गंगेवरून एक साधू येत होता; तो म्हणाला, ' आप लोग बहुत आगे निकाल आये हैं, आप गंगा के किनारे किनारे पिछे को चले जाईये ओ, जो देखिये, बडे बडे पाथर हाय -- जहाँ से अभी एक बगुला उड गया, उसीके पीछे एक पेड हाय, ओहाँ जाकर पता लागाइये. हंसदेव ऐसीही जगह में रहते हैं. "

उलट्या दिशेला तोंड फिरवून आम्ही चालायला लागलो. या वेळी दादा पुढे, मी आणि आक्का मागे, नाकातोंडांवर गार वाऱ्याचा तडाखा बसत होता, केस विसकटून इकडेतिकडे उडत होते, साडीचा पदर आणि गरम शाल अंगाभोवती घट्ट लपेटून घेतली होती.

तिकडे, या जंगलाच्या जवळ, गंगेच्या अलीकडे, पलीकडे, मध्ये पात्रात, मागे, पुढे, दूर दूर अंतरावर कितीतरी झोपड्या घातलेल्या दिसत होत्या. तिथे कोण राहत होते कोण जाणे.

आमच्याप्रमाणेच दुसऱ्या दोनचार यात्रेकरूंचे गटही झोपड्या शोधीत शोधीत हिंडत होते.

एकदम चालायचे थांबवून, डोळ्यांवर हात आड धरून आक्का दूरचे काहीतरी पाहायला लागल्या. फिकट हिरव्या गवताने झाकलेला जमिनीचा उंचवटा गंगेच्या बाजूला उतरता झालेला दिसत होता. त्याच जागेवर एका बाजूला उंचच्या उंच एक निमूळते झाड, आणि त्याच झाडाच्या शांत सावलीत तख्तावर कुणीतरी बसले होते. मी पाहिले, दादा उठून काठाकाठावरून तिथे गेले, पायातले जोडे त्यांनी काढून ठेवले आणि त्यांना त्यांनी नमस्कार केला.

म्हणजे हेच का हंसदेव? मानेनेच होकार देत देत आक्का झपाझप चालू लागल्या.

हंसदेव पाठमोरे बसले होते. मी नमस्कार केला. एका भक्ताने खजुराच्या पानांची चटई आणून गवतावर घातली. एकमेकांना चिकटून आम्ही हंसदेवांच्या समोर बसलो.

डोक्यावर लाल कानटोपी, अंगात लालसर भगव्या रंगाची पातळ कफनी, हातात पट्ट्यापट्ट्यांचा पंचा, लाल तुकतुकित चेहेरा असे हंसदेव काळ्या कांबळ्यावर बसले होते.

आक्का कुजबुजल्या, "यांच्या रूपाचं वर्णन फार ऐकलंय. पूर्वी हे आणखीनच देखणे होते. आता फार थकलेले दिसतात."

कांबळ्याच्या बाजूलाच अभ्रा घातलेल्या दोन उशा पडल्या होत्या. अभ्र्याच्या कोपऱ्यांवर कुणातरी भक्ताने हाताने हिरव्या रेशमाने भरतकाम केलेले दिसत होते. हंसदेव दुपारी विश्रांती घेत होते बहुतेक.

या अशा थंड हवेत उघड्यावर विश्रांती घेतात? "जय जय राम" असे म्हणून एक साधू महाराजांसमोर येऊन उभा राहिला. एकदमच कुठूनतरी अवतरला जणू इथे. त्यांना पाहून मन आनंदाने नाचायला लागले. अरे, आजच तर येताना, वाटेत सुरुवातीलाच, कोणखळला वटवृक्षाजवळ यांना पाहिले होते.

सेवाश्रमाहून बाहेर पडल्यावर एका वळणानंतरच वटवृक्ष होता. त्याच्या खालून टांगा चालला होता, मी पाठीमागच्या बाजूला तोंड करून बसले होते. या कडक थंडीत आपादमस्तक जाड शाल पांघरून मी बसले होते. तेव्हा मी यांना पाहिले होते; उघड्या अंगाने झपाझप चालत येत होते. काय ती त्यांची चालण्याची ऐट! प्रौढ, श्यामल वर्ण, अंगाने धडधाकट, उंचा पुरा, ताठ, खांद्यावर व्याघ्रचर्म, हातात त्रिशूळ आणि खापराचे कमंडलू. स्मिताने तेजस्वी दिसणारा धीर गंभीर चेहेरा,

त्या जागेवर तिने गंगाजल शिंपडले असते आणि नंतर पाणी भरलेल्या घमेल्यात फळे बुडवून, कापून तिने ती दगडाच्या थाळीमध्ये व्यवस्थित ठेवली असती.

सप्तसरोवरांचे पाणी नेण्यासाठी मावशी भांडे घेऊन आली होती ती ते घरी ठेवणार होती.

मी विचारले, " सप्तसरोवर कुठं आहे ? "

माझा प्रश्न ऐकून हंसदेव म्हणाले, " इथल्या या गंगेचं नावच सप्तसरोवर. पूर्वी कधी काळी सात धारा असतील कदाचित. उभं राहून पाहिलंत तर लक्षात येईल. आता बहुतेक सर्व लुप्त झाल्या आहेत. सात बाजूंनी सात धारा येऊन इथं गंगेला मिळाल्या होत्या. वसिष्ठ आदी सात ऋषींनी इथं तपस्या केली होती. स्वत: शुक-देवांनी इथं या सप्तधारेजवळ भागवत ऐकवलं होतं. परीक्षितानं इथं देह ठेवला होता. फार पवित्र आहे ही जागा ! "

खरोखरच ते स्थान फार रम्य होते. मोकळे आणि अगदी शान्त असे. शहरा-तील गडबडगोंधळ इथे पोचत नव्हता. दूरवरचे पर्वत किती जवळ वाटायचे. सगळे एकच. निळे पर्वत, निळे आकाश, गंगाजलही निळेच आणि त्याच्या काठा-काठानेच भडक भगव्या रंगाचे वस्त्र पांघरून एक संन्यासी एकाकी चालला होता. विस्मयाने भारावून गेलेले मन त्यांच्या बरोबरच धावू लागले. मी एकटक पाहात राहिले.

हंसदेव म्हणाले, " यासाठीच ही जागा निवडली आहे. हरिद्वारला फारच गर्दी. किती लोक येतात तिथं, इथंसुद्धा पुष्कळ येतील. परंतु या जागेचा गुणच असा आहे की इथं गर्दी जाणवायची नाही. "

ही आताची खेप धरून आजपर्यंत सात वेळा हंसदेव पूर्णकुम्भला आले होते.

" म्हणजे त्यांचं वय काय असेल सध्या ? "

त्यांनी सांगितलं, " मी सांगतो. मला कुम्भमेळ्याचा हिशोब माहीत आहे. मी वयाचा हिशोब कधीच केला नाही. "

आक्कांनी विचारले, " कुम्भमेळ्यात स्नान केलं तर त्याचं फळ मिळतं हे खरं आहे का ? "

" विश्वास असला तर सर्वच खरं आहे. असं पाहा. हे सर्व संप्रदायांचे साधू, इतका त्रास सहन करून या एकाच जागी येतात, कुणी दूर दूरच्या देशांतून येतात, कुणी दुर्गम अशा पर्वतातील गुहांमधून येतात, ते कसल्या ओढीनं ? कोटयवधी रुपये खर्च करूनदेखील इतक्या साधुजनांना एकत्र आणणं राजामहाराजांनाही कधी

शक्य होणार नाही. त्यांची श्रद्धा असते म्हणूनच ना ते यतात ? "

त्या गोष्टीला आणखीही एक बाजू आहे. साधी गोष्ट पाहा, हे असतं साधूंचं संमेलन. सर्वच येतात, सर्वांच्या भेटी गाठी होतात. एकाच उद्देशानं सर्व एकाजागी एकत्र जमतात. "

दादा म्हणाले, " बरं, आईवडिलांसाठी जे तर्पण करतात. ते काय योग्य ठिकाणी जाऊन पोचतं ? "

" पाहा, हीसुद्धा श्रद्धेची बाब आहे. श्रद्धा असली तर सर्व शक्य असतं. " एवढे बोलून हंसदेव गप्प राहिले. थोडचा वेळाने मान वर करून म्हणाले, " एक गोष्ट मान्य करा. हे पाहा तुमच्या आईवडिलांनी तुम्हांला लहानपणापासून इतकं वाढवलं, तहानभुकेला अन्नपाणी दिलं, तुमच्यासाठी किती त्रास सहन केला, त्यांच्या नावानं तुम्ही एक दिवस तर्पण केलंत तर त्यात त्रास नाही ना काही ? "

जी बाई फळे कापीत होती, तिने कापलेली फळे समोर आणली. हंसदेवांनी स्वत: ती सर्वांना वाटली. बशीत काढून घेऊन त्यांनीही स्वत: काही फळे खाल्ली. ते म्हणाले, " जा, माझं अन्नपूर्णेचं भांडार पाहून या. "

या झोपडचांपैकी एकातच कोठार होते. पोती पोती कणीक, डबे भरभरून तूप, आणि टोपल्या भरभरून बटाटे, कोबीच्या भाज्यांनी खोली भरली होती नुसती. मेळ्याच्या वेळी दररोज हजार माणसांचा 'भंडारा' होईल. त्यासाठीच ही सारी व्यवस्था.

गंगेच्या किनाऱ्याला लागूनच मोठे स्वयंपाकघर तयार होत होते. पाणी भरून ठेवण्याचा त्रास होणार नाही जास्त. ओटा घालून त्यामध्ये चर तयार केले होते. एकेका वेळी किती फुलक्या शेकल्या जातील कोण जाणे.

हंसदेव या तंबूत काही दिवस होते. गवताने शाकारलेला हॉल असलेल्या घरात ते आता जाणार होते. नवीन घर मिळाल्यामुळे ते खुशीत होते. म्हणाले, " जमिनी-वर बिछाना घाला. बिछान्याखाली गवताचा जाड थर घातला तर जमिनीचा गारठा लागत नाही. "

लहान मोठ्या सर्वच गोष्टींत त्यांचे फार लक्ष. स्वत: पाहायचे, ऐकायचे आणि अंदाज करायचे. सजावटीची बाजूसुद्धा ते सोडीत नसत. झोपडीचा दरवाजा जरा वाकडा झाला होता. आमच्याशी बोलता बोलता तिकडे पाहून त्यांनी कितीदा तरी तक्रार केली परंतु नंतर त्यांनी स्वत:चीच समजूत घातली, " काय करणार, फार अडाणी असतात ही माणसं. "

वेळ होत आली. आता निघायला हवे होते. तिथे एक लाल रंगाची बस होती. ती या इथल्या लोकांचीच निरनिराळ्या कामासाठी ती बस शहरात जायची, सामानसुमान आणायची, बाजारहाट करायची. ड्रायव्हरने गाडी सुरू केली. पुन्हा शहरात कशासाठी तरी जाणार होता. हंसदेवांनी ड्रायव्हरला हाताने खुणवून थांबवले आणि आम्हांला म्हणाले, "तुम्ही मंडळी परत कशी जाणार ? या बसनंच जा."

मी म्हणाले, "बसची गरज लागणार नाही. आमच्या बरोबर टांगा आहे. जंगलाच्या बाजूला तो वाट पाहात असेल."

त्याचे नाव काढतो ना काढतो तोच तो समोर हजर. त्याने शोधून काढले याचाच त्याला अभिमान वाटत होता. तो म्हणाला, "वेळ टळून गेली, आता मात्र मेहरबानी करून उशीर करू नका."

"निघालात ? चला तर, रहाण्याची गैरसोय झाली तर इथं परत या. पुष्कळ डेरे आहेत. तुम्हा लोकांसाठीच तर ते तयार केलेत ?" एवढे बोलून हंसदेवांनी आम्हांला निरोप दिला.

शांत मनानेच आम्ही टांग्यात जाऊन बसलो.

निघण्यापूर्वी एक क्षणभर थांबून मी मागे वळून पाहिले. माझा तो साधू, तो दूर कुठेतरी दिसेनासा झाला होता. मनात आले, 'आणखी एक वेळा त्यांना पाहिले असते तर !'

फाटक ओलांडून येताच समोर दोन वानरे दिसली. भिंतीला चिकटून, गुडघे वाकवून ती बसली होती. त्यांना पाहताच शशीमहाराज मागे झाले. ते म्हणाले, "वानरांच्या बाबतीत जपून असा. नाही, हसू नका, आता इथं इतकी वानरं नाहीत हे खरं आहे. पकडून पकडून बाहेर पाठवली आहेत. पण पूर्वी इतकी माकडं होती इथं ! आणि, त्यांचे एक एक अत्याचार काय सांगावेत ! एक दिवस मी रस्त्यानं येत होतो. सेवाग्रामच्या अगदी जवळ पोचलो होतो. तेवढ्यात एकदम दोन बाजूंनी दोन माकडं आली आणि त्यांनी मला ओढून नेऊन अक्षरशः नाल्यात फेकून दिलं. मी तर पार बावरून गेलो होतो. काय करावं ते सुचत नव्हतं. शेवटी निर्वाणी आखाड्याचे लोक आले व त्यांनी त्या माकडांना हाकून दिलं आणि मला नाल्यातून बाहेर काढलं. माकडांनी मला का धरलं होतं ते नंतर माझ्या लक्षात आलं. थंडीमुळं

शालीच्या आत छातीजवळ मी दोन्ही हात घेतले होते; आणि त्या दोन माकडांना वाटलं असणार की मी काहीतरी खाद्यपदार्थ घेऊन जात आहे."

संधी मिळताच शशीमहाराजांना बरोबर घेऊन आम्ही फिरायला बाहेर पडत असू. वाटेने चालता चालता त्यांच्याकडून अनेक गोष्टींची माहिती आम्ही करून घेत होतो. अनेक घटनांशी या जागेचा संबंध होता. ऐकलेले आणि पाहिलेले, गत आणि वर्तमान या दोहोंना एकत्र गुंफून घेतले म्हणजे त्याची स्मृती स्पष्टपणे मनात राहते. स्नेहशील, अशक्त दुबळा माणूस शशीमहाराज, साध्या सरळ ज्ञानमार्गाने चालणारा माणूस, सरळ बोलण्याचा सरळच अर्थ घेत, विचार बुद्धीची स्वच्छ मीमांसा करायचे. भक्तीरसाच्या आवरणाखाली इतर सर्व काही गोंधळून गेलेले नव्हते. शिवाय त्यांच्या वागण्यामुळे जिव्हाळा निर्माण व्हायचा. तीर्थयात्रेला आलो होतो. आमचे येणे फुकट जाऊ नये, कुठल्यातरी भोवऱ्यात सापडून गटांगळ्या खाण्याची पाळी आमच्यावर येऊ नये यासाठी ते फार दक्ष असत. कुठे काय पाहिले पाहिजे, कसे पाहिले पाहिजे, काय काय माहीत असले पाहिजे, या सर्व गोष्टींसंबंधी ते अगोदरच स्पष्ट आराखडा आखून देत असत. त्यामुळे निष्कारण शोधाशोधी, जिवाची तडफड, काळजी या सर्वांतून आमची साहजिकच सुटका व्हायची.

शशीमहाराज मूळ आसामचे. शिलचरला पुष्कळ दिवस होते. आक्का आणि दादांबरोबर त्यांची फार जुनी ओळख. कितीतरी वर्षांनी त्यांची इथे पुन्हा भेट झाली होती. ते हिंडत फिरत सहजच यायचे, एकाएकी आठवण होईल त्याची चवकशी करायचे, हा कसा आहे, तो काय करतो, लहानपणच्या गोष्टी बोलत. ज्या ठिकाणी बालपण गेले तिथल्या स्मृती एकदम त्यांच्या मनात तरळायच्या आणि मग ते विचारायचे, "आता ती जागा कशी आहे? आमच्या लहानपणी जंगल होतं त्या जागी, आणि ती भैरवी? कधी वारली ती? त्या वेळच्या पुराच्या वेळी मी तिला रोजच मूठभर तांदळाची भिक्षा घालून यायचा. ती उंच अशा डोंगरावर एका झोपडीत राहायची. पुराच्या पाण्यामुळे ती जागा एखाद्या बेटासारखी झाली होती. गळ्यापर्यंत पाणी आलं होतं. चार पाच दिवस मला तिच्याकडं जाता आलं नाही. पाणी थोडं ओसरल्यावर तांदूळ घेऊन गेलो. मी तिला विचारलं, हे इतके दिवस काय जेवलीस? भैरवीनं उत्तर दिलं, 'काय जेवणार दुसरं?' मी विचारलं, 'काही न जेवता कसं राहू शकलीस?' ती उत्तरली होती, 'अरे, इतके दिवस इतकं जेवलेय. काही दिवस परमेश्वराचं नामस्मरण करून काढता येत नाहीत का?'"

"भैरवी जातीनं चांडाळ होती, तरीसुद्धा तिच्या तोंडी कशी भाषा होती ते

तुम्हीच पाहा. त्यानंतर एकदा तिला तांदूळ देऊन मी परत येत असताना भैरवीनं मला पकडलं; ती म्हणाली आज आलाच आहात तर जेवल्याशिवाय जाता यायचं नाही. तुम्ही तांदूळ आणलेच आहेत. मी स्वयंपाक करते. बरोबर बसून जेवता येईल. माझ्याबरोबर एक मुलगाही होता. घराभोवती केळीची पुष्कळ झाडं होती. भैरवीनं झाडावरची कच्ची केळी घालून भात केला. काय सांगू तुम्हांला, जणू अमृतच खाल्लं आम्ही त्या दिवशी, अजूनही तोंडात आहे ती चव. "

या प्रकारच्या शशीमहाराजांच्या लहानमोठ्या स्मृति-कथा ऐकायला फार आवडायच्या. त्या संन्यासिनीच्या हृदयीची सामान्य माणसासारखी कोमलता अंत:करणाला जाऊन भिडली.

श्रीमाताजींसंबंधी यांच्याकडून ऐकावे अशी आक्कांची फार मोठी इच्छा होती. त्या म्हणायच्या, ' पुस्तकातून जे वाचतो त्यांनी खरं म्हणजे समाधान होत नाही. त्यांच्याजवळ राहिलेले त्यांचे शिष्य भेटले असते तर त्यांच्याकडून ऐकलं असतं.

शशीमहाराज राममय महाराजांना घेऊन आले. लहानपणीच त्यांनी माताजीं-कडून दीक्षा घेतली होती. त्यांच्या तोंडावर लहान मुलासारखे निर्मळ हास्य होते आणि बोलणेही अगदी गोड होते. गोष्ट सांगण्याची पद्धतही फार सुरेख होती. माताजींच्या गोष्टी सांगताना ते तन्मय होऊन जात. सांगता सांगता भावनेच्या भरात ते कुठच्या कुठे जात. असे वाटायचे जणू लहान बाळ आईच्या मांडीवर डोलत आहे. मुग्ध मनाने त्यांचे बोलणे ऐकत असताना त्या गोष्टींमधून माताजींचे स्पष्ट दर्शन व्हायचे. एकामागून एक एक त्यांची छायाचित्रेच डोळ्यांसमोरून जायची. ही एक आणखी निराळीच सृष्टी. ह्याची गोडी निराळीच. अंतरंग विशेष तादात्म्य पावल्याशिवाय असे सुंदर, गोड रूप प्राप्त होणेच शक्य नाही.

राममय महाराज म्हणाले, ' तेव्हा काय एवढं कपाळ समजत होतं. लहान होतो, लाड आणि हट्ट यांमध्येच वेळ निघून गेला. मी लहान म्हणून माताजींनीसुद्धा मला फार जवळ केलं होतं. त्यांचे मोठे मोठे शिष्य म्हणत, राममय लहान असूनही त्यानं आईना जिंकलं होतं. आई किती सहजपणे मोठी शिकवण द्यायच्या. एकदा आईचा वाढदिवस होता. तेव्हा त्या जयरामवटीत लहानशा घरात राहात होत्या. वाढदिवसानिमित्त पुष्कळ शिष्य आले होते. स्वत: स्वयंपाक करून आई सर्वांना जेवायला वाढीत. सर्व काम त्या स्वत:च हातांनी करीत. मी जेव्हा अगदी पहिल्यान आईकडं निघालो होतो तेव्हा आई (माताजी) कशा दिसत असतील याचा मना-तल्या मनात विचार करीत करीतच चाललो होतो. मी गेलो आणि पाहिलं तर

आई खोलीचा केर काढीत होत्या. अगदी मातृमूर्ती सर्वसामान्य आईसारखीच. घराघरातून दिसते तशीच. बरेच दिवसपर्यंत माझ्या मनाला एक गोष्ट सारखी टोचत होती – वाटायचं, आईनी केर काढला नसता तर चाललं नसतं का ? निदान अशा दिवशी तरी ? आईचं केर काढतानाचं चित्र माझ्या बालमनाला सहजपणे पटत नव्हतं. ते मनाला बोचत असे हृ. तर त्या दिवशी आई मला म्हणाल्या, हे सर्व आले आहेत. जा बरं गावातून थोडं दूध मिळवून घेऊन ये. खीर करते. खांद्या-वर दुधाची कासंडी घेऊन मी लगेच बाहेर पडलो. घरोघरी हिंडून आठ शेर दूध मिळवून आणायला उशीर झाला. मी परत आल्यावर इतका उशीर का केला म्हणून सर्वजण माझ्या अंगावर ओरडले. आईमात्र तोपर्यंत तशाच बसून राहिल्या होत्या, त्यांनी तोंडात पाण्याचा थेंबही घातला नव्हता.

" घरात शिरताच मी पाहिलं, एका चौरंगावर पाय खाली सोडून आई बसल्या होत्या. केस मोकळे सोडले होते. सर्वांनी आईची पूजा केली होती. मी येताच आई म्हणाल्या, ' आलास ? फार उशीर केलास बाबा. थोडं खाऊन तरी घे. पण आधी तुझी पूजा उरकून घे. "

" चौरंगाच्या जवळच एका ताटात पांढरी आणि लाल कमळं ठेवलेली होती. कोणतं कमळ घ्यावं ह्या विचारत मी होतो, तेवढ्यात आईनी सांगून टाकलं, लाल कमळ घे; त्याला तुळसीपत्र लागत नाही. आईनीच मंत्र सांगितला. तोच मंत्र उच्चारून आईच्या पायांवर मी कमळ वाहिलं आणि त्यांना नमस्कार केला. आई म्हणाल्या, " थांब, आणखी दोन कमळं घे. ज्ञान आणि गिरीन आज हजर नाहीत, त्यांना तू फार आवडतोस, त्यांच्या नावानं तूच मला कमळं वाहा. "

" या ज्ञानदानंच मला प्रथम आईकडे नेलं होतं. ज्ञानदाकडून मी दोन वेळा बोलणी खाल्ली होती ! एकदा आईच्या ताटातूनच जेवलो होतो त्या वेळी ते बोलले होते. त्यात माझी काही चूक नव्हती. मी तर तेव्हा अगदी लहान, शाळकरी होतो. गाव जवळच होतं. शनिवार-रविवार आईजवळ येऊन राहात असे. सोमवारी शाळा सुटल्यावर घरी परत जायचा मी. सुरुवातीला आमच्या घरी माझ्या आईवडिलांना हे आवडत नसे. परंतु ते काहीच बोलायचे नाहीत. अभ्यासात मी सर्वांपेक्षा चांगला होतो. तेव्हा त्या दृष्टीनंही काही बोलण्यासारखं नव्हतं. तर काय झालं, तो शनिवार होता. मी येणार हे आईना माहीत होतं. दगडाच्या थाळीतच प्रसाद वाढून त्यांनी तो झाकून ठेवला होता. मला पाहून त्या म्हणाल्या, " आधी खाऊन घे. जेवून खूप उशीर झाला असेल. "

"मी लगेच तसाच जेवायला बसलो. त्याच वेळी ज्ञानदा आत आले. ते म्हणाले, काय अक्कल तुझी ! आईचं ताट उष्टं केलंस ना ? "

"परंतु आईंनी ताट बदललं नाही. त्या म्हणाल्या, 'त्यात काय झालं, लहान मुलांनी त्यातून खाल्लं तर ते का उष्टं होतं ? ज्ञान तू त्याला रागावू नकोस, मी तीच थाळी वापरीन. "

"आणि दुसऱ्यांदा शरदमहाराजांची थाळी मी उष्टी केली होती. त्या वेळी ज्ञानदा बोलले होते. या जयरामवटीतच शरदमहाराज आले होते. ते नेहमीच येऊन राहायचे. तेव्हा आणखी एक निराळंच तेजस्वी रूप मी पाहिलं होतं. शरदमहाराज राहायचे शेजारच्या घरात. दररोज सकाळी आईंना प्रणाम करायला यायचे. माझ्याकडून बातमी काढायचे. मला सांगायचे – 'जा बरं, आई, आता काय करताहेत ते बघून ये ' मी पाहून येऊन त्यांना सांगायचा, – 'आई, भाजी चिरीत आहेत, घरचा केर काढताहेत, कणीक भिजवताहेत, भांडी विसळताहेत, मसाला वाटताहेत –' असंच सर्व. ते मला पुन्हा सावधगिरीच्या सूचना द्यायचे, 'हे बघ आईशी काही बोलू नकोस, चूप जाऊन पाहा आणि येऊन मला सांग, ' 'आई आता स्वस्थ बसल्या आहेत ' असं सांगायचा, तेव्हा 'बरोबर सांगतो आहेस ना, बरोबर सांगतो आहेस ना ?' असं म्हणत म्हणतच शरदमहाराज उठायचे. ते चांगले उंच, रुंद, अवाढव्य होते, ते जेव्हा हलत डुलत आईंना प्रणाम करायला जात तेव्हा बघत राहावंसं वाटायचं. शरदमहाराज आत जायचे आणि आपलं अवाढव्य शरीर जमिनीवर लोटून देऊन आईंना साष्टांग नमस्कार करून परत यायचे. "

शरदमहाराजांकडून स्वामी विवेकानंदांच्या किती तरी गोष्टी ऐकायला मिळायच्या. बसल्या बसल्या मला ते सर्व ऐकवीत असत.

"एकदा स्वामी विवेकानंद, शरदमहाराज आणि अभेदानंद कोणत्या तरी एका पर्वतावर निघाले होते. स्वामीजींची तब्येत मध्येच बिघडली. एकदा वांग्याचा रस्सा खाण्याची त्यांना इच्छा झाली. शरदमहाराज आणि स्वामी अभेदानंद फिरत फिरत गेले. त्यांनी एका सुखवस्तू गृहस्थाच्या घराच्या बागेत पुष्कळ वांगी लागलेली पाहिली. त्यांनी त्यातली दोन वांगी मागितली. परंतु ते गृहस्थ एकही वांगं द्यायला तयार झाले नाहीत. काय करणार त्याच्यापुढं ? ते दोघे परत आले. त्यांची हकीकत ऐकून स्वामीजी म्हणाले, 'तुम्ही माझे असले कसले गुरुबंधू ! माझ्यासाठी दोन वांगी चोरून आणता आली नाहीत तुम्हांला ? ' स्वामी अभेदानंदांना बरोबर घेऊन शरदमहाराज पुन्हा त्या गृहस्थाकडे गेले. या वेळी असं ठरलं होतं की एकानं आत

जाऊन त्या गृहस्थांशी बोलायचं आणि तेवढ्यात दुसऱ्यानं बागेतली दोन वांगी पटापट तोडून घेऊन जायचं.

" अशा सर्व किती मजेमजेच्या गोष्टी. "

" आणखी एकदा असेच हे तिघेजण पर्वतावर फिरायला निघाले होते. सारा दिवस फिरता फिरता एका श्रीमंताच्या दाराशी जाऊन उभे राहिले. परंतु भीक देणं तर बाजूलाच राहिलं, त्या गृहस्थाने नाही नाही ते बोलून त्यांना हाकलून दिलं. स्वामी अभेदानंद म्हणाले, ' अशानं व्हायचं नाही. तुम्ही हसू नका. दूर उभं राहून मजा बघा, यांची रीत तुम्हांला माहीत नाही—

**" गढवाल—सा दाता नहीं**
**लाठीबिगर देता नहीं. "**

लाठी दाखवून भीक मिळवीनच. असे म्हणून त्यांनी डोक्याला फेटा घट्ट बांधला, हातात एक लांब दंडुका घेतला आणि ते पुन्हा त्या गढवाल्याच्या घरी गेले. हातातला दंडुका अंगणात आपटून, धमकी देऊन ते उभे राहतात तोच मालक धावत आला आणि त्यांच्या पाया पडला. अभेदानंदांनी धमकी देत जमिनीवर दंडुका आपटला व ते म्हणाले, " आटा लाव ", " घी लाव ", " मिठाई लाव ", आणि तो गृहस्थ धावत धावत घरातून एक एक वस्तू आणून त्यांच्या पायांशी जमा करू लागला. ते सर्व सामान घेऊन ते स्वामीजींकडे परत आले त्या वेळी ते तिघे इतके हसले म्हणून सांगू.

" या शरदमहाराजांच्या ताटात बसूनच मी जेवलो होतो. त्यांच्या जेवणानंतर त्याच ताटात आईंनी मला वाढलं. आईंनी जेवायला वाढलं तेव्हा त्यांत विचार कसला करायचा ? मी बसलो जेवायला परंतु माझ्या कपाळी पुन्हा शिव्या खायचं होतं ना ! — त्या वेळीसुद्धा ज्ञानदांच्या तावडीतच सापडलो. "

राममयमहाराजांच्या या ज्ञानदाकडूनही आईच्या किती गोष्टी ऐकायला मिळाल्या. सर्व लिहिण्यासारख्या. खरोखर आई साक्षात देवी होत्या. परंतु आईचं हे एक निराळंच ' रूप ' ज्ञानमहाराज म्हणाले, " सबंध अंग खरजेनं भरलं होतं माझं, चार महिने अंथरुणातच होतो. तेव्हा आई स्वतः हातांनी मला भरवीत. सर्व फोड धुवून औषध लावीत. मला तेव्हा मासे खायला आवडायचे नाहीत. परंतु मागूर माश्याचे काटे काढून पानात वाढलेल्या भातातच ते लपवून प्रत्येक घास माझ्या तोंडात देत असत. रक्त शुद्ध व्हावं म्हणून. "

मी ऐकायची आणि मला वाटायचं – आईचं रूप हे असं होतं म्हणूनच तर त्या आई होत्या. आणि त्यासाठीच तर आज केस पिकलेले असूनदेखील आईच्या गोष्टी सांगताना त्यांची मुले लहान मुले बनतात. कुणी कुणाला कसे समजावून सांगायचे ?

तंबूत बसूनच सारा दिवस गप्पागोष्टींत निघून गेला. वेळ कसा गेला हे कळलेसुद्धा नाही. परंतु हातपाय हलवल्याशिवाय चालणार नव्हते. थंडीमुळे अगदी बधिर झाले होते.

मग शहरातून फिरायला सुरुवात केली. निरनिराळ्या आगगाड्यांनी गटागटांनी यात्रेकरू येत होते. सबंध रस्ताभर एकसारखी त्यांचीच गर्दी होती.

टांग्यातून उतरून एक म्हातारी यात्रेकरू चिडचिडतच म्हणाली, ' बाबा रे, कुठं आणून टाकलंस, पाहा; आणि आता परत कुठं घेऊन जाणार आहेस ? '

टांगेवाला टांग्यातून उतरू देत नव्हता. तो मागोमाग धावत आला आणि म्हणाला, " आधी भाडं द्या अन मग खाली उतरा. "

म्हातारीनं पदराची गाठ जास्त घट्ट आवळली आणि म्हणाली, " काय दुर्दैव रे बाबा ! लुटारूंच्या तडाख्यातच सापडले की, अरे देवा, देवा – "

दादा पुढं झाले, " आजीबाई काय झालं ? काय झालं आजीबाई ? "

म्हातारी म्हणाली, " पाहा ना, स्टेशनवर गर्दीमध्ये माझ्या पथकाची आणि माझी चुकामूक झाली. मी कोन्नगरहून आले आहे. पहिल्यानं एकदा आले होते इथं. पण ते फार वर्षांपूर्वी. जागा ओळखीचीच ना. मी याला सांगितलं, मला तिथं घेऊन जा, तर हा मेला मला कुठं कुठं हिंडवतोय पाहा. "

टांगेवाला म्हणाला, " काय करू साहेब, सव्वादोन तास झाले, ह्या म्हातारीनं मला भटकवून भटकवून जेरीस आणलंय. जीव नकोसा करून टाकलाय. कुठं जायचं ते सांगतच नाही. फक्त म्हणते ' चल ', ' चल '. "

दादांनी विचारलं, " कुठं जायचंय आजीबाई. "

" जागेचा ठावठिकाणा माहीत नाही बाबा परंतु मागे आले होते तो रस्ता लक्षात आहे. हा असाच मोठा रुंद रस्ता आणि त्याच्या जवळच डाव्या हाताला एक अरुंद बोळ, त्या बोळातूनच जावं लागतं. "

दादा काळजीत पडले, इथं कितीतरी मोठे रस्ते कितीतरी अरुंद बोळ आहेत.

परंतु म्हातारीला त्यातला नेमका कुठचा हवा आहे ?

म्हातारीला आता धीर निघेना. दादांचे दोन्ही हात घट्ट धरून ती म्हणाली, "मला लवकर माझ्या मंडळीत पोचवून द्या ना. ती मंडळीसुद्धा किती काळजी करीत असतील."

दादांनी विचारले, "कुणाबरोबर आलात ? एखादा पुरुष कुणी बरोबर आहे ? त्याचं नाव काय ? "

"एक गृहस्थ आहेत. पण त्याचं नाव मला माहीत नाही. परंतु, त्यामुळं काही अडणार नाही. मला माहीत नसलं तरी आमच्या लोकांना माहीत आहेच की. ती मंडळीच तुम्हांला नाव सांगतील. अगोदर तुम्ही मला तिथं घेऊन चला."

हताश होऊन दादा पाहू लागले.

आक्का म्हणाल्या, "एक काम करा. घाटावर जाऊन तिला एका चांगल्या पंड्याच्या हवाली करा, पंड्या तिच्या पथकाचा बरोबर पत्ता काढील."

आक्का आणि मी 'हरकी पौडी'च्या पुलाजवळच वाट पाहात थांबलो. लोक येत होते, पिठाच्या गोळ्या पाण्यात टाकीत होते. आम्ही एकचित्तानं माशांची गंमत पाहात होतो.

पायऱ्यांच्या एका बाजूला वैष्णवी आणि भैरवी यांच्यामध्ये बाचाबाची सुरू झाली. स्थूल शरीराची वैष्णवी ओठ चावून, हसून निखाऱ्यावर फुंकर घालीत होती आणि भैरवी धगधगत होती.

त्यांच्या शिव्याशापांच्या माऱ्यावरून माझ्या लक्षात आलं की थोड्या वेळापूर्वीच इथं दोन भैरवींचं भांडण जुंपलं होतं. त्यांपैकी एकीनं भांडणातून काढता पाय घेताच एक वैष्णवी तिथे उपस्थित झाली आणि ती दुसरीला भडकवू लागली. भांडण तरी किती रसाळ ते ऐकायचं सहजासहजी कोण सोडणार ?

भैरवी ठेंगणी, ठुसकी, काळी अशी होती. लहान वय, हाती त्रिशूळ, कमंडलू, गळ्यात रुद्राक्षमाळा. अकस्मात येऊन ती मला ओढून घेऊन जाऊ लागली. ती म्हणाली, 'ती, तो पाहा जात आहे. ती पाहा आताच घाटाच्या पायऱ्या चढून गेली. त्या पोरीलाच माझा फार मत्सर वाटतो. मला जास्त भिक्षा कशी मिळते ? बाई ग, काही झालं तरी मी आहे अस्सल भैरवी. आठ वर्षं झाली मी इथं आहे. ती कुठं होती तेव्हा ? मी पाहिलं नव्हतं का ? ती एखाद्या कंगालीसारखी रस्त्यात

पडून राहायची. आताच ही दोन वर्षं झाली ती भैरवी झाली आहे. एवढी ऐट कशाची ? मला भिक्षा जास्त मिळते तर त्यात तिचं काय जातं ? मी गोसाव्याच्या घरची मुलगी,,गोसाव्याच्या घरची सून, नवद्वीपाचा पाचू गोपाळ गोसावी—नित्यानंद मंदिराचा पुजारी, त्याची मुलगी मी. कुणाला माहीत नाही असं नाही. तुम्ही तारकेश्वराचं नाव ऐकलं आहे ना ? तोंडानं वाईट बोलू नये '— असं म्हणून आवाज एकदम कमी करून तिनं दृष्टी स्थिर केली आणि हृदयाकडे अंगुलीनिर्देश करून म्हणाली, " तेच तारकेश्वर माझ्यामध्ये अवतरले आहेत. "

एकंदर भाव असा की हे कोणाला कळता कामा नये. मला समजलं ही माझी पुण्याई. हाताने तिनं जणू काही धाड्दिशी उघडा दरवाजा बंद करून टाकला. ती म्हणाली, " राहू द्या त्या गोष्टी. आता लोकांना माझ्यामध्ये काही विशेष पाहायला मिळालं, किंवा मला लोकांनी जास्त काही दिलं तर त्याबद्दल हिला हेवा का वाटावा ? सांगा. मी म्हणते, मी काय तुमच्यासारखी भिकारी आहे, रात्रंदिवस भीक मागत फिरायला ? काही झालं तरी मी अस्सल भैरवी आहे. भगवी वस्त्रं परिधान करते, नियमाप्रमाणं काटछाट करून संयमानं वागते, कपाळाला भस्म, शेंदूर लावते, मंत्र म्हणत हातात खापरी घेऊन मी बाहेर पडते. दहा कोस बघत नाही, बारा कोस बघत नाही, एकसारखी चालत राहते आणि भिक्षा मागून परत येते. पुन्हा मंत्र म्हणून सर्व साज उतरवून ठेवते. दिवस पुरा होतो. "

मी तिला विचारले, " गोसाव्याच्या घरची सून म्हणालात, तर तुमचे पती—"

" हो, माझे पतीसुद्धा माझ्या बरोबर साधू होऊन आले आहेत. आताच जे तुम्हांला तारकेश्वरांसंबंधी सांगितलं ना त्यांनी माझ्यामध्ये अवतार घेतला ; अशा वेळी घरात राहणं कसं शक्य होतं ? आणि आपल्याला एकटं निघून येणंही बरं दिसत नाही. बाईमाणसाची जात. तुम्हांला माहीत आहेच. एकटं आलं तर लोक बडबडणार—घर सोडून गेली म्हणून, त्याला उपाय काय म्हणून मी पतींना विचारलं. मला तर घरात राहून चालणार नव्हतं. ऐकून सर्व समजून तेही माझ्या बरोबर निघून आले. इथंच राहतात. मी वेगळी राहते. मधून मधून भेट होते. "

" मुलं बाळं ? "

" तीसुद्धा होती. दोन मुलगे होते. त्यांना या गंगेत जलसमाधी दिली. उत्तम आहे, अगदी निश्चित आहे मी. "

दादांनी येऊन घाई केली. एका पंड्यामार्फत दुसऱ्याला विचारीत विचारीत,

म्हतारीला शेवटपर्यंत तिच्या दलात पोचवता आले होते. म्हातारीच्या पथकातील पंड्या येऊन तिला घेऊन गेला.

रात्र झाली होती. आण्या दोन आण्यांच्या नाण्यांनी भरलेली आक्कांची पिशवी माझ्याजवळ होती. सबंध दिवसभराच्या दानधर्मासाठी हे पैसे वेगळे काढून ठेवले होते. मुक्त मनाने, खुशीने एक मूठभर नाणी मी घेतली आणि भैरवीच्या भिक्षा-पात्रात टाकली. हात पुढे करून ती नाणी घेता घेता भैरवी चौफेर पाहात होती. तिला वाटत होते– ती पहिली भैरवी, आंधळी पोरटी गेली कुठं ? मागंपुढं जवळ-पास असलीच तर बघ म्हणावं, मला जास्त भिक्षा का मिळते ते ?

सबंध रात्रभर पायांना काही ऊब येत नव्हती. पाय पोटाशी घेऊन घेऊन घेणार तरी किती ! आत पायात आधी मोजे घालायचे आणि मगच झोपायचे असे मी ठरवले.

आक्कांनी ट्रंक उघडली आणि दादांचे मोजे काढून मला दिले. मागल्या हिवा-ळ्यात त्यांनी स्वत: ते विणून दादांना दिले होते. ती मोज्यांची जोडी मी हातात घेतली आणि थक्कच झाले. पुन्हा पुन्हा उलटपालट करून मी ती नीट पाहात होते. पायात घालायची कशी ? टाच, तळपाय, रुंद, अरुंद असा काही आकार म्हणून नव्हताच.

आक्का रागावल्या, " पायात घालून पाहा ना. हे मिलिटरी पद्धतीचे नवीन नमु-न्याचे मोजे आहेत. "

बिचारे दादा !

आजच सकाळी बोलताना माताजींचा उल्लेख करून अनुभवानंद म्हणाले होते, " माताजी म्हणजे अतिशय सहिष्णू. पण मला वाटते तुमच्या दादांसारखा सहनशील या जगात दुसरा कुणी असूच शकणार नाही. " ही असली मोजांची जोडी दादांना हसतमुखाने पायात घालावी लागली एवढेच नव्हे तर ती घालून आपण फार खूश झालो आहोत असे त्यांना भासवावेही लागले होते.

आता छावण्यांमधून रोजच समाराधने (भंडारा) चालू होती. साधुमंडळीमध्ये हे

एक मोठे सामाजिक कार्य मानले जाते. प्रत्येक संप्रदायाकडून एक एक भंडारा असतो. ज्यांना शक्य असते म्हणजे ज्यांची ऐपत असते ते समष्टिभोजन देतात. यासाठी सर्व पंथांतील सर्व साधूंना आमंत्रण दिलेले असते. ज्यांना हे परवडत नाही ते वैयक्तिक भोजन ठेवतात. आमंत्रणानुसार प्रत्येक संप्रदायातील दोघेचौघे येतात.

कोण कसा भंडारा देणार याची अगोदरपासून शिपायाजवळ यादी द्यावी लागते. तो विचार करून दिवस देतो. कधी समष्टी व्हायची असते तर कधी व्यष्टी. एका दिवशी निरनिराळ्या ठिकाणी दोनतीन व्यष्टी होऊ शकतात. परंतु एकाच दिवशी दोन ठिकाणी समष्टी झाली तर दोन्हींकडच्या लोकांचे नुकसान होते. निमंत्रितांना जिथे दोन दिवस जेवण मिळायचे तिथे एकच दिवस मिळते; आणि जे भंडारा देतात, त्यांचेही नुकसान होते. दोन ठिकाणी जेवणाऱ्यांची विभागणी होते म्हणून त्यांचे जेवण उरते. जेवायला किती मंडळी येणार याचा नक्की अंदाज सांगता येत नाही.

स्वामी अनुभवानंद म्हणाले, "आम्हीसुद्धा समाराधन द्यायला हवं. दर कुम्भ-मेळ्याला गुरुजींच्या जन्मदिवशीच आम्ही जेवण देतो. व्यष्टीच देतो, समष्टी द्यायला पैसे कुठं आहेत ? हे व्यष्टीचे पैसेच किती कष्टानं जमतात. परंतु या वर्षी इथं इतकी जेवणं चालली आहेत त्यात एक दिवससुद्धा मोकळा जात नाही. सर्व दिवस आगाऊच भरले आहेत. शिपायाला दिवस देणंही कठीण होत आहे. मी आजसुद्धा गेलो होतो. खूप प्रयत्नांती विसाव्या दिवशी मोकळा दिवस मिळाला. त्या दिवशीच आम्ही जेवण द्यावं असा विचार करतोय. या खेपेस एकएक पंथ पाचपाच, सहा-सहा वेळा जेवण घालतोय. त्यांना कसली काळजी ? सहाच काय सबंध महिनाभर-देखील त्यांना भंडारा देता येईल. ते मोठे श्रीमंत लोक आहेत. मोठे जहागिरदार आहेत. हा निर्वाणी पंथ सर्वांपेक्षा श्रीमंत आहे. त्यांचे मंडलेश्वर कृष्णानंद या खेपेला बद्रीकेदारला गेले होते, बरोबर दोनशे शिष्य घेतले होते. सबंध यात्रेत पंचवीस हजार रुपये त्यांनी खर्च केले. कृष्णानंद सहा जेवणं देणार आहेत या वेळी असं ऐकतो. देतील तर काय झालं ? जेवणाचा खर्च काही त्यांना करावा लागत नाही. कोटयधीश, लाखोपती गुजराथी, मारवाडी त्यांचे भक्त आहेत. सबंध वर्षाच्या धंद्यानंतर जेवण घालून, साधूंना तृप्त करून ते आपल्या पापांचं क्षालन करून जातात. शास्त्रातच सांगितलं आहे, साधूंना भोजन दिल्यानं पुण्य लागतं."

कित्येक पंथ मिळून एक पंचायत होते. महन्त त्यांचा मुख्य असतो. महन्ताच्या वर मंडलेश्वर. सर्व श्रेष्ठ, मोठा पंडित असेल तोच मंडलेश्वर म्हणून निवडून येतो.

पंचायत म्हणजे कार्यसमिती. सर्व अधिकार यांच्या हातात असतात. मंडलेश्वर म्हणजे पंचायतीच्या हातातले नुसते बाहुले. महन्त शिष्य तयार करतात, त्यांना मंत्र शिकवतात. मंडलेश्वरांचे काम संन्यास देण्याचे. सद्याच्या सर्व मंडलेश्वरांमध्ये विद्वान म्हणजे जीवानंद होत आणि सर्वांत श्रीमंत आहेत कृष्णानंद.

त्या दिवशी या कृष्णानंदांच्या आखाड्यांतच भंडारा पहायला गेलो होतो. 'भंडारा चालू आहे', 'भंडारा चालू आहे' असे नुसते ऐकले होते. भंडारा म्हणजे काय प्रकरण आहे ते एकदा डोळ्यांनी पहायला हवे होते. भंडारे दूर दूर व्हायचे, दुपारी वेळेवर जाणे जमायचे नाही.

निर्वाणी पंथाचा तळ जवळच होता. आजचा भंडारा तिथेच होता असे ऐकताच जेवण झाल्याबरोबर आम्ही धावतच तिकडे गेलो. जाऊन पाहतो तो काय लोखंडी गज असलले मोठे फाटक आतून अगदी कडीकुलूप लावून बंद झाले होते. निमंत्रित सर्व आलेले होते, आगंतुकांना आता आडवणे जरूरीचे होत.

आमच्यासारखेच इतरही पुष्कळ लोक फाटकासमोर जमले होते. साधूंचे दर्शन म्हणजे महापुण्य; त्यातून एकदम इतक्या साधूंचे दर्शन– या भंडाऱ्यासारखी दुसरी संधी कोणती मिळणार ? म्हणून जिथे भंडारा असेल तिथे उन्हा-पावसाची तमा न बाळगता रस्त्याच्या दुतर्फा, साधूंची वाट पाहात, पुण्यार्थी लोक गर्दी करून तासन् तास उभे असतात.

परंतु अशी किती वेळ वाट पाहणार ? तीन लट्ठ मारवाडिणी जमिनीवर पदर पसरून त्यांवरच झोपल्या. फाटकाच्या पलीकडे हातात चांदीची काठी घेऊन, स्टुलावर तोंड फिरवून शिपाई बसला होता. लोक बाहेरून काकुळतीने त्याची मिनतवारी करीत होते. 'ए साधूजी, बाबाजी, एक बार जरासा खोलिये.' काही केल्या त्याच्या पाषाणहृदयाला पाझर फुटेना आणि तो काही केल्या दार उघडीना. आता काय करणार एक पाऊल पुढे, तीन पावले मागे असे मागेपुढे चालले होते. नंतर विषण्ण मनाने हळूहळू माघारी निघालो.

रस्त्याच्या वळणाजवळ एक गृहस्थ उभे होते, 'जाते क्यों, इथं उभे राहा, साधू लोक यहि रास्तेसे लौटेंगे.'

उभे राहून राहून पाय भरून आले होते आणि आता थांबायचे किती ! मी स्वतःशीच पुटपुटत होते.

रस्त्याच्या कडेला उंच भिंत होती. कुणाच्या तरी घराभोवतालची ती भिंत होती. त्या भिंतीकडे बोट दाखवून ते गृहस्थ म्हणाले, "उसपर चढकर बैठो."

आता मात्र मी बिघडले होते. याच्या त्याच्या तोंडाकडे पाहात राहिले. हा गृहस्थ थट्टा तर करीत नाही ना ? नाहीतर भिंतीवर चढून माकडासारखे पाय मोकळे सोडून ओळीने बसून राहायचे हे का माणसाला शोभून दिसते आणि तेसुद्धा बाईमाणसाला !

त्या गृहस्थांना काय वाटले कुणास ठाऊक, 'आइये, आइये' म्हणून प्रेमाने त्यांनी बोलावले आणि त्या भिंत असलेल्या घरात ते आम्हांला घेऊन गेले. आत जाऊन पाहिले, बाहेरून जी भिंत उंच वाटत होती, तिच्या अगदी वरपर्यंत माती टाकून अंगण तयार केलेले होते. चालत चालत सहज भिंतीवर चढून जाता येणे शक्य होते.

या सद्‌गृहस्थाचेच हे घर. साधूंना यायला अजून अवकाश होता. तेवढ्यात त्या गृहस्थाने आम्हांला त्याच्या बागेत हिंडायला नेऊन बाग दाखवायला सुरुवात केली. मोठ्या मेहनतीने लावलेल्या नाना प्रकारच्या फळझाडांनी बगीचा भरला होता. आंबे, पेरू, जांभळे, आवळे एक ना दोन किती तरी प्रकार. एका झाडावर पाहिले, निष्पर्ण फांदी अगणित शुभ्र फुलांनी भरली होती. किती सुंदर दिसत होते.

"कशाचं हे झाड ?"

ते गृहस्थ म्हणाले, "हे नाशपातीचं झाड आहे."

नाशपातीचं झाड मी पाहिलं होतं, पण पाना-फळांनी भरलेलं. याचं हे मोहक सौंदर्य पूर्वी कधीच मी पाहिलं नव्हतं. बागेतील हिरव्यागार झाडांच्या मध्ये एक एक नाशपातीचे झाड– जणू एक एक सुंदर चित्रच.

आवाज ऐकू आला, 'साधू येताहेत, साधू आलेच.' याला त्याला धक्का मारून मी धावत गेले आणि भिंतीवर चढून पाय मोकळे सोडून बसले.

मोटर-रिक्षा, हॉर्न, टांग्याचे शिंग, माणसांचा आनंदोल्लास, सर्वांचा मिळून एक मोठा आवाज झाला होता. सर्व मंडलेश्वर मोटरीत बसले होते. गळ्यात फुलांच्या हारांचे ओझे. बघताच त्यांना ओळखता येत होते. म्हातारे किंवा ज्यांना चालता येत नव्हते अशा साधूंनी तिघाचौघांचा मिळून एक एक टांगा किंवा रिक्षा केली होती. बाकी सर्व पायीच चालले होते, या बाजूला, त्या बाजूला, ज्यांना जिकडे जाणे जरुरी होते तिकडे ते चालले होते.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे यांच्यामध्ये कोण काय आहेत ते कळायला काही मार्ग नव्हता. मी असे ऐकले होते की, लोकांच्या दृष्टिपंथापासून दूर अशा निर्जन जागी तपस्येत दिवसरात्र घालवणारे अत्यंत श्रेष्ठ महात्मा साधूसुद्धा समष्टी भंडाऱ्याला

येतात. परंतु नुसते डोळ्यांनी पाहून सर्वसाधारण माणसांमध्ये त्यांना कसे ओळखायचे ? बहुतेक सर्वजण सारखेच वाटत होते. एखाद्याकडे शोधक दृष्टीने पाहावे न पाहावे तो, तो पुढे निघून जायचा; मग दुसऱ्या एखाद्याकडे पहायचे. गर्दी पार नाहीशी झाली. परंतु मनावर कोणाचीच छाप पडली नाही. काय ही थट्टा !

इथे लहानमोठे असे साठ-सत्तर आखाडे होते. भंडाऱ्यातले जेवणसुद्धा ठराविक. जाड जाड पुऱ्या– बंगाली साधू त्यांना 'घुटे रुटी' (गोयठा रोटी) म्हणतात. त्या दिवशी स्वामी अनुभवानंद म्हणत होते, "बेटयांना काय खायचं माहीत आहे ?" एकदा रामकृष्ण मिशनचे सेक्रेटरी म्हणाले होते, 'काय कडक कडक पुऱ्या आणि कचोऱ्या रोज खायच्या ? दातांनी चावतादेखील येत नाहीत. यांना या खेपेला आमच्यासारखे जेवण करून घातले पाहिजे, पुरीऐवजी फुलके करा. पाहू देत खाऊन.'

परंतु फुलके कुणाला खायला द्यायचे ? चांगले मोहन घालून केलेले फुलके हातांनी कुसकरून टाकून हे लोक म्हणतात, "हे खायचं कसं ? काय म्हणायचं याला !" त्या जाड जाड रोटल्याशिवाय त्यांना दुसरे काही गोड लागतच नाही.

त्याच त्या जाड जाड कडक पुऱ्या, कचोऱ्या, भाजी – इथले लोक शाक म्हणतात – चटणी आणि कडक बुंदीचे लाडू, भंडाऱ्याच्या जेवणात वरण म्हणजे अशक्यच. कारण डाळ शिजवायला पाणी उकळावं लागतं. जी भाजी पाण्यात शिजवायला लागते ती कच्चीच राहते आणि मग पुष्कळांची खाताना पंचाईत होते. पालेभाज्या, बटाटा, कोबी, यांना वेगळ्या पाण्याची गरज नसते म्हणून भंडाऱ्यामध्ये त्याच भाज्या चालतात.

माझ्या मनात आले प्रत्येक भंडाऱ्यात हे असे एकच प्रकारचे जेवण हे साधू खुशीने खातात तरी कसे ? भंडाऱ्यांतील जेवणासाठी किती दूरदूरून पायी येतात हे. देहासाठी दोन वेळचे जेवण तर काय सर्वांनाच लागतेच.

शशीमहाराज म्हणाले, " भंडारा पाहण्याची एवढी हौस आहे ना – आज हरि-हर मठांत भंडारा आहे. जाऊन पाहून या."

हरिहरमठ तर सेवाश्रमाच्या रस्त्याच्या पलीकडे ! जायचे तर खरे, पण वेळेचीच पंचाईत. सेवाश्रममध्ये ज्या वेळी जेवणाची घंटा होते नेमक्या त्याच वेळी हरिहर-मठांत भंडारा सुरू होतो. जेवण सोडून भंडारा पहायला गेलो तर इथे या लोकांची अडचण होईल. गिरिन महाराज, माणिक ब्रह्मचारी जेवणासाठी ताटकळत बसतील – हे काही बरे नाही. आणि जेवणासाठी थांबले तर भंडारा बघण्याचे जमत नाही. जेवण आटोपून मग जावे तर तेवढ्यात त्यांचे दार बंद होऊन जाणार.

आक्का म्हणाल्या, " फार मोठी चूक झाली आपली. आज दुपारी आपण जेवणार नाही असं कालच सांगून ठेवलं असतं तर काहीच प्रश्न नसता राहिला. एक दिवस न जेवता राहिलो तर काय होईल मोठंसं. "

नानाप्रकारे विचार करता करताच, घाटावर स्नान करून हातात धुतलेल्या कपड्यांचे पिळे घेऊन मी परत येत होते. हरिहरमठाच्या बाजूने येताना हातात करवंटीचे कमंडलू घेऊन संन्यासी घाईघाईने आत जाताना दिसले. दाराजवळ त्या दिवसाचा तोच शिपाई बसला होता. हातात यादी घेऊन हा सर्व भंडाऱ्याला असाच हजर असतो वाटतं. कुठल्या मठातले साधू आले, कोण आले नाही, सर्व हिशोब ठेवणे, चौकशी करणे हेच या वेळी त्याचे काम असते.

साधू आत जात होते, आता का आम्हांला शिरकाव मिळणार ? आक्कांचा हात धरून एक एक पाऊल पुढं जात जात साधूंच्या गर्दीत शिरूनच मठात एकदाचे घुसलो. आता जायचं कुणीकडे ? चहूकडेच व्यवस्था केलेली होती. सबंध मैदानात, व्हरांड्यात मातीचे ग्लास ओळीने मांडले होते. साधू येऊन पंगतीत बसताच एकदमच पाने टाकून वाढायला सुरवात होईल. नाहीतर वाऱ्यामुळे पत्रावळी उडून हा गोंधळ होईल. या सर्व गडबडीत पुढे झालो तर किती बोलणी खावी लागतील ? इकडे तिकडे पाहात मान उंचावून आम्ही पाहिलं, समोरच्या व्हरांड्यातून पुढं जाऊन सर्वच आत जात होते. काय होते तिथे ? हळूहळू पुढे सरकत मी समोर आले. चांगला मोठा दिवाणखाना होता. जमिनीवर गालिचा अंथरला होता, भिंतीला लागून पांढऱ्या फरशीवर नक्षीकाम केलेली आसने ओळीने मांडली होती. निरनिराळ्या मंडलेश्वरांना बरोबर घेऊन हरिहर मठाचे मंडलेश्वर बसले होते, जो तो आपापल्या जागेवर अगदी पुतळ्यासारखा निश्चल बसला होता. प्रत्येकाच्या गुळगुळित गोट्यावर एक एक झेंडूचे फूल होते. थोडा वेळ अगोदर कुणा भक्ताने येऊन यांची पूजा केली असावी. जणू काही शंकराच्या पिंडीवरच निश्चित मनाने फुले वाहिली होती.

माझ्या लक्षात आले, ही पंगत फक्त मंडलेश्वरांसाठीच होती. आणखीही जे येणार होते ते सर्व या जागी बसणार होते. इतर मंडळी सतरंजीवर बसत होती. जागा पुरेनाशी झाली तेव्हा साहजिकच ज्याला जिथे जागा मिळेल तिथे तो बसत होता. त्यासाठी मुळीसुद्धा कुरकूर नव्हती. फक्त मंडलेश्वरांच्या बाबतीतच एक केसभरसुद्धा इकडेतिकडे होता कामा नव्हते. मंडलेश्वरांना या सर्व भंडाऱ्यांमध्ये 'मान' द्यावा लागतो. भक्तांपैकी जो भंडारा देतो तो जेवणापूर्वी पूजेची तयारी करून घेऊन बायको-मुलांसह या प्रत्येकांची पूजा करून नमस्काराच्या वेळी गात्रबंध,

धर्मग्रंथ व पैसे देतो. चांगलेवाईट, कमिजास्त काही ना काही द्यायलाच लागते. जास्त करून रेशमी शालच गात्रबंध म्हणून दिली जाते. जे इतका पैसा खर्च करून समष्टी देतात त्यांना पैशाला काय कमी ?

मध्यम वयाचा एक माणूस, या मठाचाच मुख्य कर्ता, दिसायला देखणा, ताकत-वान होता.– याला नक्कीच मागे कधीतरी पाहिले होते,– हो ते सोने लावलेले दात, तो हसल्याबरोबर ओळखले मी त्याला, तो जवळ येऊन म्हणाला, " बाहेर उभ्या का ? आत येऊन बसा; नंतर गर्दी वाढली म्हणजे शिरायला वाव मिळायचा नाही. पाहतासुद्धा काही यायचं नाही. "

साधू आम्हांला आवडला. त्याचे बोलणे ऐकून मला जरा धीर आला, मी म्हणाले, " आता तर थांबणं शक्य नाही. थोडया वेळानं पुन्हा आलो तर ? " मला दारावरच्या चौकीदाराची आठवण झाली, त्यानं आत येऊ दिलं नाही तर ? साधूला मनातली भीती बोलून दाखवली. आम्हांला बरोबर घेऊन साधू फाटकापाशी आले. आमच्याकडे बोट दाखवून त्यांनी शिपायाला घाईघाईनं काहीतरी सांगितले. त्यांच्या म्हणण्याला संमती देता देता शिपायाने आम्हांला नीट पाहून ठेवले.

सेवाश्रमला परत येऊन चार घास बकाबका गिळून परत मठात आलो. अजून पंगत बसली नव्हती. पाने वाढणे चालू होते. रांगेने साधू पानांवर बसले होते. गीतेचा पंधरावा अध्याय सर्व मिळून सुरेल आवाजात म्हणत होते. जेवणापूर्वी अध्याय म्हणायचा त्यांचा हा नियमच होता.

उघडी जागा, कावळे आणि घारींचे थवे डोक्यावर उडत होते. इकडून तिकडून एकदम झेपावत होते. काही मुचेनासे झाले होते. वाढणाऱ्यांपैकी काही जणांनी हाता-तल्या पुऱ्या मिठाईच्या टोपल्या खाली ठेवून उन्हात लहान लहान टिनचे पत्रे धरले. या पत्र्यांवर सूर्याची किरणे पडली की ती उलट परावर्तित व्हायची. त्यामुळे भिऊन घारी व कावळे दूर जात होते.

मी म्हटले, ' आक्का पाहिलंत किती छान युक्ती आहे ? परत गेल्यावर आपणही असंच करू. धार्मिक विधीच्या किंवा सहलीच्या वेळी उपयोगी पडेल. '

गीतापठण थांबल्याबरोबर सर्वांच्या पानात सर्व काही वाढले आहे की नाही ते एकानं साऱ्या पंगतीत फिरून पाहिले. त्यांचे पाहून झाल्यावर त्याने खूण केली त्याबरोबर शिंग फुंकले गेले, घंटानाद झाला आणि लगेच साधूंचेही जेवण सुरू झाले. वाढलेली पाने समोर ठेवून, उन्हात तळपत साधू किती तरी वेळ तिष्ठत बसले होते. इतक्या लोकांना वाढायचे म्हणजे ते काही थोडयाथोडक्या वेळाचे काम नव्हते.

इतक्या कौतुकाने हे साधू खातात तरी काय ! एकदा खाऊन पाहावे अशी इच्छा होत होती. त्या दिवशी शशीमहाराजांना मी सांगितले होते. माझे बोलणे ऐकून ते नाराज झाले होते. म्हणाले होते, "धिक्कार जेवण– आपण गृहस्थाश्रमी लोक, ते खायला कशाला जायचं ? नाही, नाही. शी:" तरीसुद्धा मला कुतूहल वाटत होतेच. देवळाच्या उंच गच्चीवर बसून साधूंचे जेवण पाहाता पाहाता मी मनात युक्ती शोधत होते; "त्यात काय हरकत आहे ?"

जेवण संपले. जेवण होताच घाईघाईने सर्व उठले असे नाही. एकदम सैनिकी शिस्त. जेवण झाल्यावरदेखील जो तो आपल्या जागेवरच बसून राहिला. पुन्हा सुरुवातीप्रमाणेच, सर्व नीट जेवले की नाही ते एकाने फिरून पाहिले. पाहून झाल्यावर त्याने खूण केली. पुन्हा शिंग वाजले, घटा झाली; आणि नंतर सर्व साधू पानावरून उठले. घोळक्या घोळक्यांनी साधू फाटकाबाहेर गेले. कोरडे जेवण होते. जेवण झाल्यावर रिकाम्या पानावर बसलेले असतानाच मातीच्या पाण्याच्या ग्लासातच बोटे बुडवून त्यांनी तोंडावरून फिरवली होती. भगव्या रंगाचे वस्त्र परिधान केलेल्या जटाधारींनी भरलेली ती जागा क्षणार्धात पूर्ण रिकामी झाली. तिथे ओळीने पडून राहिल्या फक्त उष्ट्या पत्रावळी आणि इकडे तिकडे गडगडणारे पाण्याचे मातीचे ग्लास.

आम्हांला कसली घाई होती ? बसूनच राहावे झाले. मी म्हटले, "बघू या ना आणखी काय काय होते, काय होत नाही ते." भंडाऱ्याला नागा संन्यासी दिसले नाहीत. आक्का म्हणाल्या, "मी असं ऐकलंय की नागा संन्यासींना अशा सामूहिक कार्याच्या ठिकाणी 'नागा' अवस्थेत जाता येत नाही. निदान एक कौपीन तरी लावावीच लागते. त्यामुळे खरे नागा कोण आणि कोण नाहीत हे ओळखणे मुश्किल असते."

दोन म्हातारे साधू तोंडाचे बोळके घेऊन हसत हसत मंदिराच्या गच्चीवर आले. एकमेकांच्या समोर बसून त्यांच्या खूप गप्पा सुरू झाल्या. पुष्कळ दिवसांनी दोघांची भेट झाली होती. गप्पांमधून आनंद अगदी ओसंडून चालला होता. एक होता बंगाली, एक होता पंजाबी, एकाचा रंग गोरा, एकाचा काळा. एक गेला होता उत्तरेला तिबेटला, एक गेला होता दक्षिणेला समुद्रकिनारी, दोन दिवस पुढेमागे असे ते हरिद्वारला आले होते. आज या समष्टी भंडाऱ्याला त्यांची पुन्हा भेट झाली होती. तिबेटहून जो परत आला होता त्याच्या अंगावर अजूनही जाड घोंगडीचा गुडघ्यापर्यंत लांब असा कोट होता, कमरेला तागाची वळलेली दोरी बांधलेली

होती आणि दक्षिणेतून जो परत आला होता त्याच्या उघड्या अंगावर एक भगवी चादर व कमरेला एक सुती कपडा.

बहुतेक साधू एका धोतराचे कापून दोन भाग करून वापरतात. एक नेसतात व एक पांघरतात.

ते दोन साधू आपापल्या प्रवासाचा वृत्तांत सांगत, तसेच बोळके भरून हसत उठून निघून गेले. कित्ती गप्पा ! इतक्या थोडक्या वेळात थोड्याच संपणार होत्या ? चालता चालता वाटेत बोलतीलच.

एक लहान पोरसवदा साधू बाजूला लोळत पडला होता. त्याने इतकी मिठाई खाल्ली होती की आता उठण्याची सोय नव्हती. तो स्वतःच आपल्या मित्राला तसे सांगत होता. हिंदी बोलीत बंगाली धाटणी ऐकून आक्कांनी विचारले, " घर कुठाय तुमचं ? " तो म्हणाला, " हमारा बाडी हो तो ' अमूक ' ग्राम में ".

आक्का म्हणाल्या, " कप्पाळ माझं, हे तर त्रिपुराचे बाबा. मागं त्रिपुराला जाताना हे गाव डावीकडं टाकून आपण पुढे गेलो नव्हतो का ? सुशीचं सासर याच गावात तर आहे. "

त्या पोरसवदा साधूकडे वळून आक्का म्हणाल्या, " तर मग हिंदी का बोलतोस ? बंगालीतच बोल. "

या लोकांच्या तोंडी आपल्या देशाची भाषा ऐकून तो फार खूष झाला. गालातल्या गालात हसत तो चटकन उठून बसला. आणि म्हणाला, " मी ब्राह्मणाचा मुलगा. लहानपणीच घर सोडून आलो. आई रडली, बाप रडला, पण मी काही गावी परत गेलो नाही. "

" फार चांगलं केलंस ! काही लिहिणं वाचणं केलं होतंस का ? "

" हो चौथ्या इयत्तेपर्यंत शिकलो होतो. आता गुरूच्या कृपेनं कितीतरी विद्या शिकतो आहे. कुछ कुछ इंग्रजी अक्षरंसुद्धा ओळखतो. आपल्याशी बोलायला मिळालं फार आनंद झाला. किती दिवस रहाणार ? परसाद मिळाला ना ? "

मी मान हलवून म्हटले, " नाही, देणार तरी कोण ? "

हे ऐकून त्याने स्वयंपाक घराकडे धूम ठोकली. आक्का म्हणाल्या, " बघता बघता ही काय ब्याद उपस्थित केलीस ? प्रसाद घेऊन शेवटी नसत्या कटकटीच होणार ना ? इथं बसून काही खाता यायचं नाही, सेवाग्रामला घेऊन जाऊन तिथं खाणंही चालायचं नाही. त्यांनी कुणी पाहिलं तर काय म्हणतील ? शी: "

मी सांगितलं, " झाकूनपाकून तंबूत ठेवून देऊ. संध्याकाळी जेव्हा हरिद्वारला

जाऊ तेव्हा गंगेच्या घाटावर बसून खाऊ. कोण येणार आहे पाहायला ? "

आम्ही बोलत होतो एवढयात प्रसाद भरलेला पानाचा द्रोण दोन्ही हातात घट्ट पकडून, तो इकडे धावत येत असल्याचे दिसले. त्याच्या बरोबरच त्याच्या डोक्या-वरून दोन घारी उडत होत्या. हातातले खाद्य त्याने घाईघाईने छातीशी धरले. म्हणून ते सांडले नाही. परंतु घारी काही केल्या नाद सोडीनात. शेवटी त्रासून त्याने आपले दोन्ही हात अंगावरच्या घोंगडीच्या आत घेतले.

ते पाहून मी नाक मुरडले आणि उठले. रामा रामा त्या प्रसादात किती धूळ, किती वाळू पडली असेल. एकच ती घोंगडी वाटेल तिथं ठेवतो, तीच पसरतो आणि तीवरच झोपतो ! अशा प्रसादाची गरज नाही. मी म्हणाले, " चला, तो येण्यापूर्वी इथून पळ काढू या. "

प्रसादाबद्दल असे अश्रद्धेने बोललेले आक्कांना रुचले नाही. त्या म्हणाल्या, " प्रसाद तो प्रसादच ! असं बोलू नाही. "

एक ढीगभर पुऱ्या, कचोऱ्या, लाडू, भाजी समोर धरून गावच्या माणसाने गावच्या माणसांचे हसतमुखाने स्वागत केले. तो म्हणाला, " आणखी थोडी भाजी आणावीशी वाटत होती, परंतु द्रोणात जागा नव्हती. "

मोठ्या आनंदाने तो आम्हांला रस्त्यापर्यंत पोचवायला आला. म्हणाला, " आपल्याला पुन्हा भेटण्याची इच्छा आहेच. पाहू या परमेश्वराची कृपा असली तर या गर्दीमध्येही तुम्हांला हुडकून काढीन. आणखी काही दिवस राहणार ना इथं ? "

ब्रह्मकुंडाच्या किनाऱ्यालगतच्या दुकानांतून तेल, डालडा, हॅम, बेकन, लोणी, जेली यांचे रिकामे डबेच्या डबे दुकानदारांनी अडकवून ठेवले होते. दुकानदार मध्ये बसून सतत ठूंग, ठांग करून डबे वाजवीत असतात. यात्रेकरू यातले डबे स्वस्तात विकत घेतात आणि त्यांच्या इच्छेप्रमाणे कमी-जास्त गंगाजल भरून स्वतःच्या गावी नेतात. डचमळून पाणी सांडण्याची मुळीच भीती नसते. दुकानदाराबरोबर अट ठरलेलीच असते. गंगाजल घेऊन काठावर आल्याबरोबर तो झिलई करून डब्याचे तोंड बंद करून देतो. गावी परत गेल्यावर झाकण कापून डबा उघडावा लागतो.

अक्का म्हणाल्या " आपल्याला पुष्कळ पाणी न्यावे लागेल. प्रत्येकाच्या गंगाजळीत आतापासून पाणी भरण्यापेक्षा अशा दोन डब्यांमध्येच पाणी नेणे सोयीचे होईल. नंतर यातूनच काढून काढून सर्वांना देता येईल. "

निवडून निवडून आक्कांनी पाच शेरांचे दोन डालडाचे डबे विकत घेतले, डब्याला भोकबीक तर नाही ? नीट पाहिल्याशिवाय पैसे देणे बरोबर होईल का ? डब्यांत पाणी भरून पाहण्यासाठी हातांत डबे देऊन ब्रजरमणना घाटावर पाठवण्यात आले. एक मिनिट, दोन मिनिटे, करता करता पंधरावीस मिनिटे झाली; ब्रजरमण परतलेच नाहीत. समोर घाट आणि पाणी आहे. इतका वेळ का लागला ? वाट पाहून पाहून कंटाळा आला. अर्धा तास निघून गेला. आक्कांना दुकानात थांबायला सांगून दादा व मी पुढे गेलो.

घाटावर ही गर्दी होती. काठावर उभे राहून आबालवृद्ध स्त्रीपुरुष फटीफटींतून वाकून एकाग्र चित्ताने काहीतरी पाहात होते. गर्दीमधून मान उंचावून वाकून मीही पाहिले. पक्कया घाटापासून खालपर्यंत पायऱ्या होत्या. पायऱ्याजवळच्या एका रुंद पायरीवर एक नागा संन्यासी उभा राहून, हातात चकचकित भाला घेऊन खेळ करून दाखवीत होता. पहिल्याने लक्षात आले नाही, पण नंतर समजले की यात आश्चर्याचा भाग जितका होता. तितकाच तो बीभत्स व अश्लीलही होता. तरीसुद्धा उघडया घाटावर, लोकांसमोर निःसंकोचपणे एकजण खेळ दाखवीत होता आणि बायकामुलींच्या समवेत दर्शक तो पाहात होते.

दादांनी बोलावले; "चला, या; हठयोगाचा तो सर्व प्रकार आहे."

कुतूहलाला शेवट नाहीच; आक्कांनी हे पाहायला हवे. ओढीन ओढीत मी त्यांना घेऊन आले. तेवढयात कसरत संपली होती.

आता त्या नागा संन्याशाने गंगेच्या पाण्यात हात तोंड धुतले. गळयामध्ये दोन्ही बाजूला रुद्राक्षाच्या माळा जानव्यासारख्या घातल्या. कमरेला सुताचा एक पेड बांधला. डाव्या हातात कंकण होतेच. सोन्याचे होते की काय ते ? सर्व साज झाल्यावर हातात भाला घेऊन तो नागा पुन्हा उभा राहिला आणि मोठ्या आढचतेने एक एक पायरी चढू लागला. लोकांनी बाजूला होऊन त्याला वाट करून दिली.

आता गंगेची आरती होणार होती. समोरून चांगले पाहायला मिळावे म्हणून आम्ही 'हरकी पौडी'वर जाऊन बसलो.

संध्याकाळचा अंधार पडताच ब्रह्मकुंडाच्या घाटावर आरतीचे दिवे लागले. तीन पंड्ये, तीन हातांत तीन दिवे घेऊन खाली उतरले व शेवटच्या पायरीवर उभे राहिले. हळूहळू डाव्या हातांनी घंटा वाजवू लागले व उजव्या हातांनी आरती करू लागले. तुपाचे दिवे, वारा लागून ज्योत उंच होत होती. तोच प्रकाश पंड्यांच्या

डोक्यांवर, अंगांवर काळी सावली टाकीत होता. मी इथून पाहात होते; त्या अंधारात केवळ त्या ज्योतींची तीन टोके आनंदाने जणू नाचत होती.

आक्का कशासाठी आणि कुठे अंतर्धान पावल्या होत्या त्या धापा टाकीत परत आल्या. त्यांच्या दोन्ही मुठी बंद होत्या. त्या म्हणाल्या, " आरतीची ज्योत स्पर्श करून आले. तुमच्यासाठीसुद्धा आणली आहे. ही घ्या. " असे म्हणून एक मूठ उघडून माझ्या डोक्यावरून त्यांनी हात फिरवला आणि दुसऱ्या मुठीतली आरतीची ज्योत त्यांनी दादांच्या कपाळी लावली.

उद्या शिवरात्र. या पर्वणीतले पहिले स्नान.

आक्का म्हणाल्या, " शिवाला फळं आणि फुलं वाहायला लागतील. फळं आजच विकत आणून ठेवायला हवीत. फुलं काय वाटेत दोन्ही बाजूला विकत मिळतील. पण गर्दीमध्ये फळं नाही मिळाली तर ?"

गंगेवर बांधलेल्या पुलावरून बाजाराकडे चालत राहिलो. हरिद्वारचा प्राण म्हणून म्हणतात तो हा पूलच. या ठिकाणी सर्व प्रकारचे व्यापार चालले होते. चालता चालता मी पाहिले श्रीरामचंद्राच्या फोटोसमोर एका हाताने हार्मोनिअम वाजवीत व दुसऱ्या हाताने घुंघट संभाळीत, मारवाडी बायका गात होत्या. त्यांच्या समोर घुंघट घेतलेल्या भक्तिणी बायका बसल्या होत्या, त्यांच्या बाजूलाच पापपुण्य या विषयावर गुजराथी गृहस्थाचे भाषण चालले होते.

परातभर पिठाच्या गोळ्या घेऊन एक पांढऱ्या भुवयांची सुरकुत्या पडलेली म्हातारी, लहान मुलांमध्ये फिरत होती. यात्रेकरूंच्या हातात मूठभर गोळ्या कोंबून ती म्हणायची, " लीजिये बाबू, दो पैसाका गुल्ली मछलीको खिलाके पुण्य करिये. "

ऋषिकुलांतील आणि गुरुकुलांतील बालब्रह्मचारी अंगावर नामावली घेऊन, कानटोपी घालून, ओळीने घाटावर बसले होते. हाताने ताल देत ते सामवेद गात होते. संध्याकाळ होताच ते इथे येतात व हातांत लाल रंगाची गोमुखी घेऊन दर्भासनावर बसून राहतात. उठण्याची सोयच नसते. लहान वयच ते, नुसती मान फिरवून चहूकडे ते बघायचे. नाना देशींचे नाना लोक त्यांच्या मनात कुतूहल निर्माण करीत होते. ब्रह्मचाऱ्यांच्या लहान लहान हाताची लहान लहान बोटे जप करता करता गोमुखीमध्येच थांबत आणि ते विस्मयाने डोळे विस्फारून पाहात राहात.

कुबड्यांवर भार देऊन लंगडा भिकारी ओरडत होता, " सवापाच आना बिला दे, सोहाग भाग बना ले, " एका गाजूला जवळच लिलाव चालला होता. तिथे काळ्या लांब केसवाल्यांची ही गर्दी लोटली होती. अंगात काळा कोट, हातात पत्र्याचा डबा, असा तो स्टूलावर उभे राहून ओरडत होता, " चार आना, पांच आना, जलदी जलदी. आभी खतम् हो जायेगा. छय आना.."

लोखंडी तवा लोखंडी शेगडीवर ठेवून दुकानदार गरमगरम बटाट्याची 'टिकिया' बनवीत होता. पंजाबी स्त्रिया अंगावरची चुन्नी जमिनीवर लोळत ठेवून दहिवडे, छोले, कुलचे विकत घेऊन खात होत्या.

दक्षिणेतून आलेले साधू दोन्ही डोळे बंद करून गंगेत बसले होते. रक्तचंदनाचा टिळा कपाळी लावलेले ब्राह्मण कथा सांगत होते.

लाउडस्पीकरवर गाणे चालले होते – ' रंगिला, रंगिला रे ! ' छातीवर, पाठीवर लाकडी फलक लावून रांगेने सिनेमाच्या जाहिराती चालल्या होत्या; " घरकी इजत", " चांदनी रात ", " दिल की प्यारी. "

हमाल व मजुरांना घेऊन एजीनिअर आणि कंत्राटदार धावाधाव करीत होते. मोठमोठी झाडे आणून ढीग रचला होता. मोठमोठे खिळे ठोकून एकाला एक जोडीत होते ते. वेळ थोडा होता. कुम्भमेळ्याच्या अगोदर पूल पूर्ण करून देणे अगत्याचे होते.

लाल वस्त्रे परिधान केलेला साधू मागे लागला होता – " भजन के लिये एकही गीता साधूको दान कीजिये. दो पयसा दाम. यही दुकानमे मिलेगा. "

गरम पाण्याचे कुकर घेऊन एकामागे एक न्हावी बसले होते. आठ इंच उंचीच्या लहान पितळी कुकरवर गरम पाणी आणि खाली काही लाकडी कोळशाचे निखारे धुमसत होते. त्यामुळे पाणी पुष्कळ वेळपर्यंत गरम राहते. गरम पाण्याचा गालाला होणारा स्पर्श या थंडीत फार सुखकारक वाटत असणार.

दुकानात खादीच्या कपड्यांबरोबर मिलच्या साड्या व छिटाच्या कापडांचे भाव यांची ठरवाठरवी चालली होती.

वजन करण्याचे यंत्र समोर घेऊन एक बापलेक भोंग्यातून ओरडत होते, " चार पैसा देके वजन और बीमारी–ओमारी सब देख लेओ एक साथ "

यंत्रावर वजनाप्रमाणे आजारांची नावे लिहिलेली होती. कोणत्या. वयात किती वजन नसले तर त्याला कोणता आजार होतो ते तो घडाघड सांगून टाकीत होता. पांथरीपासून सुरू करून मुदतीचा ताप, अस्थमा, क्षयापर्यंत सर्व रोग तो सांगायचा.

एक रूक्ष केसांची, जीर्ण वृद्धा दोन्ही पाय लांब पसरून खाली बसली होती. हातावर रोटया थापून ती त्या शेगडीवर शेकत होती. भिकारी येत होते, दोन पैसे टाकून भाकरी विकत घेऊन दोन फोडी बटाटयाची भाजी आणि चिंचेच्या चटणी-बरोबर जवळच बसून खात होते.

चहापण मिळायचा. एक चांगला जवानमर्द मुलगा मोठया कळशीतून लहान लहान ग्लासमध्ये चहा ओतीत होता. खांद्यावर चहाची कळशी घेऊन देवळाच्या गच्चीवर या टोकापासून त्या टोकापर्यंत फिरायचा आणि गरजेनुसार कळशी खाली उतरवून विकायचा, इथे, तिथे. चार पैशांना 'गुळाचा' आणि सहा पैशांना 'साख-रेचा' चहा.

बनारसी ओढणी झुलवीत झुलवीत, लिपस्टिक, रूज पावडर लावून चपलांचा आवाज करीत बेसूर गाणे गाणाऱ्या मुलींचे एक पथक चालले होते.

लांब काठीच्या टोकाला रंगीबेरंगी, लांब, मोठे फुगे, पिपाण्या, लावून त्या डोक्या-वर हलवीत एक मुलगा चालला होता.

एक आंधळा भिकारी सर्व शक्ती एकवटून झांजा बडवीत यात्रेकरूंचे लक्ष वेधून घेत होता.

साडेबत्तीस प्रकारच्या तळलेल्या पदार्थांच्या दुकानात चार पैशांत ब्राह्मणभोज-नाचे पुण्य मिळत होते.

छम छम असा चिमटयांचा व घुंगरांचा आवाज करीत, अंगाला काळया दोऱ्या बांधून अलख निरंजन करणाऱ्यांचे पथक रांगेने चालले होते. ते काही बोलत नव्हते. कुठे थांबतही नव्हते. चालता चालताच भिक्षा घेत होते. भिक्षा घेऊन लोक आधीच तयार राहात होते. असे वाजवीतच ते सबंध गावभर फिरतात. भिक्षा देणाऱ्यांना दूर अंतरावरूनच समजते. दुकानदारांकडून भिक्षा घ्यायला वेळ लागत होता. एकाच बाजूला भिक्षापात्र पुढे करून अलख निरंजनी लोक लेफ्ट राइट करीत चालत राहातात. पाय हालत राहिले पाहिजेत. मधला भिक्षू दुर्लक्ष होऊन मध्येच थांबला तर मागच्या माणसाकडून त्याला चिमटयाचा टोचा खावा लागे. "पाय चालत राहू देत." असा तो इशारा करायचा. सारे लोक इकडे चारी बाजूंना, कुणी पाहिले तर.

एक एक करून ग्रंथ साहेबांच्या तिथे गर्दी जमली.

फुलाच्या परडीत तुपाचा दिवा लावून फुलवाल्या परडया सजवून ठेवीत होत्या.

फळे विकत घ्यायला फळांच्या दुकानांत येऊन आम्ही उभे राहिलो.

आक्कांचे काही समाधान झाले नाही. बेल, नारळ, बोरे, नाशपाती, सफरचंद,

इतके घेऊनसुद्धा, 'ओ क्या हाय', तिने विचारलेच. " टेंपारी ?" " हो." "दे बरे.', केळी, सफरचंद–" उपर में ओ खरबुजा हाय ? खाली काढ बघू, पपया–– क्या बोलता इसको ? हो, तो पण लागेल." एवढे झाल्यावर त्या मला म्हणाल्या, "काय राणी घेऊ ना ? वाहू शंकराला. पुन्हा कधी येणं होतं न होतं. इथला शंकर पुन्हा आयुष्यात कधी दिसणार नाही कदाचित."

दुकानात खालपासून वरपर्यंत फळे मांडून ठेवलेली होती. त्यांतली निवडून निवडून विकत घेऊन आक्का पिशवी भरीत होत्या. शेजारीच भाजीचे दुकान होते.

पांढरी ओढणी अंगावर घेतलेली, पांढऱ्या लाँगक्लॉथची सलवार, खमीज घातलेली एक सडपातळ, तरुणी दुकानदाराबरोबर भाव ठरवीत होती. तिच्या हातात कमळाचे देठ होते. मी ऐकले होते काही काही ठिकाणी ही देठे म्हणजे फार प्रिय खाद्य असते.

मी विचारले, " ही खायला कशी लागतात ?"

त्यांची चव आठवीत मिटक्या मारीत ती म्हणाली, " बहुत आच्छा लगता, पहा ना एवढयाशा या भाजीला किती किंमत, पाच आण्यांला पावभर."

मी विचारले, " कशी करता याची भाजी ?"

त्या कमळाच्या देठावर तुकडयांचे आकार बोटाने दाखवीत ती म्हणाली, " हे पाहा, हा एवढा. एक, दोन, तीन याप्रमाणे पाच तुकडे करायचे. पुष्कळ जणी लहान तुकडेमुद्धा करतात. परंतु मोठाले तुकडेच खायला चांगले लागतात. नंतर कांदा परतून जिरे, मीठ, मिरची, हळद घालून भाजी शिजवायची. बटाटे घातले तरी चालतात. पण पाहा ना किती महाग ! घेऊ की नको विचार करतेय. ए भैया, दीजिए ना एक पोया सव्वाचार आने में ?" " साडेचार आना ? " " आच्छा तो पौनापाच आना ले लिजिये– और जादा नहीं."

एवढे बोलून कुर्त्याच्या खिशातून पाच रुपयांची नोट काढून एक पाव कमळाची देठे तिने विकत घेतली. बाकी मोड मोजून घेऊन ती निघून गेली.

**" न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ।।"**

पहाट झाली नाही तोच, तोंडाने गीता म्हणत त्यांच्या थंडगार हातांनी हलवून आक्कांनी मला जागे केले.

आज पर्वणीचे प्रथमच स्नान. लवकर निघालं तर बरं. चांगलं उजाडलं नाही तोच ब्रह्मकुंडावर पोचता येईल. पहाटे पाचपासून योग सुरू होणार, तो दिवसभर असणार तरी घाटावर जाऊन निर्विघ्नपणं स्नान करता येणं हे महाकठीण काम.

आज सबंध दिवस साधूंचं स्नान चालू राहणार. पोलीस त्यांच्यासाठीच घाट खास राखून ठेवणार; स्वामी अनुभवानंदांनी सांगितले होते, " सकाळीच जरा सोयीचं असतं. नंतर घाटावर कदाचित जाताही येणार नाही. त्यापेक्षा पहिल्यानंच स्नान उरकून घेऊन तयार राहा. साधूसंन्यासी मिरवणुकीनं जातील. एका जागी उभं राहून पाहा. हीसुद्धा एक विशेष बघण्यासारखी गोष्ट असते. अकरा वाजण्याच्या सुमारास ' निरंजनी आखाडा ' जाईल. तो परत आल्यावर मग ' निर्वाणी आखाडा ' जाणार. तोपर्यंत जवळजवळ एक दीड होईल. आमचं पथक निर्वाणी आखाड्या-बरोबरच जाणार. निर्वाणी पंथाच्या स्नानानंतर जुन्या आखाड्यातील लोकांची पाळी. तोपर्यंत संध्याकाळ होऊन जाते. म्हणून म्हणतो यात मध्ये वेळ आहे कुठं ? आणि गर्दीसुद्धा अशी होईल की त्या गर्दीत तुम्हांला स्नान करता येणार नाही. शेवटी बाहेर कुठून पडायचं—ही एक भानगडच तेव्हा उपस्थित होईल. "

आक्कांची इच्छा होती की साधूंच्या स्नानानंतर पवित्र गंगेत पुन्हा एकदा बुडी घ्यावी. हे ऐकून शशीमहाराज दादांना म्हणाले होते, " बायकांचं बोलणं ऐकू नका. असं भलतंच काही करू नका. गंगेचं पाणी नेहमीच पवित्र असतं. संधी मिळताच स्नान उरकून घ्या. इथल्या गर्दीची तुम्हाला कल्पनाही करता यायची नाही. म्हणून या सर्व गोष्टी सांगतो. एकदा मिरवणुकीबरोबर स्नान करायला गेलो होतो. तिथ गेल्यावर गर्दीत असा सापडलो होतो की घाटावर जेमतेम स्नान उरकून परत यायला मला साडेतीन तास लागले. "

आक्कांनी मला घाई केली, " लवकर लवकर तयार हो, इथं या स्नानासाठी म्हणून तर आपण आलो. देवाचं नाव घेऊन एक बुडी मारून बाहेर पडता आलं तरी धन्य. अंगावर बेताचेच कपडे ठेव. जितके कमी घालता येतील तितकेच घालून स्नानाला चल म्हणजे ओले कपडे चटकन बदलता येतील. "

मी उठून पाहिलं तर आक्कांनी एवढ्या वेळात विहिरीच्या पाण्यानंच स्नान उरकलंसुद्धा होतं. अंधारात दिवा लावून त्या बाहेर केव्हा गेल्या ते मला कळलंसुद्धा नाही. त्या म्हणाल्या, " अशा दिवशी गंगेत उतरायचं, आधीच मन शुद्ध करून घेत-लेलं बरं. " असे म्हणून कमंडलूतलं गंगाजल त्यांनी आमच्या म्हणजे ज्यांचं स्नान झालं नव्हतं त्यांच्या अंगावर शिंपडलं. आम्हांलासुद्धा त्यांनी शुद्ध करून घेतलं.

घाटाकडे जात असताना वाटत होते,आम्हीच हुशार, सर्वांच्या अगोदर निघालो. चांगले मोकळेपणाने हातपाय हलवून काही कटकटींशिवाय स्नान करू. परंतु घाटावर येऊन पाहतो तर आमच्यापेक्षाही जे चलाख होते त्यांनी आधीच गर्दी करून टाकली होती.

या गेल्या काही दिवसांतली घाटवाली पुढे आली आणि तिने गर्दी ढकलून आम्हांला पुढे नेले. थंडीचा हा कडाका, हाडे नुसती ठणकत होती. वाकून गर्दीमधून वाट काढीत काढीत जाऊन गंगेत बुडी मारली. मोजून मोजून बुड्या घेत होते. आईसाठी घडाभर गंगेचे पाणी घेऊन मी वर आले.

गळ्यापर्यंतच्या पाण्यात उभे राहून आक्कांचे मंत्र म्हणणे चालले होते आणि डोळे मिटून कुणाकुणाच्या नावाने फळे, फुले व पैसे त्या गंगेला अर्पण करीत होत्या. सेवावाल्यांना मोठा आनंद झाला होता. आक्कांनी सोडलेले अर्घ्य पाण्यात पडण्यापूर्वीच दात काढून हसत हसत त्या हात लांब करून ते झेलून ओटीत भरीत होत्या.

असे वाटले आक्कांना हलवून सांगावे की, डोळे मिटून इतका त्रास घेऊन कुणाला काय देता आहात ते पाहा तरी. नंतर विचार आला, त्याच सुज्ञ असाव्यात, कदाचित पाहून सवरून त्यांनी मुद्दामच डोळे मिटले असतील. यासंबंधी त्या नेहमीच म्हणत, "कुणाच्या तरी नावानं अर्पण केलं त्यातच समाधान. त्यानंतर ते कुणी घेतलं, त्याचं काय झालं, याचा उगाच काथ्याकूट कशाला ?"

ब्रह्मकुंडाच्या मध्यभागी रुंद अशा स्तंभावर गंगादेवीचे मंदिर. पुष्कळजण पोहून पोहून त्या मंदिराला प्रदक्षिणा घालतात. असे म्हणतात की हा स्तंभ खरा म्हणजे मानसिंहाचे स्मारक, राजा अकबर मानसिंहाला म्हणाला होता, " तू माझ्यासाठी इतकं केलंस, मी तुझ्यासाठी काय करू ?"

मानसिंहाने उत्तर दिले, " माझ्या मृत्यूनंतर ब्रह्मकुंडातअ स्थिविसर्जन केल्यावर तिथं माझं स्मारक म्हणून स्तंभ उभा करा. "

ब्रह्मकुंडात अस्थि विसर्जित केल्या तर आत्म्याला मोक्ष प्राप्त होतो, असा लोकांचा समज होता.

श्यामपद म्हणजे योगी, त्यांनी संसारत्याग केला होता. ते उलटसुलट बोलायचे. त्यांच्या मनांत खरे काय आहे ते समजत नसे. ते म्हणाले, " ब्रह्मकुंडात पोहून स्नान करायचं ते कशासाठी ? मेलेल्यांची हाडं साचलेली, पाण्यात उभं राहिलं की पायाला टोचतात. "

घाटाच्या पायऱ्यांच्या अगदी वर, पायऱ्यांच्या मध्यावर, अगदी खालच्या पायऱ्यां-

वर, जिकडे तिकडे देवदेवतांचा नुसता सुळसुळाट. गंगामाई, शिवशंभू, रामचंद्र, वीर हनुमान, कलकत्त्याची काली, प्राचीन बदरिकेदार, सीतामाई किती त्या मूर्ती, खोपटासारख्या देवळांत एक एक मूर्ती ठेवलेली. दोन कमंडलू भरून दूध, गंगाजल प्रत्येक देवदेवतांच्या शिरावर घालीत आक्का फिरू लागल्या. मला म्हणाल्या, "घे. तूही घाल. शिवाय नमः, शिवाय नमः म्हणत घाल म्हणजे सर्वांनाच पोचेल."

साधूमंडळींना स्नानाला यायला अजून अवकाश होता. ओल्या कपड्यांचे बोचके हातांत घेऊन हिंडणे सोयीचे वाटत नव्हते. मी म्हटले, " कोणखलला परत जाऊन, गंगाजलाचा घडा, ओल्या कपड्यांचं बोचकं हे सर्व ठेवून परत आलो तर चालणार नाही का ? चांगलं सुखंग दिवसभर राहता येईल."

" कल्पना वाईट नाही ", दादा म्हणाले, " तेच ठीक राहील. दुपारच्या जेवणाची काही काळजी नाहीच. ' आज दुपारी जेवणार नाही ' असं कालच स्वामीजींना सांगून ठेवले होते. कारण परत केव्हा जाऊ याची काही खात्री नव्हती ? त्यांना उगीच वाट पाहात कशाला बसवायचं ? त्यांनासुद्धा स्नानाला यायचं होतंच की, आपलं ते चहाचं दुकान चांगलं स्वच्छ आहे. भूक लागलीच तर तिथं घेऊ खाऊन."

आक्कांना आज शिवरात्रीचा उपास. मी म्हटले, " मी कधी तो उपास केला नाही. आज त्यांच्याबरोबर मीही करीन उपास." मनात आले, " जे समोर दिसतंय, तिथं खाणं तर नाहीच शक्य. परंतु शंकराच्या नावानं उपास असला तर कदाचित काही ना काही देतीलही."

कोणखलहून परत हरिद्वारला येण्याचा मार्ग पूर्वीचा राहिला नव्हता. शहरातून कुठूनतरी गंगास्नानासाठी मिरवणूक येत होती. चहूकडे बातमी पसरली होती. पोलिसांच्या तोंडांत शिट्ट्या सारख्या खणखणत होत्या. सायकलवर बसून सार्जंटांची धावपळ चालली होती. रुंद रस्ता अगदी रिकामा पडला होता. लोकांना रस्त्यावर यायला मनाई होती. गल्ल्याबोळांतून धावत पळत निघालो घाटाकडे. ' ही सर्व मिरवणूक येण्यापूर्वी एकदा ' हरकी पौडी ' गाठली म्हणजे झालं. परंतु इच्छेप्रमाणे होईलच हे काय आगाऊ सांगता येतं ? लोकांच्या गर्दीच्या धक्क्यानं जितके पुढे ढकलले जात होतो तितकेच फक्त आम्ही पुढे होत होतो. असं करता करताच एकदाचे घाटावर येऊन तर पोचलो. पण ' हरकी पौडी 'पर्यंत जायचे कसे ? घाटा-भोवती कुंपण घातले होते, जागोजाग पोलीस स्वयंसेवक उभे होते. काठी उगारून लोकांचा प्रवाह ते मागे हटवीत होते. एक इंचभरसुद्धा पुढे जाण्याची सोय नव्हती. " हाय रे ! कशाला कोणखलला गेलो ? कपड्यांचं बोचकं हातात घेऊन हात

दुखायला लागले असते तर ओझं खांद्यावर घेऊनच फिरलो असतो. आता सगळंच मुसळ केरात. बरंय, चला तर, या बाजूनं वळून जाता येतं का ते तरी पाहू. हे काय त्या वाटेनं पुष्कळजणं जाताहेत की. ती बाजू खुली असेल कदाचित.

पायऱ्या चढून अरुंद बोळांतून उजवीकडचे श्रीरामचंद्राचे देऊळ सोडून आम्ही धावत गेलो; पण जाऊन बघतो तर ' रस्ता बंद '. कुठे जावे ते न कळल्यामुळे इकडे तिकडे धावून घाटावर जायला पाहावे तर पुन्हा – ' रस्ता बंद '. आता जास्त वेळ नव्हता. मिरवणूक जवळ येत होती. वेड्यासारखे सर्वच लोक धावाधावी करीत होते. स्नान पाहण्यासाठी प्रत्येकाला जागा हवी होती. इकडची गर्दी ' रस्ता बंद ' पाहून तिकडे धावत सुटायची आणि तिकडची गर्दी वाट न मिळाल्यामुळे इकडे धावत यायची. सर्वांनाच वाटत होते की दुसरीकडे रस्ता मिळेल. या जाण्यायेण्यातच प्राणांतिक धक्काधक्की होत होती.

शेवटी जिवावर उदार होऊन एका बऱ्या दिसणाऱ्या पोलिसाकडे जाऊन, " भाईजी, भाईजी, " म्हणून त्याच्या मागे लागले. मी त्याला म्हणाले, " थोडी वाट द्या आत जातो पटकन. "

भाईजी गंभीर झाला. त्याने मानेनेच नकार दिला. काही केल्या तयार होईना. अडचणीत सापडलो होतो काय करावे ? थोडे थांबून थांबून, 'ए भाईजी, ए भाईजी,' म्हणून त्याला हाक मारत होते. आणि करुण दृष्टीने घाटाकडे पाहत होते. साधूंचे स्नान पहावे अशी किती इच्छा होती, किती हौस वाटत होती, पण हे काय झाले ? असे गप्प थांबून राहिलो तर काहीसुद्धा पाहायला मिळणार नाही. मी पुन्हा सुरू केले. ' ए भाईजी ' या खेपेला भाईजीला काय वाटले कुणास ठाऊक, इकडं तिकडं मान फिरवून कुणी पाहात नाही याची खात्री करून बोटाने खुणावून तो आम्हांला म्हणाला, ' जलदी आईये ' आणि लगेच दुसरीकडे तोंड फिरवून तो उभा राहिला. जणू त्याचे अगदी लक्षच नव्हते.

एक टांग मारून काटेरी तारेचे कुंपण ओलांडून मी आत शिरले. आक्कांना ओढून आत घेतले, तसेच दादांना पण. 'अहो, अहो,' म्हणत पोलीस पाठलाग करीत आले. मी म्हणाले, ' ए मेरी बहन हाय, भाई हाय, ' व्रजरमणनासुद्धा वगळले नाही. एका क्षणात कुंपण पार करून आम्ही चौघेजण निघून आलो. इतक्या वेळानंतर आता सुटकेचा निःश्वास टाकला, आता घाई कसली ? सावकाश हरकी पौडीवर अगदी समोरच्या रांगेत जाऊन बसलो. आता साधूना घाटावर पोचायला लागेल तितका वेळ लागू दे.

चारी बाजूंना लोकांची ही गर्दी. घाटावर, घरांच्या गच्च्यांवर, डोंगरांवर, झाडांवर, जिकडे पाहावे तिकडे लोकांची डोकी आणि रंगित घुंघटांचा गजबजाट झालेला दिसत होता. केव्हापासून वाट पाहात सर्व थांबले होते. मी मनगटी घड्याळात पाहिले, आता आणखी किती उशीर. वेळ काढण्यासाठी मांडीवर स्केचबुक उघडून बसले. फार थकले होते, त्यात आणखी सकाळपासून काही खाल्ले नव्हते. अगदी बोलायलासुद्धा शक्ती नव्हती. शांतपणे वहीच्या पानावर रेघोट्या काढता काढता सहज मनात प्रश्न उभा राहिला – इतक्या सर्व लोकांची ही जी श्रद्धा, त्याची काहीच किंमत नाही का ? एका श्रद्धेमुळे हे जे लक्षावधी लोक इथे जमतात त्या श्रद्धेच्या मुळाशी काहीच तथ्य नाही का ? सगळा पोकळ डोलारा आहे का ? सामान्य लोक कोणत्या दृष्टीने विचार करतात ? गंगाजलाने पाप धुऊन निघते असे ऐकून ते हसतात. परंतु हे दृश्य पाहिल्यावर गंगाजलाचे माहात्म्य काय आहे असा प्रश्न मनात येत नाही.

" आपण काय आनंदमयी मांच्या तिथून आलात ? " खांद्याजवळ तोंड आणून पाठीमागून एका महिलेने विचारले.

वहीवरची नजर तशीच ठेवून मी मान हलवली – " नाही. "

" मग कुठच्या माताजींकडून ? "

मरू दे. इकडे बोलवतद्धा नाही, आणि ही मेली कटकट. शेजारीच आक्का बसल्या होत्या. अगदी ध्यानस्थ. नाव आणि भाव यांत काही मेळ नसतो असे नाही. चटकन काही तरी नाव सांगून टाकावे झाले, ' हिरण्मयी-मा. '

छे, पेन्सिलीचे टोकच तुटले. बरोबर ब्लेड, चाकू काहीच नव्हते. नखांनीच लाकूड कुरतडण्याचा प्रयत्न करू लागले. थोडेसे शिसे बाहेर काढता आले तरी चालेल. मी विचार करीत होते. साधू दिसले की मी त्यांचा अनादर करते, कुणा साधुभक्ताला पाहिले की त्याची थट्टा सुरू करते, तुलनेने स्वतःला बुद्धिमान समजते आणि कुणी खुळे असतील तर हे साधूच असे मला वाटते. पण इतके मोठमोठे पंडित आणि थोर श्रीमंतांची मुले या साधूंच्यामध्ये, राख फासून, जटा वाढवून, थंडीऊन कशाची पर्वा न करता, जेवणखाण, झोप सर्व विसरून अथांग आकाशाखाली बसून आहेत ते सर्व काय असेच निर्बुद्ध आहेत ? कशासाठी चालते त्यांची ही खडतर तपस्या ? कोणत्या दुर्मिळ इच्छापूर्तीसाठी त्यांनी स्वतःला आईपासून तोडून घेतले ?

" आपला आश्रम कुठंय ? "

काय कटकट ! एका शब्दात मी उत्तर देऊन टाकले – " आसामला. " मौनव्रत

किती सोयीचे असते. बोलता बोलता साधू लोक स्वखुशीनेच मौनव्रत घेतात. का ? संतदास बाबाजींचे शिष्य धनंजयदास यांनी मौनव्रत घेतले आहे. कधी व्रत सोडणार ते त्यांनाच माहीत नाही. गरजेप्रमाणे पाटीवर दोनचार गोष्टी शिष्यांना लिहून देतात. हे धनंजयदाससुद्धा महापंडित आहेत. परंतु शिरी जटाभार घेऊन बसून राहतात तेव्हा त्यांना न ओळखणारे लोक काय समजणार ? संतदास बाबाजीसुद्धा किती ज्ञानी, गुणी व श्रीमंत होते. आक्कांकडून ऐकले होते. त्यांचे पहिले नाव होते ताराकिशोर चौधुरी – विख्यात वकील.

" बरं, आसामला कुठंशी आहे आपला आश्रम ? कामाख्याला ? "

नाही आता शक्य नाही. आता काय उत्तर देऊ ? या महिलेने ज्या अर्थी कामाख्याचा उल्लेख केला त्या अर्थी तिला आसामविषयी काही थोडी माहिती असणार कदाचित. थापाथापी केली म्हणजे मोठी कटकट. सावरून घेणे कठीण होते. मी चटकन सांगून टाकले, " अरुणाचल आश्रम ". या नावाचा एक डोंगर शिलचरजवळ आहे. नशीब आठवण झाली !

आक्कांनी साशंक दृष्टीने एकदा माझ्याकडे पाहिले आणि पुन्हा डोळे मिटून त्या ध्यानस्थ बसल्या. हिरण्मयी माच्या रूपाने त्या आणखीनच तेजस्वी दिसू लागल्या.

दामदूम असा तासे, वाजंत्री व बँडचा आवाज कानी पडताच मी लक्ष देऊन नीट बसले.

बघता बघता धाडधाड करीत मिरवणूक घाटावर येऊन पोचली. एकामागे एक संन्यासी, राख फासलेली माणसं आणि भगवा रंग यांनी घाटाच्या पायऱ्या भरून गेल्या.

सर्वांत पुढे नागासंन्याशांचे दल पाण्याजवळ येऊन एकामागे एक असे रांगेत उभे राहिले. त्यांच्या मागे दुसऱ्या सन्याशांच्या पथकाने वर येण्याच्या पायरीपर्यंतची जागा गॅलरीप्रमाणे भरून टाकली. मंडलेश्वरांच्या डोक्यावर फुले लावलेले जरीचे रंगित छत्र धरले होते. दोन्ही बाजूंना चवऱ्या व मागे झिरमिळ्या लावलेले पंखे. दोन पुरुषांनी हातात दंडे धरले होते. त्यांच्या वरून किती मंडलेश्वर स्नानाला आले हे दुरून ओळखता येत होते. इतर सर्व साधूंच्या गळ्यात झेंडूचे हार होते.

नागा संन्याशांचे पथक सर्वांच्या पुढे उभे होते. त्यांनी पटापट गळ्यातले हार तोडून काढले आणि पाण्यात फेकून दिले. पाण्याच्या प्रवाहाच्या तालाप्रमाणे फुले हेलकावत वाहून चालली. कुंडाची शोभा किती अपूर्व दिसत होती.

सर्व साधू उभेच होते. पाण्यात का उतरत नव्हते ? जणू काही कशाची तरी वाट पाहत होते. मला वाटले होते इथे येताच ते पाण्यात झेपावतील. ढकलाढकली, गोंधळ

माजेल. पण तसे तर काहीच झाले नाही. सर्व जसे काही नियमबद्ध होते. फार सुरेख.

थोड्या वेळाने गर्दीतून वाट काढीत एकजण आले. त्यांच्या हातात छोटेसे चांदीचे सिंहासन होते. पाण्यात उतरून त्यांनी सिंहासन पाण्यात बुडवून वर काढताच लांब दांडीला बांधलेले दोन झेंडे पाण्यात फेकले गेले त्याबरोबर शिंगही वाजले. 'जय जय गंगामाईकी' असा जयघोष करून साधू लोकांनी पाण्यात उड्या घेतल्या.

भगवी वस्त्रे घातलेल्या संन्याशांनी कौपिने बदलली. शिष्यांच्या मदतीने मंडलेश्वरांनी सर्व साज केला आणि नागा सन्याशांनी थंडीने कुडकुडत ओल्या अंगावर मूठ मूठ राख फासली. ओल्या अंगावर कोरडी राख पिठाप्रमाणे चिकटून राहिली. मला दुरून दिसत होते. पाणी वाळल्यावर काळ्या शरीरावर पांढरी राख उठून दिसत होती. थोड्या वेळातच एकेकजण पांढरा महेश्वर बनला. काही काहींनी तर जटांमध्येसुद्धा सगळीकडे राख फासली. जटा लवकर वाळाव्या म्हणूनही असेल कदाचित. कुणी एखाद्याने दुसऱ्या एकाच्या पाठीला आणखी राखेचा लेप चढवला. किती छान खेळीमेळीचे त्यांचे वागणे होते. यांना पाहून फार बरे वाटते. खरोखरच जणू भोळ्या सदाशिवाचे अवतार. या जगात त्यांना जणू कशाचीच जरुरी नव्हती. लाजलज्जेच्या सीमा ओलांडून ते स्वतःला विसरले होते, दुसऱ्याला विसरले होते. हो, खरेच! घराच्या शेजारीच निर्वाणी पंथाचा मठ होता. संधी मिळाली की मी तिथे जायची आणि वटवृक्षाखाली राख पसरून त्यावर बसलेल्या नागांची रेखाचित्रे काढायची. ते डोळे वर करून माझ्याकडे पाहायचेसुद्धा नाहीत. चार हात अंतरावर असलेल्या माझी ते पूर्णतः उपेक्षाच करीत. कधी ते धुनीतले निखारे फुलवीत, तर कधी पितळी त्रिशूळ राखेने चकचकित करीत, तर कधी डमरू वाजवून तो नीट आहे की नाही ते पाहात.

झटपट सर्वांचे स्नान उरकले. जणू काही क्षणातच उरकले. तयार होऊन ते नियमानुसार मागे पुढे उभे राहिले. पुन्हा वाजंत्री वाजली, पुन्हा पताका फडकल्या, अंबारी हलवत हत्ती उठले, पुन्हा शहरातील रस्त्यावरून बिल्वेश्वराच्या मंदिराकडे मिरवणूक निघाली. सर्वजणच आज शंकराच्या शिरावर गंगाजल घालतील, काही घालतील बिल्वेश्वराच्या शिरी तर दुसरे काही घालतील दक्षेश्वराच्या शिरी. सर्वच म्हणतात की ही दोन इथली फार मोठी जागृत देवस्थाने आहेत.

घाट रिकामा होताच पोलिसांनी वाट मोकळी केली. एका मठानंतर दुसऱ्या मठाचे लोक येईपर्यंत मध्ये जो वेळ रिकामा मिळतो तो सामान्य लोकांच्या

स्नानासाठी देत. साधूंच्या स्नानानंतर त्याच पाण्यात स्नान करण्याची सर्वांनाच इच्छा असते.

गटागटांनी लोक येऊन पाण्यात उतरू लागले. दादा म्हणाले, " पाहून तर झालं, चला आता परत फिरू. नाहीतर पुन्हा रस्ता बंद करतील. मग सहजासहजी बाहेर पडता यायचं नाही. "

लांब पावले टाकीत आम्ही मोठ्या रस्त्यावर येऊन पोचलो. धावत धावत एक स्त्री पाठलाग करीत आली. धापा टाकीत टाकीत तिने आम्हांला गाठले; तिने विचारले, " आपण कुठल्या रस्त्यानं जाणार ? " चेहेरा ओळखीचा नव्हता पण आवाज ओळखीचा. मी हळूच कुजबुजत आक्काना म्हटले, " पहा बरं घाटावरची तीच बाई तर नाही ना ? " " हूं " म्हणून जरा गोंधळूनच आक्का मला चिकटून चालू लागल्या.

काय संकट ! गंगेच्या तीरावर बसून इतकं सर्व खोटं बोलले होते. आता त्याचा ताळमेळ कसा घालायचा ?

मी भराभर पावले टाकू लागले. तरी पुन्हा धावत पळत येऊन त्या स्त्रीने मला गाठलेच. सत्संगाचे हे किती उत्कट आकर्षण !

काय करणार ! तोंड वळवून या वेळी मी तिच्याकडे पाहिले. सुंदर, श्यामल चेहेरा. वय फार नव्हते. ज्या वयात स्त्रियांच्या चेहेऱ्यावर एक स्थिर सौंदर्य दिसू लागते, त्या वयात तिने नुकताच प्रवेश केला होता; बोलताना दोन्ही गालांना खळ्या पडत होत्या. तिच्या मोठाल्या काळ्या डोळ्यांत एक प्रकारचे सहज बुद्धि-भक्तीचे तेज दिसत होते. साधे अर्धवट मळलेले पातळ ती नेसली होती आणि हातात होत्या दोन जोड्या सोन्याच्या बांगड्या.

ती स्त्री म्हणाली, " आपण नव्या साधिका ना ? पाहताच ओळखलं मी. स्केच करीत होता, आपण आर्टिस्ट. मी पुराणपंथी असले तरी मी आपल्याला अगदीच समजू शकत नाही असं नाही. "

मी विचारले, " आपण कुणाच्या शिष्या ? आपल्याबरोबर कुणी नाही का ? "

" सोबतीची काय जरुरी ? मनात आलं, एकटीच निघून आले. तीर्थस्नान करून परत जाईन. ही एक दिवसाचीच तर वाट. तुम्हांला माहीत आहे, मी पुष्कळांची भक्त आहे; परंतु अजून कुणाकडूनही दीक्षा घेतलेली नाही. सर्वच जण दीक्षा द्यायला पाहतात, परंतु मीच नक्की ठरवू शकत नाही. आताच काय गरज, असं घरीही म्हणतात ? धर्मकार्यासाठी नंतर पुष्कळ वेळ मिळेल. परंतु तुम्ही समजू

शकाल. तुम्हीच सांगा -- आतून उर्मी आल्यावर गप्प का बसवतं कुणाला ? जी उर्मी मनात उसळते ती तर बाहेर पडायलाच पाहणार ? आता आपणच पाहा ना आपली साधना जरी निराळी असली तरी या वयात आपण इतक्या लांब आलात -- ते अंतरीची ओढ होती म्हणूनच ना ? "

बोलता बोलता बोलणे कुठच्या कुठे जाऊन पोचते -- भीतीने मी विषय बदलला. मी विचारले, " सासर कुठंय ? "

" कुमिल्लाला, लहानपणापासून रांचीला वाढले आणि लग्न झालं अगदी गावंढळ खेडेगावात. "

चोहीकडे रातकिडयांची किरकिर चालायची, भीतीनं माझा जीव जायची वेळ यायची. ही कुठं येऊन पडले म्हणून मला रडू यायचं ? दाट जंगल. संध्याकाळ झाली नाही तोच गुडुप अंधार. रवि ठाकूर ऋषींचं नाव ऐकलंय तुम्ही ? ते ऋषीच होते. त्यांनी जे महान कार्य केलं ते करणं दुसऱ्या कुणाला जमणं शक्यच नाही. त्यांनी म्हटलंय --

" जलाशयाच्या श्यामल जलात संध्याप्रकाश झळकतो. सावलीत घन वन झाकळलेले असते. परिचित अशा स्वरात दुरून जणू कुणी हाकारीत असतं. सखी ती छाया कुठं आहे ? ते जल कुठं आहे ? तो बांधीव घाट आणि तो अश्वत्थतल कुठं आहे ? "

तेव्हा याचा अर्थ समजत नव्हता. परतु आता प्रत्येक क्षणी ते शब्द आठवत असतात. थोडं दूर आल्यावरच खरी गोष्ट मनाला समजते -- होय ना ? म्हणून आता उगीच मनात येतं --

" जलाशयाच्या त्या शीतल श्यामल जलाच्या अंकावरच मरण यावं हे बरं. "

" बरं आपली साधना कोणत्या प्रकारची ? माझा विश्वास नाही असं समजू नका. मला फक्त जाणून घ्यायची इच्छा आहे. नव्या साधिका मी आणखीदेखील पाहिल्या आहेत -- त्यांचा संप्रदाय सुशिक्षित असतो. "

मी पाहिलं आक्का ओठ दाबून हसत होत्या. मी काय उत्तर देते ते ऐकण्यासाठी, चालतानादेखील त्यांचे कान माझ्याकडेच होते. मनातला भडका मनातच ठेवून, जणू ही विशेष महत्त्वाची गोष्ट आहे अशा आविर्भावात मी एकदम विचारले, " आपण कुठं उतरला आहा ? जेवणार काय ? बाजारातल्या खाद्यपदार्थांबद्दल जरा संभाळाच, नाहक मराल नाहीतर. "

ती स्त्री हसून म्हणाली, " आज तर उपासच, तसं काही खाणारच नाही. आणखी

एकदोन दिवस राहणार आहे. ते काही खाल्लं नाही तर त्यात काय बिघडणार आहे ? आपल्याला काय वाटतं तसं राहता येणार नाही? या विषयासंबंधी आपल्या साधनेत काय सांगितलंय ? "

हाय रे देवा ! इकडून तिकडून ही पुन्हा मूळ पदावर ! मी विचारले, " मुलंबाळं किती आपल्याला ? त्यांना कुठ ठेवून आलात ? कुणाजवळ ? "——हा एकमेव विषय— ज्याचा उल्लेख केला की कोणत्याही मातेचे मन पुन्हा मुलाकडे ओढ घेईल.

ती म्हणाली, " मला एकच मुलगी, आठ वर्षांची, ती जास्त करून तिच्या आत्याकडेच राहते; हे रेल्वेत एंजीनिअर आहेत, फिरतीचं काम, आज इथं तर उद्या तिथं. मुलीचं शिक्षण नीट होत नाही. आत्या हायस्कूलमध्येच टीचर आहे. तिनंच भाचीला स्वत:जवळ ठेवून घेतलंय. हा संसार म्हणजे दुसरं काय ? सारी मायाच आणखी काय ? खरं ना ? यासंबंधी आपले ज्ञान जास्त. आपणच हे तत्त्व मला जरा नीट समजावून सांगा ना, ऐकते मी. "

अस्थिर मनाने मी इकडेतिकडे पाहिलं. समोरच भोलागिरीचा आश्रम होता. तिथे कुम्भमेळयाच्या भक्तांची गर्दी होती. डोळयाची पापणी लवते ना लवते तोच मी त्या गर्दीत शिरले आणि दिसेनाशी झाले. तिने इकडे तिकडे हिंडून थोडे शोधले आणि मग जरा अंतरावर एक धर्मशाळा होती तिथे ती गेली.

इतक्या वेळानंतर आक्कांनी तोंड उघडले, " तुझ्या पायी मानसन्मान संभाळणं कठीण, स्वत: जे करतेस ते कर. मला त्यात गुंतवलंस तर मात्र......"

तिथून सरळ दक्षघाटावर आलो. इथे दक्षेश्वराचे मंदिर आहे. असंख्य लोकांची गर्दी होती. सबंध आवारात विराट जत्रा भरली होती. कागदाच्या पिपाण्या, खव्याचे पेढे, बेसनाचे लाडू, गरम जिलेबी, लस्सी, फुगे, खुळखुळे-लाकडी घोडा, रंगित कागदाच्या खेळण्याच्या छत्र्या, फुलांचे गुच्छ, बुचाच्या दांडीवर बसलेली साळुंकी, पोपट, शेपटी लोंबणारा हनुमान एक ना दोन. लहानपणी पाहिलेली प्राचीन वटवृक्षाखालची रथजत्राच जणू. शेजारीच घाण्याला बैलांची जोडी लावून एक माणूस उसाचा रस काढीत होता. काचेच्या ग्लासमध्ये रस आणि बर्फाचा तुकडा घालून तो विकीत होता. कोरड पडलेल्या घशाला हा थंड हिरवा रस काय अमृतासारखा वाटतो. मला कळत नाही आज मरायला उपासाचं नाव कशाला काढलं ? मी नुसताच घोट गिळला आणि पाहिलं मुलंबाळं, लेकीसुना, बायको या सर्वांना घेऊन कोंडाळं करून बसून एक-एक कुटुंब खाद्यपदार्थ विकत घेऊन खात होते.

हे लोकसुद्धा दिवसभर हिंडले फिरले होते. रिकाम्या पोटी थकवा जास्तच जाणवतो. तीन आण्यांना शेरभर गोड बोरे पदर भरून मुलांच्या एका मावशीने विकत घेतली. दुसरी एक आई तिने दुकानातली संत्रे दाबून दाबून पाहिली परंतु भाव जमला नाही म्हणून कडेवरच्या मुलाला खांद्यावर घेऊन ती चालू लागली. झाडाच्या सावलीत चादर अंथरून, पायावर पाय ठेवून, एक पाश्चात्य माणूस आपल्या मित्राबरोबर झोपला होता. सगळीकडे कसे समाधानी आणि आरामाचे वातावरण होते.

दादा म्हणाले, " मी इथंच बसतो. तुम्ही जा आणि शंकराला जे वाहायचं ते वाहून या. ' सतीच्या पुण्याईतच पतीची पुण्याई. ' मी सर्व मानून घेतलं मनानं. "

शिवमंदिराच्या जवळपास येताच वेड्यासारखी लोकांची ढकलाढकली झाली. त्यात आणखी मंदिरात जाण्याची वाट अरुंद. वाटेच्या दोन्ही बाजूंना उंच भिंत, जसं काही अरुंद भुयारच. त्या मार्गावर जाडजूड तरुण हिंदुस्थानी, पंजाबी, मारवाडी लोकांचा भरगच्च क्यू अगदी चेंगरून जात होता. हातांतला अर्घ्य देण्यासाठी घेतलेला पाण्याचा लोटा डोक्यावर उचलून धरून एकमेकांच्या खांद्याला, छातीला धक्के देत लोक पुढे सरकत होते. हा एवढा लांब क्यू, कधीपासून पुढे सरकत आहे, कधी पोचणार देवळात – त्यांची ती गती पाहून चक्कर येत होती. दक्षेश्वराच्या छोट्या देवळाच्या छोट्या दरवाज्यातून एकापेक्षा जास्त जणांना एकदम आत जाता यायचे नाही. देवळाला फक्त दोन दरवाजे होते. एका दरवाज्यानं एकएक करून, बाहेर पडत. केव्हा एकदा ही गर्दी संपणार ? काही समजत नाही. दर क्षणाला लोकांची रांग मागे वाढतच होती.

आक्कांच्या चेहेऱ्यावर विषण्णता पसरली होती. व्रजरमण म्हणाले, " आपण इथूनच हात जोडून मनातल्या मनात महादेवाला प्रणाम करा, फुलं, फळं, दूध घेऊन मी आत जातो. शिवाला सर्व वाहून परत येतो. "

ही सूचना तर चांगली होती. आक्काही असमंजस नव्हत्या. आम्ही पटकन देवळाच्या गॅलरीत चढलो. खाली मध्यभागी असलेली शिवाची मूर्ती वरून दरवाज्याच्या फटीतून दिसत होती. आक्कांनी श्रीशंकराच्या नावाने मूठभर फुले, बेलपत्री तिथूनच टाकली. पितळेच्या बादलीभर दूध आणि फळे व्रजरमणनी हात वर करून धरली व ते गर्दीत जाऊन उभे राहिले.

इथे आता जास्त थांबून काय फायदा ? दादा बसले होते तिथे आम्ही निघून आलो.

रस्त्याच्या कडेला असलेल्या पडक्या व्हरांड्यात ते थांबले होते. पाय पसरून आरामात आम्ही बसलो. खाली एक वैष्णवी पंचा पसरून भिक्षा मागत बसली होती. तिला दाखवून दादा म्हणाले, " गंमत पाहिलीत; हिचं घर मैमनसिंहला आहे. ती ब्राह्मण विधवा आहे. इतका वेळ तिच्याबरोबरच बोलत होतो. "

गुडघ्यावर हनुवटी टेकून, मान खाली घालून वैष्णवी बसली होती. जणू एकचित्ताने ती कसला तरी विचार करीत होती. पुष्कळ वेळ असाच गेला. एकदम मान वर करून तिने म्हटले, " मुसलमान अगदी जाळपोळ करून खाक करून टाकताहेत. "

" काय ? "

" आमचा गाव, मैमनसिंह ? "

ब्राह्मण विधवा, लहान वय, तीर्थक्षेत्र, विरक्त, लावण्यवती, दु:खी, भिकारीण या सर्व गोष्टींचा मेळ घालता येत नव्हता. हिचा पूर्वेतिहास किती दारुण असेल ?

ती म्हणाली, " त्या ज्वाळांतूनच तर मी निघून आले. न येऊन कसं चाललं असतं ? बालवयातच वैधव्य आलं. वडील हयात नव्हते. भावाकडेच राहिले. हा एकुलता एकच भाऊ. मुसलमान लोक माझा टिकाव लागू देत नव्हते. सकाळ-संध्याकाळ तीच दहशत. शेवटी एक दिवस मध्यरात्र झाली नाही तोच आपल्या साथीदारांसह हातात चाकू, भाले, घेऊन ते आले. घराला त्यांनी घेराव घातला अन म्हणाले की, " बऱ्या बोलानं मला देऊन टाकलं नाही तर दादाचा खून करून ते मला घेऊन जातील. माझ्या दिदीनं (मोठ्या बहिणीनं) मला समजावून सांगितलं, " तुला आता इथं राहून चालणार नाही. तुझ्यापायी सख्ख्या भावाचा खून होईल. भावाला वाचवायचं असेल तर तू गाव सोडून निघून जा " मी निघून आले; गेल्या आषाढात तेरा वर्षं झाली त्याला. "

आता वातामुळे ती पंगू झाली होती. हातपाय नीट चालत नव्हते. त्यातच एक महिन्यापूर्वी गायीने धक्का मारल्यामुळे तिला एका डोळ्याने दिसत नव्हते.

अंगात ऑर्गंडीचा झगा घातलेला एक दानशील श्रीमंत पैसे टाकीत टाकीत मंदिराकडे जात होता. समोरच्या भिकाऱ्यांच्या ओळीमध्ये ती मागे होती. त्या गृहस्थांचे तिच्याकडे लक्ष गेले नाही. फाटका पंचा उचलून ती खुरडत खुरडत पुढे गेली आणि हात पसरून गोड आवाजात म्हणाली, " बाबू, ए बाबू, थोडी भिक्षा घाल ना इकडं. "

आक्का म्हणाल्या, "फुटक्या नशिबाची! तिचे हातपाय पहा, कसे लहान लहान पानांसारख आहेत. नक्कीच एकेकाळची कुलवंताची मुलगी असणार."

इतक्यात निर्वाणी आखाडासुद्धा आला वाटतं. 'रस्ता सोडा, रस्ता सोडा' असा एकच आवाज ऐकू येऊ लागला. आज कुठे अन् कधी अडकून पडू ते सांगवत नव्हते. हे सर्व लोक इथे पोचण्यापूर्वीच घरी परतलेले बरे. त्याशिवाय सेवाश्रमालासुद्धा दर तीन तासांनी शिवपूजा होणार होती. त्याला हजर राहायला हवे होते. निदान पहिल्या पूजेला तरी नक्कीच.

शिवरात्रीला ठिकठिकाणी शिवसंकीर्तन होणार होते. सबंध रात्रभर जागून त्या सर्व पूजा पहायच्या असे आक्कांबरोबर ठरले होते, ते मी विसरले नव्हते. जास्त रात्र होण्यापूर्वीच मी बिछान्यात पडले.

आक्का म्हणाल्या, "कुम्भस्नान – कुम्भस्नान – झालं एकदाचं कुम्भस्नान. आता निश्चिंत झालो."

रिकाम्या पोटी झोप येत नव्हती. सबंध रात्रभर जवळच असलेल्या युकॅलिप्टसच्या झाडांच्या फांद्या वाऱ्यामुळ एकमेकींवर आपटून त्यांचा फट्फट् आवाज होत होता.

मी एक गोष्ट ऐकली होती. एक म्हातारी तीर्थयात्रेला गेली. पण ती तिच्या परसातल्या घेवड्याच्या वेलीला विसरू शकली नाही. देवळादेवळातून जायची, देवदर्शन घ्यायची. पण मनात विचार वेलीचाच. गाय घुसली असेल, बकरी शिरली असेल आत, सगळा वेल खाल्ला असेल. वेलीचाच विचार मनात घेऊन आली होती तशीच म्हातारी परत गेली. तिच्या नशिबी देवदर्शन काही लिहिले नव्हते.

तीच दशा माझी पण झाली का? आज झोप मोडताच भोपळ्याच्या वेलीच्या आठवणीने मन इतके कासावीस झाले – त्यांचे काय झाले असेल कुणास ठाऊक? मी निघाले तेव्हा पाहिले होते. वेलीला छोटे छोटे कितीतरी भोपळे लागले होते. इतक्या दिवसांत ते नक्कीच मोठे झाले असणार. रमूने त्यांचे काय केले असेल? कुणाकुणाला दिले असतील? त्यांचे काय काय प्रकार केले असतील? विहिरीजवळ पाठीवर ऊन घेत बसलो असताना डोक्यात सारे हेच विचार येत होते.

दुधी भोपळ्याचा वेल म्हणजे किती कष्टाचे काम. माझ्या हातच्या वेलीला हे पहिल्यानेच फळ लागले होते. दुसऱ्यांच्या घरांत शेकड्यांनी भोपळे लागतात.

खाऊन, वाटूनसुद्धा संपत नाहीत. मग कापून कापून गायींना खायला घालतात. आणि माझ्या बाबतीत मात्र वेल उगवते, तिला फांद्या फुटतात, फुले येतात आणि शेवटी एक दिवस फांद्या एकदम गळून पडतात. का तर – मुळांना वाळवी लागली, बुंधा गोगलगायींनी पोखरून टाकला, चांगल्या मोठ्या फांदीला कीड लागली, जास्त खतपाण्यामुळे कळ्या कुजून गेल्या – एक ना दोन किती भानगडी.

या वेळी मात्र मांडव सुरेख पानांनी भरून गेला, अवखळ मुलांप्रमाणे फांद्या इकडे तिकडे धावू लागल्या, फांद्याफांद्यांतून पानापानांमधून फुले डोकावू लागली – मी – मी तर माया तोडून टाकली एकदम. मांडवाखालून इकडे तिकडे शोधण्याने काय होणार ? हा सुकून तर जाणार आता.

कित्येक दिवस तिकडे फिरकलेच नाही मी. काय फायदा माया वाढवून ? जे टिकणारच नाही ते जाऊ दे सरळ.

जळले मेले मन. त्याला गप्प म्हणून राहता आलेच नाही. पाचेक दिवसांनंतर दिवसाचे काम संपल्यावर वेणी घालता घालता हळूहळू मांडवाच्याजवळ जाऊन उभी राहिले. चोरून चोरून त्या वेलीकडे मी पाहिले. ज्याची माया तोडली, त्याच्याकडे सरळ का पाहाता येते ?

" रमू, अरे रमू इकडं येऊन बघ, धावत ये. " मी जोरात हाक मारली. " एका पानाजवळ छोटं फळ दिसतंय. " रमू धावत आला. " कुठं कुठं ? अहो, मामी हा आणखी एक, हा आणखी एक, – पाहा हा पण आणखी एक " वेलीभोवती रमू धावत होता. प्रत्येक वेलीला कितीतरी भोपळे लागले होते !

ते इतक्या कौतुकाचे माझे भोपळे मोठे झाले असतील, पण मला काही पाहाता आले नाहीत.

" तू इथं ? दहा ठिकाणी तुला शोधून मरतेय मी " असे म्हणत म्हणतच आक्का जवळ आल्या. म्हणाल्या, " लवकर चल तंवूत, टोपलीभर वाटाण्याच्या शेंगा देऊन गेलेत, सोलायला हव्यात त्या. रामकृष्णदेवांच्या जन्मोत्सवाच्या प्रसादासाठी लागतील. वेळ फार नाही. येऊन हात लाव चटचट. "

टोपलीच्या भोवती सर्व मिळून बसलो. शेतातून ताज्या तोडलेल्या वाटाण्याच्या शेंगा, हातांनी पटापट सोलीत होते आणि दाणे झरझर काढीत होते. वाटले होते असा काय वेळ लागणार ? पण पाहिले तर दुपार टळून गेली. आक्कांनी सर्व कचरा उचलला, एखादा पडलेला वाटाणा तोही उचलला. साले, वाटाणे वेगवेगळ्या

टोपल्यांत भरून सर्वांच्या शेवटी कंबर ताठ करून आक्का उठल्या.

‘दिवस गेला व्यर्थ कामात, रात्र गेली झोपण्यात’ – आक्कांच्या कृपेमुळे ह्याशिवाय दुसरे काही शक्य नव्हते. सत्कर्म, सत्संग – आमच्या आयुष्यात हेच मात्र एक ध्येय. दिवस देवकार्यात घालवून संध्याकाळी साधूंना पाहायला म्हणून बाहेर पडलो. आक्का म्हणाल्या. “त्या दिवशी भंडाऱ्याच्या वेळी महादेवानंदजींना पाहिलंस वाटतं, ते भोलागिरी आश्रमाचे मंडलेश्वर आहेत. चला ना, जाऊन पाहू या. दर्शन मिळालं तर. पुष्कळ दिवसांपूर्वी शिलचरला आले होते.”

महादेवानंदजी गच्चीवर फिरत होते. या वेळी रोजच ते फिरतात. आम्हांला थोडे थांबावे लागले.

मुख्य मंदिरातून अंगणात येऊन आम्ही उभे राहिलो. आश्रमातील लोकांची येजा चालली होती. मान वर करून ते बघत होते. परंतु आम्ही कुठे बसायचे ते कुणी आम्हांला सांगितले नाही.

दादा म्हणाले, “आता दुसरं काय करणार? उभंच राहा झालं. दर्शनासाठी लोक किती त्रास घेतात आणि आम्हांला एवढंमुद्धा जमत नाही.”

मध्यभागी खडीवर उभे राहिल्या राहिल्या माझ्या मनात आले, ‘हेच इथं गवत असतं तर बसता आलं असतं. इतकी वाट चालून आलो, दोन्ही पाय कसे भरून आले आहेत.’

महादेवानंदजी खाली उतरून आले. अंगणाच्या अगदी मध्यभागी पाटीशी आणि बाजूला तक्के लावलेली आरामखुर्ची ठेवली होती; ते रोज इथेच येऊन बसतात असे वाटते. महादेवानंदजी खाली उतरून येताच आरामखुर्ची जरा झटकून पुढे सरकवून ठेवली. ते त्यावर बसले नाहीत. चोहोकडे न्याहाळून पाहात आम्हांला बरोबर घेऊन बोलत बोलत अंगणात एका बाजूला एक खाट पडली होती, तिथे येऊन उभे राहिले. त्यांच्या भक्तांनी तोपर्यंत ती आरामखुर्ची उचलून आणून तिथे ठेवली होती. ते तिच्यावर बसले आणि आम्हीसुद्धा खाली पाय मोकळे सोडून खाटे-वर समोरच बसलो आणि हुश्श केले.

“लहानमोठ्यांत हाच फरक असतो.” आक्का हळूच म्हणाल्या. “पाहिलंस ना, आपल्याला कुठं बसायला सांगायचं, ते त्यांनी येताच अगोदर पाहिलं. आणि म्हणून स्वतःची बसायची जागा सोडून ते इथवर आले.”

वृद्ध माणूस. तोंडभर हसू. सरळ साध्या बोलण्यात गोष्टी रंगून जात.

दादांनी विचारले, " आमच्यासारख्या गृहस्थाश्रमी लोकांच्या बाबतीत साधनेचा सोपा मार्ग कोणता ? "

महादेवानंदजी थोडा वेळ जप करीत गप्प राहिले. मग म्हणाले,

**" भज हे मन हरिनाम–**
**गौरीशंकर सीताराम,**
**राधेकृष्ण राम राम**
**खाली जिबे कोन काम ? "**

एवढे बोलून ते होहो करून हसायला लागले. पुढे म्हणाले, " हीच तर खरी गोष्ट आहे. खाली जिबे कोन काम – जीभ रिकामी ठेवून काय फायदा ? हातापायांनी काम चालू असलं तरी तोंडानं, " शिव, शिव, शंभो ! शिव, शिव, शंभो " – हे तरी नेहमी म्हणत राहिलं पाहिजे. प्रभुनामाचा जप सदैव करायला हवा. एकदा एक स्त्री येऊन मला म्हणाली, ' मला गायत्रीमंत्र सांगा ' मी तिला विचारले, ' तू मंत्र-दीक्षा कुणाकडून घेतली आहेस का ? ' ती म्हणाली, ' हो घेतली आहे. पण ती दुसऱ्या मंत्राची. मला गायत्रीमंत्र हवा आहे.' मी तिला सांगितलं, ' सर्व मंत्र एकच. गायनात् त्रायते इति गायत्री – जे पुन्हा पुन्हा म्हटल्यानं माणसात त्राण येतं ते गायत्री, मननात् त्रायते इति मंत्र – जे पुन्हा पुन्हा स्मरण केल्यानं त्राण येतं तो मंत्र. सगळं एकच, तुम्हांला गायत्री मंत्र घेण्याची जरुरी नाही; हाच मंत्र स्मरण करा. "

" हो, सर्व ठिकाणी केव्हाही मंत्राचा विषय निघतो. एकदा एका सभेत याच विषयासंबंधी खूप वाद माजला होता. एका पक्षानं मान्य केलं नाही. ते म्हणाले, ' अपवित्र अवस्थेत मंत्र-उच्चारण चालत नाही. ' मी म्हटलं, ' नक्कीच चालतो; ' माझं बोलणं ऐकल्याबरोबर सभेत गोंधळ माजला. एका पक्षाच्या पुरुषांनी जमिनी-वर जोडे घासून गडबड केली. ज्या पंडितांना मी विरोध केला, त्यांचाच पक्ष जोर-दार होता. सर्व सभा उधळणार अशी चिन्हं दिसू लागली. एकजण उठला आणि त्यानं विचारलं, ' अपवित्र अवस्थेतसुद्धा मंत्र-उच्चारण केलेलं चालू शकतं हे आपण सिद्ध करू शकाल ?' मी म्हटलं, ' हो सिद्ध करतो. फक्त पाच मिनिटं मला द्या.'

सर्व लोक पाच मिनिटे शांत झाले. मी म्हणालो, " तुम्ही अपवित्र म्हणता, तसं पाहिलं तर आपला सारा देहच अपवित्र, ओंगळ वस्तूंनी भरलेला आहे. आपलं

शरीर – जन्म, गर्भधारण सर्व ओंगळच. पवित्रता आहे कुठं ? शरीरातून कुठली गोष्ट काढून टाकाल ? '

शेवटी त्या सभेत सर्वांनी माझं म्हणणं मान्य केलं.

तरीसुद्धा जपतप करताना शक्य असेल तर जितकं निर्मळ राहता येईल तितकं चांगलं. जपजाप्य करून मन एकाग्र करायचं असतं ना ! "

व्रजरमणने विचारले, " स्नानादि गोष्टींचं प्रयोजन किती ?" ते म्हणाले, " स्नान केलं तर शरीर व मन पुष्कळ स्वच्छ होतं, संधी मिळाली आणि सोय असेल तर ती एक आवश्यक बाबच समजायला हवी. परंतु रस्त्याच्या कडेला किंवा प्रकृति बरी नसताना तर स्नान करता येत नाही ? त्यासाठीसुद्धा विधी सांगितलेले आहेत. शास्त्रामध्ये स्नानाचे आठ प्रकार दिलेले आढळतात. त्यांपैकी तीन केव्हाही, कुठंही करता येतात, जसं – गंगास्नान–गंगाजल शरीरावर शिपडलं तरी चालतं. आग्नेय स्नान–कपाळाला, गळ्याला, हाताला, छातीला, पाठीला, शरीराच्या पाच अंगांना यज्ञभस्म फासलं की झालं आग्नेय स्नान. हे स्नान सर्व स्नानांमध्ये सोयीस्कर. एकदा यज्ञभस्म घरी भरून ठेवलं की झालं काम. हवं तेव्हा त्याचा उपयोग करता येतो. बाहेर प्रवासाला निघालं की कागदात पुडी करून खिशात ठेवून द्यायची. आणखी एक प्रकारचं स्नान असतं, वायव्य स्नान म्हणतात त्याला. म्हणजे गायीच्या खुराची माती–गाय चालून गेल्यावर तिची पावलं उमटतात तिथली माती. याला म्हणतात ' गोपदरज. ' हे गोपदरज शरीरावर पाच ठिकाणी लावले की झालं हे स्नान. "

बर्फामुळे पाठीला थंडी बोचत होती. एका भक्ताने शाल आणून महादेवानंदजींच्या डोक्यावर, अंगावर लपेटून दिली. भोलागिरी आश्रमातील शिवमंदिरात आरतीची घंटा झाली. आता इथेच बसून राहणे योग्य नव्हते: आम्ही उठलो.

या मंदिरात एकाला एक लागून तीन खोल्या होत्या पांढऱ्या दगडाच्या. मध्यभागी शिवाची मूर्ती होती. चांदीच्या आठ कमलपाकळ्यांवर चांदीचा शंकर बसवला होता. –हा नवीन प्रकार होता. यापूर्वी अशी मूर्ती कुठेही पाहिली नव्हती.

उजव्या बाजूच्या खोलीत शंकराचार्यांची मूर्ती होती. चेहेरा कसा अगदी लहान मुलासारखा. फारच चांगली दिसत होती ती मूर्ती. इतक्या अल्प वयात त्यांनी इतकं पांडित्य कसं मिळवलं याचा विचार केला म्हणजे मी आश्चर्यानं दिङ्मूढ होते.

मी ऐकले होते की, सहासात वर्षांचे असतानाच शंकराचार्यांना संन्यास घेण्याची

इच्छा झाली होती. परंतु त्यांची आई आड आली. एकदा ते नदीत स्नानासाठी उतरले असता एका मगरीने त्यांचा पाय ओढला. आई घाटावर उभी होती. शंकराचार्य आईला म्हणाले, ' आई तू मला संन्यास घेऊ दिला नाहीस आणि आता बघ तुझ्या समोरून मगर कशी मला ओढून नेत आहे. ' आई आश्चर्यचकित झाली.

मगर जितका पाय ओढायची तितके शंकराचार्य ओरडायचे, '' आई संन्यास घ्यायला तू मला परवानगी दिली नाहीस आणि आता बघ हे काय झालं ? ''

मगरीने ओढीत ओढीत शंकराचार्यांना जेव्हा नदीच्या मध्यापर्यंत नेले, फक्त डोके बुडायचे बाकी राहिले तेव्हासुद्धा ते ओरडून म्हणाले, '' मगरीनं ओढून नेलेलं तू सहन करतेस, परंतु मी संन्यास घेईन म्हटलं तर ते तुला सहन झालं नाहीं ना ? '' आई तेव्हा भानावर आली. चटकन उठून म्हणाली, '' संन्यास घ्यायला मी परवानगी देते. तू इकड ये. ''

आईचे बोलणे ऐकून मगरीच्या तावडीतून सुटका करून घेऊन शंकराचार्य परत आले आणि लगेच संसारत्याग करून, संन्यास घेऊन ते बाहेर पडले. अवघे सोळा वर्षांचे असताना सर्व शास्त्रांचा अभ्यास पूर्ण करून वेदान्तभाष्य, गीताभाष्य, बारा उपनिषदांचे भाष्य ते लिहू शकत होते. कन्याकुमारीपासून हिमालयापर्यंत ते पायी चालत जात, तसाच कामरूप कामाख्यापर्यंत प्रवास करीत.

बत्तीस वर्षांचे होईपर्यंतच ते जगले पण तेवढ्यांत त्यांनी काय केले नाही ? बदरीनारायणला योशी-मठ, द्वारकेला शारदा मठ, दक्षिणेत शृंगेरी मठ, पुरीला गोवर्धन मठ, असे चार जागी त्यांनी चार मठ स्थापन केले. हिंदूधर्माला सुनियंत्रितपणे गुंफून संन्यासी संप्रदायाला दशनामी मुक्त करून ते गेले. त्यांनी त्यांच्या जीवनातील ज्ञानाचा जो अमोल ठेवा ठेवला आहे, आजपर्यंत लाखो ज्ञानी जनांनी तोच पूर्णपणे मान्य केला आहे.

आक्का म्हणाल्या, '' स्वतः महादेवच शंकराचार्यांच्या रूपानं अवतीर्ण झाले होते. गीतेमध्ये सांगितले आहे, '' यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत – '' धर्मक्रांती होते तेव्हा धर्मरक्षणार्थ भगवान अवतार घेतात. शंकराचार्यसुद्धा अशा क्रांतीच्या वेळीच जन्मास आले होते. ज्या वेळी देशात एकीकडे बौद्धधर्माचे वारे वाहू लागले व दुसरीकडे मुसलमानी धर्माचा जुलूम चालू झाला अशा वेळी शंकराचार्यांनी दृढ भावाने हिंदू धर्माची प्रतिष्ठापना केली.''

आणि मंदिराच्या या बाजूला डावीकडच्या खोलीत भोलागिरीची पांढऱ्या दगडाची मूर्ती. डोळ्याला वेगळा काळा चश्मा बसवलेला होता, जसे ते लावायचे तसा.

ढाक्क्याला असताना भोलागिरींना कित्येकदा पाहिले होते. लांबरुंद, गोरापान चेहेरा. त्यांना पाहायला काय गर्दी व्हायची लोकांची. जिथे ते जायचे तिथे जणू मुलीच्या लग्नाच्या उत्सवाइतका थाटमाट व्हायचा. आईचा पदर धरून मी जायची. ती त्यांची मूर्ती मी आजही विसरले नाही. या दगडाच्या मूर्तींत ते हडकुळे वाटतात. उतरत्या वयातील ही मूर्ती असावी.

ती किती पूर्वीची गोष्ट आहे. भोलागिरींच्या तोंडूनच ऐकली होती. ढाक्क्याला एका श्रीमंत माणसाने आपल्या मृत नातसुनेच्या स्मरणार्थ गावापासून दूर असलेल्या त्यांच्याच एका बागेत शिवमंदिर बांधले. ते सर्वांना खुले होते. सबंध दिवसभर उत्सव चालला होता. स्वतः भोलागिरी तिथे उपस्थित होते. त्यांना बघायला दूरदूरहून किती तरी लोक येत होते. – मला आठवते. ज्या गृहस्थांनी ते मंदिर बांधले ते उघड्या अंगाने जरीची नक्षी केलेला जांभळ्या रंगाचा बनारसी पीतांबर नेसून, डोक्यावर शिवाची मूर्ती घेऊन देवळाला प्रदक्षिणा घालीत होते. किती जुनी गोष्ट आहे, पण अजून त्यांचे ते चित्र डोळ्यांसमोर स्पष्ट दिसते. एका खोलीत भोलागिरी बसले होते, त्यांच्या भक्तांनी त्यांना घेरले होते. कसे कुणास ठाऊक मी नेमकी त्याच खोलीत जाऊन पोचले. आज महादेवानंदजी जे म्हणाले की " हातानं काम करा पण तोंडानं शिव शिव म्हणा. " तेच त्या दिवशी त्या खोलीत मी ऐकलं होतं. भोलागिरी त्यांच्या शिष्यांना समजावून सांगत होते; एका हातानं चरखा फिरवल्यासारख दाखवून दुसऱ्या हातानं सूत काढल्याची कृती करीत ते सांगत होते, " पाहा हातांनी असं सूत काढा आणि तोंडानं ' शिव, शिव, शिव, म्हणा. "

अंधारात घाईघाईने जात असता रस्त्यात माझा कोणाला तरी धक्का लागला. तो जोराने म्हणाला, " कोण रे ? पाहून चालता येत नाही ? "

किती मृदू, गोड आवाज ! रागावून बोलला खरा, पण त्यातही जणू मध होता.

मी टॉर्चचा उजेड पाडला. हृदय पिळवटून निघाले. या हृदयावरच त्याचे डोके आपटले होते. माझ्या अभिजितच्या वयाचा कोवळा किशोर; दोन्ही डोळ्यांनी आंधळा.

रागामुळे व दुःखामुळे तेव्हासुद्धा त्याचे ओठ कापत होते. उत्तर न मिळाल्यामुळे माझ्या अंगावरून हात फिरवून चाचपत तो म्हणाला, " कोण शेठाणी ? अरेरे, मी रागाने कोणाला काय म्हणालो, क्षमा करा. मला क्षमा करा "

प्रतिपदेची चंद्राची कोर उगवली होती. ताडाच्या झाडांच्या झावळींमधून ती

दिसत होती. मनाच्या गाभाऱ्यात एक गंभीर करुण बांसरी जणू गुंजन करू लागली. ऐकायचे नाही असे ठरवूनही ते सूर अडवता आले नाहीत असे वाटत होते. हा पक्का डांबरी रस्ता सोडून, जंगलातील वेड्या-वाकड्या, दगडांनी भरलेल्या रस्त्यांनी जावे, काळ्या काटेरी झुडूपांमधून जावे.

डावीकडे असलेल्या कुटीच्या ओटीवर अर्धनग्न किशोरांना घेऊन एक वृद्ध बसला होता. मध्यभागी एक रॉकेलचा डबा होता, मजेचा एक खेळ चालला होता वाटते. बोळक्या तोंडाने हुमत फुटक्या ढोलक्यावर थाप मारून तो वृद्ध गात होता–

" **सुखदु:ख नसे या संसारी काही**
**नशा चढावी प्रभुनामस्मरणाची ।**
**रामनाम एकची गोड या जगती,**
**म्हणा, राम, राम, राम ।।** "

सर्व मुलांनी त्यांच्या मागून मोठ्या उत्साहाने म्हटले–– 'राम, राम '.

पहाटेच्या वेळी माझ्या लक्षात आले– बाहेर सू सूं वारे वाहात होते. अंथरुणात पडल्या पडल्या ते मला स्पष्ट ऐकू येत होते. नशीब ! दुहेरी छत असलेल्या तंबूत ते वारे शिरत नव्हते. तसे नसते तर काय अवस्था झाली असती ! डोक्याच्या बाजूला तंबूच्या खिडकीला पातळ पडदा लावलेला होता. किती उजाडले ते मी पुन्हा पुन्हा डोके वर करून पाहात होते. रात्रभर तोंडावर पांघरूण घेऊन श्वासोच्छ्वासाने अंगात ऊब आणली होती. सर्वांनाच जरा आराम वाटत होता आणि आता अंथरूण सोडून उठायला हवे होते.

आज पहाटेच हृषीकेशला जायचे ठरले होते.

कोण कोण उठले आणि कोण उठले नाही ते मी डोळे उघडून पाहून पुन्हा डोक्यावरून पांघरूण घेत होते. उठू दे सर्वांना आधी. उठून तयारी करून मला घाई करीपर्यंत आज मी अंथरूण सोडीत नाही. परंतु काय माझं दुर्दैव ! आक्का केव्हाच उठून बाहेरसुद्धा गेल्या होत्या. मला कळलंसुद्धा नाही. ओला पंचा पिळीत पिळीत आक्का आत आल्या. ओल्या केसांतून पाणी टपटप् टपकत होते. त्यांनी इकडेतिकडे पाहिले. मला झोपलेली पाहून त्या माझ्या खाटेजवळ आल्या. दुसरा एखादा दिवस असता तर आक्का माझ्याजवळ आल्या असत्या आणि माझ्या कपाळावरून हात

फिरवून हळू आवाजात म्हणाल्या असत्या," आता उठतेस ना, चहाची घंटा व्हायची वेळ झाली. " आज त्यांना पुष्कळ काम होते. आज सर्व दिवसभराची जमवाजमव करायची होती आणि म्हणून आज त्यांनी माझ्या कपाळावर हात ठेवला खरा पण एक थप्पड मारली– म्हणजेच " बस झालं, ऊठ आता. "

पहाटेची वेळ,ब्राह्ममुहूर्त; जास्त काही बोलण्याची सोय नव्हती. हातपाय पोटाशी घेऊन उठून बसायलाच हवे होते. छे, नुसते बसूनही चालणार नव्हते. मी अंथरुणातून बाहेर आले. तंबूचा दरवाजा किलकिला उघडून बाहेर डोकावले. पण, अरे बापरे ! मी लगेच कासवासारखे डोके आत घेतले. असे वाटले जणू काही माझ्या पुढे केलेल्या तोंडावर थंडीने सहस्रावधी नाग्यांचा फटकाच मारला.

आत बसून राहून चालणार नव्हते. बाहेर पडायलाच हवे होते. मी आक्कांकडे पाहिले. लाल काठाच्या साडीचा पदर डोक्यावरून घेतलेल्या त्यांच्या शांत चेहऱ्यावर थंडीचा काहीमुद्धा परिणाम दिसत नव्हता. त्यांना पाहून मी थोडे धैर्य आणू पाहात होते. त्याही माणूस आणि मीही माणूस. त्यांना जमले आणि मला का जमणार नाही ? तर मग ? हातात दातवण, साबण, टॉवेल घेऊन मी झटकन बाहेर पडले.

चहा घेतला आणि खांद्यावर पिशव्या अडकवून बस स्टॅंडवर निघालो. दिवसभरासाठी एक मोटर ठरवली. चिकटून, चिकटून बसलो.

-

मोटर भरधाव सुटली. पाहाता पाहाता शहर सोडून निर्जन वनातल्या रस्त्यात गाडी आली. दोन्ही बाजूंना साग, जांभूळ, कडुनिंब आणि खैराची झाडे होती. अधून मधून आवळ्याची झाडेही होती. राखीव वन होते ते. शीतल सावलीचा रस्ता.

बरोबर शशीमहाराज होते. ते म्हणाले, " पूर्वी इथं नेहमी हरिण, मोर दिसायचे. अजूनही आहेत. कदाचित परत जाताना पाहायला मिळतील. "

दूर अंतरावर जंगलांनी घेरलेल्या डोंगरमाथ्यावर पांढऱ्या घरांची ओळच ओळ दिसली.

शशीमहाराज म्हणाले, " ते नरेंद्रनगर, आता तिथं टिहिरीच्या राजाची राजधानी आहे. "

सूर्यप्रकाशाने सर्व राजधानी किती शोभायमान दिसत होती. गाडी जशी वळण घेई तशी राजधानी एकदा डावीकडे, एकदा उजवीकडे, एकदा समोर, एकदा पाठी-

मागे सरकत होती. सगळीकडे नुसता नाच चालला होता, जणू लपंडाव सुरू होता. मंत्रमुग्ध होऊन तिकडे पाहात होते आणि त्यांच्या सुरात सूर मिळवून मी मनातल्या मनात मोकळेपणाने हसत होते.

" हृषीकेशच्या वाटेवरच 'सत् नारायणचं मंदिर' आहे. नारायणाचं दर्शन घेऊनच पुढं गेलेलं बरं." शशीमहाराजांनी आज्ञा केली.

गाडीतून आम्ही उतरलो. समोरच्या सीटवर शशीमहाराज बसले होते. दरवाजा उघडून पायफळीवर पाय ठेवताच नाग दिसल्यागत एकदम दचकून त्यांनी पाय आत घेतले आणि गाडीचा दरवाजा त्यांनी धाड्दिशी बंद केला.

काय झालं त्यांना ?

त्यांनी सांगितलं, " तुम्ही पुढं व्हा. मी नंतर येतो." हातपाय जवळ आवरून-सावरून शशीमहाराज गाडीतच बसून राहिले.

फाटकातून देवळात शिरत असताना आक्कांना खुदकन् हसू फुटले. काय भानगड होती ? आक्कांनी एकदा मागे वळून शशीमहाराजांकडे पाहिले आणि देवळाच्या फाटकावरच्या खोबणीकडे त्यांनी बोट दाखवले. चारपाच माकडे तिथे बसली होती. यात्रेकरूंना पाहिल्यावर खायला मिळण्याच्या आशेने ते चुळबूळ करीत होते. शशीमहाराज गाडीतून उतरायला का तयार नव्हते ते इतक्या वेळानंतर माझ्या लक्षात आले.

सत्यनारायण—काळ्या दगडाची, सुंदर, अगदी परिपूर्ण मूर्ती. परंतु काळ्या दगडावरच्या काळ्या डोळ्यांनी सेवकांचे समाधान होत नव्हते. चांदीच्या पानांचे रुपेरी डोळे बसवून त्यावर मध्यभागी रत्ने लावली होती. सर्व मूर्तींमध्ये हेच पाहायला मिळाले. पांढऱ्या डोळ्यांत काळी गोल रत्ने. देवदेवतांचे डोळे कसे लखलखत असतात. पांढऱ्या डोळ्यांत संपूर्ण गोलाकार रत्न डोळ्यांना कसे प्रखर वाटते. त्यामुळे देवतांच्या डोळ्यांत त्यांचा कोमल भाव दिसतच नाही. एकदा रामकृष्णदेव कुणालातरी सांगत असताना मी ऐकले होते— 'तुम्हांला देवाचे डोळे काढताच येत नाहीत. माझ्याकडं द्या. मी काढून दाखवतो.' एवढे बोलून त्यांनी देवचक्षू काढून दाखवले होते. देवतांचे डोळेसुद्धा भक्तांच्या हस्तस्पर्शाची अपेक्षा करतात.

सत्यनारायणाच्या देवळाशेजारीच पाणचक्की होती. गहू दळून पीठ बाहेर निघत होते, फिरणाऱ्या चाकांचा घटाघट आवाज होत होता. अंगणामध्ये एक लहानसे कुंड होते. एवढ्याशा जागेत या कुंडाचे पाणी वरखाली आणून ही पाणचक्की बसवून वापरीत होते.

कुंडाच्या मध्यभागी एक मंदिर होते. पाण्यावरून वाट केली होती. त्या वाटेनेच मंदिरात आलो. इथे कुठली देवता ? पायऱ्यांजवळ एक बंगाली परिव्राजक (संन्यासी) बसला होता. अगदी सुकलेला, दुबळा. काही दिवस झाले त्याने इथे आश्रय घेतला होता. बंगाली प्रवासी पाहून तो उठून उभा राहिला व म्हणाला, " ही आहे शिवाची मूर्ती. "

ही मूर्ती शिवाची कशी असेल ? मूर्तीचा अधिक भाग कापडाने झाकलेला होता आणि बाकीचा भाग तेल व शेंदराने माखलेला होता. आक्का जरा कांकू करू लागल्या. त्या म्हणाल्या, " प्रत्येक देवादिकांची त्याच्या निराळ्या खुणेमुळेच ओळख पटते. इथे शोधूनदेखील शिवाची अशी विशेष खूण सापडत नाही. "

संन्यासी म्हणाला, " तर मग विष्णू. "

आक्कांनी मानेनेच नाही म्हटले, " छे, विष्णू पण नाही. "

" तर मग रामचंद्र असेल. "

वेडा की काय हा माणूस !

इतका वेळ व्रजरमण एकचित्त पाहात होते. ते म्हणाले, " मूर्तीच्या पायांशी स्पष्टपणे सर्प दिसताहेत, दोन्ही बाजूला पक्ष्यांचे पंख नजरेस पडताहेत, दोन्ही डोळे गोलाकृती, तोंडामध्ये चोच बसवलेली, मला असे वाटते की ही गरुडमूर्ती असावी."

तेच तर ! नारायणाचे वाहन गरुड ! याच्याशिवाय त्याचे चालणार कसे ?

पुन्हा जाऊन गाडीत बसलो. पुन्हा दोन्ही बाजूंनी झाडे जात होती, जंगले जात होती, जात होती हिरवीगार शेते, शेतकऱ्यांच्या गायी, रेड्यांच्या गाड्या, मेंढपाळ. एक ना दोन. असेच सर्व पाश तुटतात. एवढीसुद्धा दया नाही, माया नाही. कुठं ? मला तर असे सर्व सोडून जाता येत नाही. जाता जाता मध्येच आठवण झाली, त्या जुन्या झाडांच्या कळ्यांची. मध्येच आठवण होते उन्हात तकाकणाऱ्या सरसोच्या शेताची. मनाच्या गाभाऱ्यात अगदी तळाशी हेलकावत उठत होती. गवळणीच्या घेरदार घागऱ्याला लावलेली लाल किनार. या किनारीच्या रेषा तिच्या चालण्याच्या तालावर तिच्या पायाशी घड्यावर मोकळ्या होत होत्या. वेलीच्या फांद्या एकीत एक गुंतवून अर्धवट दिसणारे असे जे झुडूप तयार झाले होते त्याच्या आठवणीने प्राण कासावीस होत होता.

बाजाराच्या वळणावर गाडी थांबली. येऊन पोचलो हृषीकेशला. हरिद्वारच्या मानाने हृषीकेश फारच निर्जन. एकांतपणे साधना करून भजन करायला साधुसंत

बहुधा इथेच राहतात. यात्रेकरूंची गर्दी नक्की होतेच. परंतु ते येतात, निघून जातात, फार राहत नाहीत.

हरिद्वार पाहून वाटले होते की, हरिद्वार म्हणजे अगदी पर्वतांच्या परिसरात. पण हृषीकेश पाहिले तर अगदी पहाडाजवळ, पहाडाला अगदी लागूनच घर, दार, घाट, रस्ता सर्वांना पर्वतांनी निळ्या पदराखाली जणू हृदयाशी कवटाळून धरले होते.

त्रिवेणीघाट गंगेला स्पर्श करण्यासाठी खाली उतरला. पाणी जास्त खोल असेल असे वाटले नाही. घाटाच्या समोरच मोठमोठे काळे दगड रचलेले होते. पाण्याच्या लाटा त्यांवरून धावत होत्या.

पिठाच्या गोळ्या घेऊन मुलांचे घोळकेच्या घोळके त्रस्त करीत होते. विकत घेतल्याच पाहिजेत. पंडचेसुद्धा त्यांना साथ देत होते. " इथं माशांना खायला दिलं नाही तर तीर्थयात्रेचं काही पुण्य मिळत नाही. "

मी विचारले, " मासे आहेत कुठं तर त्याना खायला द्यायचं ?"

" ते काय मासे. " असे म्हणून पंड्याने बोट पुढे केले.

' ते मासे ! ' मी आश्चर्यचकित झाले. मला तर वेगळेच वाटले होते. काळ्या दगडांचे स्तूप वाटले मला ते. इतके मासे. पाण्याच्या प्रवाहाच्या मुखाशी अनवरत-पणे एकमेकांवर चढत उतरत होते. अगदी निर्भय. तळवासुद्धा पाण्यात बुडणार नाही एवढ्या पाण्यात लोळण घेत फिरत होते, इतके मोठमोठे शेवाळे धरलेले मासे – कोण जाणे. जास्त वेळ यांना पाहिले तर एखाद दिवशी मासे खाण्यावरून मन उडायचे.

तिथेच राहणारे पंडचे घाटावर स्नान करीत होते, गीता म्हणत होते, साबण लावून कपडेही धूत होते. साबण लावणे किंवा कपडे धुणे सर्वांना सक्त मना होते. काळ्या रंगाच्या बोर्डावर पांढऱ्या मोठ्या अक्षरांत झाडावर नोटीस लटकत होती. यात्रेकरूंच्या बाबतीत गंगेचे पाणी पवित्र राखण्याच्या कामी पंडचे फार दक्ष. त्या दिवशी हरिद्वारला स्नान करताना तोंडात पाणी घेऊन व्रजरमण चूळ भरीत होते. ते पाहून एक पंड्या ओरडत आला, तो म्हणाला, "तोंड धुवायचं असेल तर तांब्यात पाणी घेऊन घाटावर जाऊन तोंड धुवा. गंगामाईला अपवित्र का करता ?"

त्रिवेणी घाटावर श्रीरामचंद्राचे मंदिर आहे. सीता-उद्धारानंतर श्रीरामचंद्रादि चार भावांनी इथे येऊन तपस्या करून प्रायश्चित्त घेतले. युद्धामध्ये त्यांनी कित्येकांचे प्राण घेतले होते त्या पापाचे क्षालन केल्यावाचून त्यांचीसुद्धा सुटका नव्हती.

पुजाऱ्यांनी हातात प्रसाद दिला. छोट्या-छोट्या साखरफुटाण्यासारखा. जणू काही छोटी-छोटी हलकी मूठभर पांढरी फुलेच. या प्रकारची मिठाई इथे बाजारातसुद्धा

नेहमी दिसते. रंगी-बेरंगीसुद्धा करतात. लाल, पिवळा, जांभळा, पांढरा अशा निर-निराळ्या रंगाचे एकावर एक थर देऊन वाण्याच्या दुकानातील पिठाप्रमाणे टोपल्या भरून दुकानासमोर मांडून ठेवतात. दुरून असे वाटते की जणू नाना रंगी कापडाची एक एक उघडलेली छत्रीच.

मंदिराच्या आवारात पायऱ्यांनी घेरलेले एक कुंड होते. पाणी पुष्कळ खोल होते. काही माकडे शेवटच्या पायरीवर नुसती गिरक्या घेत होती. केव्हापासून मी पाहात होते. एकदम एका माकडाने पाण्यात ताडकन् उडी घेतली आणि ते सर्व अंग पाण्यात बुडवून इकडून तिकडे पोहू लागले.

माकडे पोहू शकतात ही तर फार गमतीची गोष्ट ! यापूर्वी कधी पाहिले नव्हते या थंडीत त्यांना थंडी वाजत नाही ?

जलस्पर्श करण्यासाठी रीतीप्रमाणे आक्का पाण्यात उतरल्या. मनातल्या मनात भीती वाटली कदाचित एवढ्यात त्या मला हाक मारतील. नाहीतर थोडे पाणी आणून माझ्या डोक्यावर थापतील. थंडगार पाणी डोक्यावरून अंगावर जेव्हा टपटप पडत राहते तेव्हा थंडीत काय ती अवस्था होते. कुठेही जा सर्व काही स्पर्श करणे, मस्तकी धारण करणे हे आक्कांना हवेच. त्या म्हणायच्या, 'मग आलो कशाला यात्रेला ?'

पाण्यात हात ठेवूनच आक्का ओरडून म्हणाल्या, "अरे, हे तर चांगलंच गरम आहे !"

त्यांचे बोलणे ऐकून आम्ही सर्वच तुरूतुरू खाली आलो. खरोखरच ते गरम पाण्याचे कुंड होते. म्हणूनच एवढ्या आरामात वानरे पोहत होती. जमले तर मीही पाण्यात उतरेन.

काठावरच्या अश्वत्थ वृक्षाची कितीतरी पाने पाण्यात पडली होती, काही कुजली होती. काही कुजण्याच्या बेताला आली होती, काही नुकतीच झरलेली एकदम ताजी दिसत होती.

पंड्यांनी डोळे वर करून हात वेळावून म्हटले, "हे गरम पाणी कुठून येतं ते कुणी सांगू शकत नाही—सबही भगवान की लीला हाय."

देवळाच्या बाहेर, रस्त्याच्या कडेने वटवृक्षाखाली इथे तिथे लहान लहान कुटीं-तून सर्वत्र साधू; अंगाला भस्म लावून, शिरी जटा बांधून सर्व बसले होते. वाटेने चालता चालताच पाहिले मी.

रस्त्याच्या बाजूलाच धुळीने भरलेल्या दोन नग्न मुलांबरोबर एक वृद्ध नग्न साधू खेळत होता. मोठा झाला होता घोडा आणि लहान त्याच्या पाठीवर बसणार होता.

त्या मुलाला ताठ होऊन उभे राहता येत नव्हते. तो पुन्हा पुन्हा पडत होता. साधू त्याला उचलून घोड्याच्या पाठीवर बसवीत होता व त्या पाठीवर बसलेल्या मुलाला वाकून स्वत: संभाळत होता. चार पायांवर घोडा चालला होता. घोडा हसत होता, स्वारही हसत होता, साधूसुद्धा खळाळून हसत होता. थोडा वेळ खेळून, खेळ सोडून देऊन लहान मुलासारखे डुलत डुलत दोन्ही हात झुलवत साधू आपल्याच तालात समोरच्या रस्त्याने निघाला.

दोनतीन वळणांनंतर भरतजींचे मंदिर होते. शशीमहाराज म्हणाले, 'भरतजींची मस्त जमीनदारी होती. तेच इथले राजे आणि इतर सर्वच प्रजा. स्वत: रामचंद्रसुद्धा.

भरतचा रंगसुद्धा रामाप्रमाणेच काळा होता. पांढरे फटफटित डोळे. एखादी नर्तकी नाचताना एकदम दोन्ही हातांनी घागऱ्याची दोन टोके डोक्यापर्यंत उचलून विशिष्ट डौलात उभी राहते तसाच भरताचा साज होता. चमकणारा घागरा पायाच्या तळापासून वरपर्यंत गेला होता. सर्वच सोन्यारुप्यांच्या जरीचे काम केलेला साज दर्शकांच्या मनात राजकीय ऐश्वर्याची जाणीव करून देत होता.

समोरच एका चारपायीवर ढीगभर चांदीची भांडी ठेवलेली होती – गडू, ताटे, तांब्या, वाटया. सोन्यासारखेसुद्धा काहीतरी चमचम करीत होते. आतमध्ये अंधार होता. उंच अशा स्टॅंडवर एक दिव्याची ज्योत शांतपणे तेवत होती. कठड्याने घेरलेला राजा दुरून स्पष्ट दिसत नव्हता.

देवळाला प्रदक्षिणा घालताना, बाहेरच्या भिंतींवर ठिकठिकाणी खोदलेल्या मूर्ती, पद्मलता व मोरांचे पिसारे दिसले. एके काळी ते दगडाचे देऊळ होते. आज ते झालर लावलेल्या जाड कापडांनी आच्छादून झकपक नवीन मंदिरात परिणत केले होते. मी पाहत होते आणि विचार करीत होते; पूर्वी जिथे गेले, जितकी देवळे पाहिली, ती सर्व बाहेरूनच नीट पाहिली. मोठ्या कष्टाने वहीत त्यांची चित्रे काढून ठेवली. त्यांची मोजमापे समजून घेण्यासाठी खूप डोके लढवले. या वेळी देवळात आले, एकेक मूर्ती पाहून डोके टेकीत टेकीत बाहेर जात होते. पिशवीतली वही पिशवीतच बंद होती, एकदासुद्धा उघडली नाही. मी एकदम थांबले. मी बरोबर करते का चूक करते मनात कलह माजला. पाय उचलून मी लगबगीने स्वत:ला गर्दीत घुसवून दिले.

साधुसंतांसाठी हृषीकेशला तीनचार सदावर्ते आहेत. बाराही महिने तो खुली असतात. पंजाबी धर्मशाळा, नेपाळी धर्मशाळा, बाबा कालो कांबळीवाला धर्मशाळा इ.

बाबा काली कांबळीवाल्याची धर्मशाळाच सर्वांत मोठी धर्मशाळा. प्रचंड मोठी धर्मशाळा, उत्तम व्यवस्था, धर्मशाळेच्या भोवती असंख्य खोल्या होत्या. अनेक साधू इथे राहात व शास्त्रांचे अध्ययन करीत.

वेळ झाली होती साडेदहाची. घोळक्या घोळक्यांनी साधू, संन्यासी, बैरागी येत होते आणि हळूहळू अंगणात दाटी होत होती. एका खोलीत पातळ आमटीचे हंडे आणि रोटयांच्या पराती भरल्या होत्या. या साधूसंन्याशांपैकी एकेक जण त्या खोलीच्या समोर जाऊन उभा राहत होता. कुणाच्या हातात खापरी, कुणाच्या हातात कमंडलू, कुणाच्या हातात मातीचे तसराळे, तर कुणाच्या हातात तांब्या होता. आठ आठ पोळया आणि दोन दोन डाव आमटी प्रत्येकाला वाटीत होते.

ही अशी गर्दी आणि हे इतके लोक—परंतु धक्काबुक्की नाही, आरडाओरड नाही, आनंद-उल्हास नाही, ज्याला काही हवे तो नामगान करीत येऊन उभा राही, जेवण घेऊन आला तसाच निघून जाई. एकतारी वाजवीत, नाचत एक बैरागी आत आला, जेवण घेऊन नाचत नाचतच बाहेर निघून गेला. जणू काही जेवण म्हणजे तेवढेच एक उद्दिष्ट नव्हते. 'भूक लागते जेवलं पाहिजे, म्हणून घेऊन जातो जेवण'—जणू सगळयांची हीच भावना होती.

इथे दोन वेळेला जेवणाची हीच व्यवस्था, त्यात आणखी फेरबदल नाही. पुष्कळ साधू फार दूर राहतात. फार दूरच्या जंगलातील गुहेत राहतात. त्यांना दोन वेळा येता येत नाही; सकाळचे जपजाप्य आटोपल्यावर ते एकदा बाहेर पडतात. पायी चालत चालत गंगेवर येतात. स्नान करून रोटया, वरण घेऊन परत जातात. सबंध दिवसाची त्यांची निश्चिती होते.

प्रत्येक थंडीत या धर्मशाळेतून साधूंना काळी कांबळी दिली जाते.

एका बाजूला धर्मशाळेची कचेरी होती. त्या खोलीत आणि व्हरांडयात दहा एक कर्मचारी लाल कापडाच्या बांधणी केलेल्या खातेवह्या घेऊन हिशोब करीत बसले होते. इथे रोजचा किती खर्च होतो काही कळत नाही. सध्याचे महन्तसुद्धा समोर बसले होते. निरनिराळया कामासंबंधी ते निर्णय देत होते. बाबा काली कांबळीवाल्याच्या अशाच धर्मशाळा हरिद्वारला ठिकठिकाणी आहेत.

बाबा काली कांबळीवाल्याबद्दल एक गोष्ट सांगतात — तपश्चर्या करून सिद्धी प्राप्त झाल्यावर ते कलकत्त्याला आले व गंगेच्या घाटावर बसून राहिले. एका शेठजीने त्यांना पाहिले, दिवसामागून दिवस जात होते. पण तो साधू काही त्या जागेवरून हालेना; आहार-निद्रासुद्धा तो विसरला. साधूला असे पाहून शेठजीच्या मनात

त्यांच्याविषयी भक्ती निर्माण झाली. एक दिवस काही फळे व मिठाई आणून त्यांनी साधूसमोर ठेवली. साधूने मानेनेच नको म्हटले. ते काही खाणार नव्हते. शेठजीने कळवळून विनंती केली, " कृपा करून थोडं तरी खा. " तेव्हा साधू म्हणाले, " एका अटीवर खाईन – तुम्ही मला एक लक्ष रुपये आणून द्या. "

शेठजी तयार झाले. एक लक्ष रुपये आणून त्यांनी साधूच्या हाती दिले.

काही लोक असेही म्हणतात की बाबा काली कांबळेवाला बंगाली होते. साधनेनंतर सिद्धी प्राप्त झाल्यावर कलकत्त्याला येऊन हॅरिसन रोडवरच्या वळणाजवळ गॅसच्या खांबाखाली ते उभे राहत. एक, दोन, तीन असे करीत करीत त्यांच्याभोवती लोकांची गर्दी जमायची, घोडे थांबायचे, गाड्या थांबायच्या, रस्त्यावरची सर्व रहदारी बंद पडायची, पोलीस येऊन मागे लागायचे पण साधू हलायचा नाही की ती गर्दी हटायची नाही. साधूंचे फक्त एक बोलणे होते, " जोपर्यंत माझ्या पायाशी एक लाख रुपये जमणार नाहीत तोपर्यंत मी असाच इथं उभा राहीन, एक पाऊल हलणार नाही. "

ते जाऊ दे. दोन गोष्टींपैकी कोणती का खरी असेना, एवढे मात्र खरे की एक लाख रुपये जमवून बाबा काली कांबळीवाल्यांनी जागोजाग साधूंसाठी धर्मशाळा उघडल्या. ते जेव्हा तपश्चर्या करीत होते तेव्हा त्यांना याच अडचणीचा अनुभव आला. तपस्येमध्ये मग्न असतानाही देहरक्षणासाठी अन्नपाणी व थंडीत वस्त्रप्रावरणांची साधूंना गरज असतेच. आणि या दोन गोष्टींशिवाय इतर ज्या अडचणी येतात त्यांमुळे तपस्येमध्ये विघ्ने निर्माण होतात. त्यासाठी साधूंना ज्यामुळे निश्चिंतपणे साधना, भजन करता येईल याची व्यवस्था करणे हेच पहिले काम होते. बाबा काली कांबळीवाल्यांचा संकल्प सफल झाला.

एक लक्ष रुपयांनी कामाला सुरुवात झाली. नंतर निरनिराळ्या ठिकाणांहून पाण्यासारखा पैसा येऊ लागला. अजूनही पैसा येतो. मोठमोठ्या धर्मशाळा सर्व नेहमीकरिता चालू झाल्या. ज्याला जी जागा आवडली ती पसंत करून साधू लोक गट करून निश्चिंतपणे येऊन तपस्येला बसले.

ते अंगावर काळे कांबळे घेत म्हणून त्यांचे नाव बाबा काली कांबळीवाला होते आणि म्हणूनच साधूंना काळी कांबळी देण्याचा या धर्मशाळेचा रिवाज होता.

शशीमहाराज म्हणाले, " आमची कुटी बघायची असेल तर चला. आणखीही पुष्कळांच्या कुटी तिथं आहेत. गेल्या वर्षी ऐंशी एक झोपड्या आग लागून भस्म झाल्या. त्याबरोबरच आमच्या मिशनच्यादेखील दोन झोपड्या जळाल्या. "

शहराच्या बाहेर पडलो आणि उतरणीवरच्या रस्त्याला आलो. थोडे पुढे जाताच लोकवस्ती मागे राहिली आणि आम्ही खुल्या मैदानात येऊन पोचलो. जितके पुढे जावे तितकी जमीन जास्तच उतरती वाटत होती.

शंकरचार्यांनी स्थापन केलेले एक शिवमंदिर येथे आहे. जणू काही जमिनीत खड्डा खणून त्यात मंदिर वसवले होते. दुरून पाहिले तर असे वाटते की मंदिराचे पांढरे शिखरच निराळे काढून आणून कुणीतरी हिरव्या गवतावर ठेवले आहे. शशीमहाराज म्हणाले, " चोवीस सालच्या पुरात सर्व बुडालं, घरं, दारं सर्व वाहून गेली. परंतु मंदिर मात्र जसंच्या तसंच राहिलं. जरासुद्धा इकडं तिकडं झालं नाही."

कुठेही मनुष्यवस्ती नव्हती. पायऱ्यांवरून पुष्कळसे खाली उतरून आम्ही शिवाच्या मूर्तीजवळ गेलो. बाहेरच्या उजेडातून आल्यामुळे सर्व अंधारच दिसत होता. डोळ्यां-पुढची अंधारी कमी झाल्यावर मी पाहिले, या चौकोनी जागेच्या एका कोपऱ्यात एक साधू डोळे बंद करून बसून एकचित्ताने जप करीत होता. कोण आला कोण गेला त्याचे कुठेच लक्ष नव्हते.

शंकराचार्यांनी दिशादिशांना स्वत:च्या हातांनी शिवमंदिरांची प्रतिष्ठापना केली होती. लोक म्हणतात, त्या मंदिरांपैकीच हे एक होते.

प्रत्येक पावलागणिक ठेचा खात होते. चहूकडे लहानमोठी खडी पसरलेली होती. असे वाटते सुकून गेलेल्या नदीचे हे पात्र असावे. तसेच असणार. मध्येमध्ये हिरव्या झाडाझुडुपांचा पट्टा होता. एका बाजूला एक जंगल होते. ते पुष्कळसे बाभुळवना-सारखे होते. छोटी छोटी पानं सुरू होतात न होतात तोच जणू हवेत विरून जात होती.

शशीमहाराज म्हणाले, " ती जंगली झाडं आहेत. आपोआपच येतात. उन्हाळ्या-मध्ये चांगला गारवा असतो तिथं."

इकडे जंगल, तिकडे पर्वत आणि मध्ये नदी, फारच विलोभनीय दृश्य !

काळ्या उंच पर्वतराईची जमिनीच्या उतरणीवर लांब सावली पडली होती. पर्वताच्या पायथ्याशी एक शांत जलधारा वाहत चालली होती. या प्रवाहाच्या काठी सावली असलेल्या मऊ जमिनीवर साधूंनी आपापली कुटी स्वत: बांधली होती. कुणी पेंढ्यांची, कुणी दगडांची, कुणी मातीच्या भिंती असलेली तर कुणी कडब्याच्या काड्या एकीस एक बांधून तयार केली होती.

पहिल्याने मला काही कळलेच नाही. बारीक लांब कडब्यासारखे काहीतरी दिसले म्हणून मी पुढे झाले. एका बाजूला छोटासा एक झापावजा दरवाजा होता. रांगत

रांगत कसेबसे एखाद्याला आत शिरता येण्याजोगा तो होता. आत अर्थातच हिंडणे, झोपणे शक्य नव्हते. झोपलं तरी गुडघे वाकवावे लागणार. शशीमहाराज म्हणाले, " या अशा कुटींना खर्च कमी येतो म्हणून पुष्कळ जण अशाच बांधतात व त्यांत राहतात. "

साधूंच्या व्यतिरिक्त इथे दुसऱ्या कुणाची वस्ती नव्हती. आपल्या घराचा झापा लावून बहुतेक सर्व साधूसुद्धा धर्मशाळेत गेलेले होते. सर्व कुटी लहान लहान होत्या. फारच सुबक वाटल्या त्या. फुरसतीच्या वेळी काहींनी पांढऱ्या मातीवर गेरूचा लेप चढवला होता. कुंपण असलेले अंगण लहान लहान गोटे ओळींनी लावून सजवले होते. खालल्या व्हरांड्याला लागून झेंडूच्या फुलांची झाडे लावली होती. कुठे कुठे दोनचार कण्हेरी, पळसाचीही झाडे दिसत होती. माणसाने कुठेही वस्ती करू दे त्याच्या मनाचे सौंदर्य आविष्कृत झाल्याशिवाय राहात नाही. मला इच्छा झाली व्हरांड्यांतील कण्हेरीच्या झिरझरित सावलीत बसावे आणि एक ओंजळभर नदीचे पाणी घेऊन ते डोळ्यांना, डोक्याला लावावे.

नदीचे नाव होते चंद्रभागा. ही नदी म्हणजे जणू काही एक सुशील कुमारी होती. एकाग्र मनाने साधूंची सेवा करीत होती.

रम्य परिसर. अतिशय मनोरम स्थळ, शांत, गंभीर. धरणीमाता इथे कानगोष्टी करते. वारा शांतपणे वाहतो. नदी निःशब्द वाहते. ज्याचे जे काम ते तो शांतपणे करतो. सारा दिगन्त स्तब्ध. तपश्चर्या करायला किती योग्य स्थान ! विराट पर्वतांचा प्रदेश. सारा निर्भय.

संसारातील हैदोसहल्ला सोडून अशा जागी येऊन एकाकी राहणे ही मनाची एक निराळीच हौस आहे. जे लोक इथे येऊन असे राहू शकतात त्यांच्याविषयी हेवा वाटतो. मन एकाग्र करायला हे एक खात्रीचे आश्रयस्थान आहे.

हृषीकेशपासून स्वर्गद्वार आणखी कित्येक मैल दूर. वाटेत एका पुलावरून जाता जाता शशीमहाराज म्हणाले, " चंद्रभागेला शांत म्हणतात – ती चंद्रभागा नव्हे. हतभागा. मोठी बंडखोर नदी आहे ती. एकाएकी केव्हा प्रक्षुब्ध होईल त्याला काही ताळमेळ नसतो. या पुलाच्या खाली वाळू, खडी पसरलेली कोरडी जमीन दिसते तिथं पूर्वी शहर होतं. कुठं गेलं ते सर्व, नावनिशाणीदेखील दिसत नाही त्याची. या

पाहा शहरातील विहिरी तेवढया मध्ये मध्ये राहिलेल्या दिसतात. पुराच्या पाण्यात बाकी सर्व काही धुऊन गेलं. "

" एके काळी याच एकेका विहिरीभोवती विटांची घरं, रस्ते होते. तीच जागा आता दगडधोंड्यांनी भरून रूक्ष खडबडित झाली आहे. "

एका जागी मिठाने भरलेल्या चामडयाच्या पिशव्या एकीवर एक ताडपत्रीखाली झाकून ठेवलेल्या होत्या. बकऱ्यांच्या पाठींवर या पिशव्या लादून इथले व्यापारी त्या पर्वतावर घेऊन जातात. कदाचित तशाच त्या वर नेता नेता इथे उतरवून ते विश्रांती घेत असतील. वाटोळया दगडांच्या गोटयांमधील फटीतून तोंड घालून गवताच्या शोधात बकऱ्यांचा कळप फिरत होता.

कित्येक कुष्ठरोग्यांनी गाडीभोवती गर्दी केली. त्यांच्या हातावर, नाकातोंडांवर माश्या भणभणत होत्या. त्यांना काहीतरी खायला विकत घेण्यासाठी पैसे पाहिजे होते. जवळच्याच एका डोंगरावर कुष्ठरोग्यांचा आश्रम होता. रस्त्यात येऊन अशी भीक मागायला त्यांना म्हणे परवानगी होती. त्यांच्या रोगट हातांवर दादांनी पैसे ठेवले. पैशाची मोड घ्यायला गेलो म्हणजे पुन्हा हेच पैसे दुकानदाराकडून आम्ही कदाचित घेऊ.

दादा म्हणाले, " कुष्ठरोग अशाने पसरत नाही. रक्तात दोष लागला तरच भीती, मी वैद्यकीय पुस्तकांत वाचलंय. "

गंगेच्या काठी गाडी थांबली. या बाजूला रामतीर्थ म्हणतात व त्या बाजूला स्वर्गद्वार. रामसाधू पंजाबी होते, लहान वयांतच त्यांना सिद्धी प्राप्त झाली होती. एकानंतर एक असा त्यांचा शिष्यगण वाढतच होता. ते सर्व शिष्य गुरूभोवतीच गर्दी करून राहात. लोकांचा सहवास गुरूला पसंत नव्हता. स्वतंत्रपणे राहावे असे त्यांना वाटे. परंतु ते संभवत नव्हते. शेवटी एक दिवस त्या लहान वयातच इथल्या उंच पर्वतशिखरावरून त्यांनी गंगेत उडी घेतली. त्यानंतर पुष्कळ वर्षांनी कोणीतरी इथे घाट बांधला रामसाधूच्या स्मृतिप्रीत्यर्थ, म्हणून याचं नाव रामतीर्थ.

रामतीर्थाला फक्त एकच होडी होती. याच होडीने दिवसभर यात्रेकरूंची ये-जा चालते. हीसुद्धा त्या बाबा काली कांबळीवाल्याची व्यवस्था.

होडीने नदी पार करून आम्ही स्वर्गद्वारला आलो. युधिष्ठिरादि पंच पांडव द्रौपदीला घेऊन या स्वर्गद्वारातून स्वर्गाच्या वाटेने गेले होते.

आक्का म्हणाल्या, " इतकी पवित्र ही जागा, शिवाय याच पुण्यभूमीत गंगेचा पृथ्वीवरील मातीला स्पर्श झालेला. तेव्हा इथं एखादी तरी बुडी मारल्याशिवाय कसं चालेल ? "

खरोखरच काय सुंदर रूप होते गंगेचे या ठिकाणी ! हास्य—उल्हासाला अंत नव्हता. हिरवट - निळी जलधारा वेगाने धावत जात होती, बेफाम गती, काय तो भारदार डौल, जणू काही त्या सर्वनाशी प्रेमाची तिला हाक ऐकू आली होती. ज्या हाकेच्या ओढीने लेक कलंकाची तमा न बाळगता बाहेर पडते, कुलवंताची ती हाक !

जंगलांतून लाकडे तोडून ती पाण्यात टाकली होती. याच लाकडांचे ढीग पाण्याच्या प्रवाहाबरोबर वाहात चालले होते. हीच लाकडे हरिद्वारला त्या कोरड्या पडलेल्या नाल्यात जमा करून ठेवतात. काही काही ठिकाणी पाण्याच्या भोवऱ्यात सापडून लाकडे एकाच जागी गिरक्या घेत होती. कुठेकुठे लाकूड दगडाला अडकायचे, त्याच्या मागे दुसरे अडकायचे, मधूनमधून सरकारी माणसे येऊन लांब वल्ह्याने खोचा मारून ती सोडवायचे. वाहात जाणाऱ्या लाकडाच्या ओंडक्यांवर पाणलाव्या पक्ष्यांचे थवेसुद्धा चालले होते. ओली लाकडं टोचन टोचून ते पक्षी काही तरी खात होते. काळ्या, पांढऱ्या पंखांचे हंस निळ्या गंगेत पोहत होते. दूर जाता जाता मध्येच वाटेत उतरले असावेत.

स्नान करून स्वर्गद्वाराच्या घाटावर आलो. घाटाच्या एका अंगाला शिवमंदिर होते आणि दुसऱ्या अंगाला नारायणाचे देऊळ होते. शिवाच्या डोक्यावर पाणी घालून, कपाळी प्रसादाचा कुंकुमतिलक लावून नारायणाच्या मंदिराशी आलो. पांढऱ्या शुभ्र दगडाची नारायणाची मूर्ती, ध्यानस्थ बुद्धदेवाप्रमाणे विराजमान झाली होती. बसण्याची ढब अगदी बुद्धदेवासारखी होती. ही नवीन धर्तीची मूर्ती होती. चेहेऱ्याची ठेवण फारच सुंदर होती.

फक्त एक मंदिर. जवळपास कोणी नव्हते. शांत हवा होती. नारायणाच्या मूर्ती-समोर भिंतीला पाठ टेकून आक्का बसल्या. मी उमगले, आता त्यांना वेळ लागणार.

हळूच पाय न वाजवता मी बाहेर आले. घरावरच्या मोठ्या खांबाला टेकून गंगेच्या समोरच मी बसले.

चोहो बाजूंनी निळी पर्वतांची रांग फिकट वाटत होती, जणू काही आताच उडून निळ्या आकाशी मिसळून जाईल. जळी, स्थळी, आकाशी सर्वत्र निळ्या रंगाचाच सडा. जणू काही शेवटी सर्व इथेच ओतून रिते केले होते. काय ती त्या निळ्या रंगाची बहार ! मन कसे व्याकुळ होत होते ! अंगावरचा पदर ओढून घेऊन दोन्ही हातांनी छातीवर घट्ट लपेटून घेतला.

" तू इथं आहेस होय ? तुला तिकडं शोधता शोधता डोळे पांढरे व्हायची वेळ आली. "

मी पाहिले, दादा समोर उभे होते. त्यांनी सांगितले, " तिकडं जरा पुढं गेल्यावर गीताभवन आहे, पाहण्यासारखं आहे. जाऊन पाहून ये, आम्ही आताच पाहून आलो. "

गंगेच्या त्या काठावरूनच मी पाहिला होता. प्रशस्त अशा पक्क्या घाटावर बांधलेला एक भव्य लाल प्रासाद.

मी जवळ जाऊन पाहिले, गीताभवनच्या सगळ्या भिंती भरलेल्या होत्या. सबंध गीता त्यांवर खोदून लिहिली होती. लाल सिमेंटच्या भिंतींवर पांढऱ्या रंगानं संस्कृत श्लोक खोदले होते – काय अपूर्व शोभा होती त्यांची ! त्यांच्या महत्त्वाप्रमाणे भाग करून वर खाली असे अथपासून इतिपर्यंत सर्व लिहिले होते. दुरून अद्भुत असा इफेक्ट येतो. माझ्या मनात आले, या इमारतीच्या कामासाठी किती कारागीर लागले असतील. पलीकडच्या तीरावरूनही तेच वाटले होते.

समोरच्या छप्पर असलेल्या लांब व्हरांड्यात भिंतीवर ओळीनं रंगित चित्रं लावली होती. गीतेतील वचनं त्यावर लिहिलेली होती. पातळ पत्र्यांवर तैलरंगांनी ती काढली होती. अजूनही ते काम चालू होते. कलकत्त्याहून सरकार नावाचे एक शिल्पी आपल्या मदतनीस छात्राला बरोबर घेऊन आले होते. ते एका खोलीत बसून काम करीत होते. तैलरंग वाळायला वेळ लागतो. एकदमच पाचसहा चित्रांना सुरुवात केली होती. एखादे वाळले होते, एखादे वाळत होते, एखाद्यावरचा रंग अगदीच कच्चा-ओला होता, या थंड जागी रंग वाळायला कमीत कमी पाच सहा दिवस लागतील, तैलरंगाची हीच तर कटकट आहे. एक रंग चांगला वाळेपर्यंत त्यावर दुसऱ्या रंगाचा हात देता येत नाही.

शशीमहाराज आले आणि त्यांनी तगादा लावला. ' गरुडाचे मंदिर ' पाहायला जायचे होते. त्यांच्याकडूनच गोष्ट ऐकली होती, तिथे वाटते एक झरा आहे. वरून झाडाची पानं पाण्यात पडतात आणि लगेच ' फॉसिल्स ' होऊन जातात. हे ऐकून मी हट्टच धरला – ' ते पाहिलंच पाहिजे. ' म्हणूनच घाई करीत ते म्हणाले, ' फार दूर जायला लागेल आणि पुन्हा संध्याकाळ होण्यापूर्वी परत यायला हवं. इथं उशीर केला तर कसं चालेल ? "

डोंगर उतरून दगडधोंडे पायाखाली तुडवीत उंचसखल रस्त्यावरून आम्ही चालू लागलो.

स्वर्गद्वाराला पक्क्या बांधलेल्या लहान लहान झोपड्या पुष्कळ होत्या. हृषीकेश-पेक्षा स्वर्गद्वार जास्तच निर्जन आहे. तिथे लोकवस्ती नाहीच म्हटले तरी चालेल.

एकान्तात ज्यांना साधना – तपश्चर्या – करायची असेल तेच फक्त इथे राहतात. बाबा काली कांबळीवाल्यांनी इथे शंभर एक पक्क्या झोपड्या तयार करून दिल्या होत्या. पक्क्या झोपड्या म्हणजे – एक छोटेसे खोपटे, कसेबसे निजता – उठता येण्याजोगे, अर्थात ज्यांना गुहेत बसून तपश्चर्या करावी लागते त्यांना याच्यापेक्षा मोठ्या जागेची गरजच काय ? जाताना वाटेत ध्यानस्थ बसलेले कितीतरी साधू दिसले. कुणी घरात अंधारात बसले होते, तर कुणी समोर धुनी पेटवून बसले होते. मोठमोठ्या जुन्या झाडाच्या सावलीखाली या झोपड्या होत्या. आंबराईच्या मध्ये मध्ये साधूंच्या झोपड्या, तपोवनातील ऋषिमुनींचे आश्रमच जणू वाऱ्याबरोबर वाहत आले होते. सीतेचा वनवासातील संसारच जणू काही. स्वच्छ, सुंदर अंगण. त्रिशूल, डमरू, झाडाच्या फांद्यांवर लटकत होते. काही साधू झऱ्याच्या प्रवाहात जेवणाची भांडी घासून, धुऊन ठेवीत होते, कुणी गंगेचे पाणी आणीत होते, कुणी लहानशा ओटीवर बसून आपल्याशीच नामस्मरण गुणगुणत बसले होते. हे एक निराळेच विश्व होते. कोणत्या सुखाच्या आशेने सोन्यासारखा संसार सोडून हा मातीचा संसार मांडून हे सर्व मग्न झाले होते – माझ्या मनात विचारचक्र सुरू झाले.

आक्का म्हणाल्या, " ज्या धनानं तुम्ही धनवान होऊन, रत्नाला रत्न मानीत नाही त्याबद्दलचं इंगित त्यांना कळलं असेल का ? दिसत नाही का, त्यांच्या चेहऱ्यांवर किती समाधान दिसतंय ते ? आणि आम्ही कशात किती सुख आहे हे पाहात, चिंता काळजी करीतच मरत असतो. कुणाला काही समजतंय कुठं ? "

मी मनातल्या मनात म्हणत होते,

" येनाहं नामृतास्यां किमहं तेन कुर्याम् "

याज्ञवल्क्य ऋषी संसार सोडून वनात जायला निघाले होते. पत्नीला नाना धन, रत्न, गायी दान करीत होते – ' हे घे, हे घे ! '

मैत्रेयीने विचारले, " हे घेऊन मी काय अमर होईन ? "

" नाही. "

" हे घेऊन ? "

" नाही. "

" हे घेऊन ? "

" नाही. "

" तर मग प्रभू, जे घेऊन मी अमर होणार नाही, ते घेऊन मी काय करू ? "

हा बद्रीकेदारचा रस्ता आहे, शशीमहाराजांनी दादांना समजावून सांगितले. ते म्हणाले, "पायी चालत जायचं तर या वाटेनंच जायला हवं."

इथून एकशेपासष्ट मैल दूर बद्रीकेदार आहे. त्या बाजूने देवप्रयागपर्यंत मोटरचा रस्ता आहे, आम्ही पुढे निघालो. इथले पाहाडी लोक गायी, घोडे घेऊन आमच्या पुढे निघून जात होते. पाठीवर मुले बांधून नेपाळी पतिपत्नी बिनतक्रार तरातरा बाजूने निघून जात होते. तरुण गृहिणी हसत हसत डोंगर ओलांडून अदृश्य होत होत्या. शहरातून बाजारहाट करून, डोक्यावर ओझे घेऊन पुरुष परतत होते. सर्वच येत होते, जात होते. वळणावर जातात न जातात तोच दृष्टिआड होत होते आणि आम्ही प्राणी आपले चालतच होतो. मी विचारायची, 'केव्हा संपणार ही वाट?' सबंध दिवसभर पायपीट झालेली आहे तेव्हा आता पाय आणखी चालत नाहीत. "अहो, शशीमहाराज आणखी किती दूर?"

शशीमहाराजांनी उडवाउडवी केली, "अकरा वर्षांपूर्वी आलो होतो मी. त्यामुळे गरुडमंदिर किती दूर आहे ते आठवत नाही नीट."

"अकरा वर्षांपूर्वी जे फार जवळ होतं ते कधी अकरा वर्षांनी दूर निघून जातं का?"

आक्का म्हणाल्या, "'फॉसिल' पाहण्याची काही गरज नाही, मागं फिरू या, चला. इतकं येऊन पुन्हा तितकंच मागं जायचं म्हणजे पाहाणं काहीच होणार नाही."

हा कसला आवाज ऐकू येत होता -- झर झर झर झर - झऱ्याचा तर आवाज नाही?

शशीमहाराज आवाजाच्या दिशेने धावले. त्यांच्या मागे आम्हीही धावलो- हाय रे, पर्वतावरील आवाज म्हणजे जणू काही मायाविनीची हाक! कुठे आहे, कोण आहे? मैल-फर्लांग पाहात होतो, चुकत होतो, परंतु जे शोधीत होतो ते कुठे मिळत होते?

मागे पुढे पावले टाकीत चालतच राहिलो, चालता चालता एकदा भानावर येऊन मी मान वर करून पाहिले, उजव्या बाजूच्या पर्वतावरून वळणे घेत घेत झरे वाहत येत होते.

शशीमहाराज म्हणाले, "जरा दूर आहेसं वाटतं. वर चढून जायला हवं."

"परंतु रस्ता दाखवणार कोण?"

गरुड मंदिराचा एक पंड्या म्हणाला, "सरळ वर चढून जा. तिथं एक महात्मा आहेत, त्यांना विचारलं तर ते वाट दाखवतील."

नाल्याच्या बाजूबाजूने आम्ही वर चढायला आरंभ केला. पुष्कळ चढून गेल्यावर पानांनी आच्छादित अशा एका उघड्या झोपडीत एक साधू दिसले. धुनी पेटवून ते बसले होते. शेजारी मोठा जाडा शास्त्रग्रंथ होता. वाळक्या काटक्यांवर जमिनी-पासून वर ठेवलेला होता तो. कमरेला जाड लोखंडी साखळी आणि त्याला कौपीन बांधलेली. साधू बोलत नव्हते, जागेवरून उठत नव्हते. त्यांची 'आकाश-वृत्ति' साधना होती. समोर जे पडेल तेच खायचे. जेवणासाठी कुठे फिरायचे नाही.

माझ्या मनात विचार आला, लोकवस्तीपासून दूर कुणाच्याही दृष्टीस पडण्याची शक्यता नाही, यात्रेकरूंना तरी कळणार कसे ? रोज खाण्याचे येणार तरी कुठून ? कोण जाणे ? झालं ! जास्त विचार करता आला नाही. विचार करून काही फाय-दाही नव्हता. हे रहस्य समजायला निराळेच सामर्थ्य असायला हवे.

छोटा अविनाश; पुष्कळ दिवसांत त्याची काही बातमी नव्हती. तो आमच्या अगदी जवळच राहायचा. शाळेत जायचा. 'आक्का, आक्का' म्हणून मला हाक मारायचा. माया जडली होती. एकाएकी तो बेपत्ता झाला. किती वर्षांनंतर त्या दिवशी तो हरिद्वारला दिसला. किती मोठा झाला होता आता-- चांगला तरुण, पण त्याचा तो कोवळा चेहेरा अजूनही तसाच होता. त्याने दीक्षा घेतली होती. एकान्तात राहून साधना-परमेश्वरभक्ती करतो तो. या वेळी त्याने 'आक्का' म्हणून मला हाक मारली नाही. आता सर्वच त्याच्या 'आई'. त्याने सांगितले 'आई म्हणजे एक आश्चर्यकारक अनुभव आहे. तिच्यावर विसंबून राहण्यात जी काय गोडी असते त्याची कल्पनाच करता येत नाही. मी माधुकरीवृत्तीनं डोंगरावर राहात होतो. दिवसातून एकदा खाली उतरायचं, 'नमो नारायण' असं म्हणून तीन घरांच्या दारांशी जाऊन उभा राहायचो. ज्या दिवशी जे मिळेल तेच खाऊन मी दिवस कंठीत असे. एक दिवस काहीच मिळालं नाही. फक्त एक दोन रोट्या. परत आलो आणि त्या दोन पोळ्या समोर ठेवून रडायला लागलो. इतकी भूक लागली होती आणि जेवढं मिळालं होतं तेवढं खाल्लं असतं तर भूक जास्तच बळावली असती. सबंध दिवसरात्र राहाणार तरी कसा ? त्याची लीला अगाध ! मी रडत होतो आणि विचार करीत होतो, अशा वेळी एक गुजराथी सद्गृहस्थ माझ्या जवळ येऊन म्हणाले, ब्रह्मचारीजी, कृपा करून आमच्याकडं या आणि भिक्षा मिळवून जा. या प्रांतात साधुसंन्यासींना जेवायला बोलावणं याला " भिक्षा मिळवणे' असं म्हणतात. हे गुजराथी गृहस्थ सहलीसाठी पर्वतावर आले होते. "

" त्या दिवशी रात्री पुन्हा एकदा रडलो, हे परमेश्वरा, मला काही कळत नाही आणि मी निष्कारण तुझा किती राग करतो. "

साधूंनी शशीमहाराजांना हाताने इशारा करून वाट दाखविली व पुढे जाण्यास सांगितले. झोपडीच्या जवळूनच वळसा घेऊन पाण्याचा नाला खाली गेला होता. म्हणजे हाच तर तो झरा ? झऱ्याची दिशा कळताच एका क्षणात शशीमहाराज अंतर्धान पावले. कुठे गेले. कुठे गेले म्हणून शोधाशोध केली. जंगलातून शशीमहाराजांची हाक ऐकू आली, ' इकडं या, हे बघून जा. '

आम्ही धावत गेलो. तो पूर्वीचाच झरा; पण इथे थोडासा रुंद झालेला, निर्मळ, स्वच्छ पाणी खळखळ वाहात चालले होते.

" ही पाहा. ही जी पानं पडली आहेत ती कशी थिजून गेली आहेत ?" असे म्हणून शशीमहाराजांनी पाण्यातून एक पान उचलले.

पाण्यात काय होते ते मला माहीत नाही. जिथून पाणी वाहात होते ती जागा अगदी खडकाळ होती, जणू काही सिमेंटनेच बांधून काढलेली. जितके पुढे जावे तितका तो झरा जास्तच पांढऱ्या शुभ्र दगडांचा वाटत होता. या झऱ्याचा उगम पर्वतशिखरावरच्या गहन जंगलात जाऊन पाहणे अशक्य होते, वाट अनिश्चित होती. त्या झऱ्याचाच ओढा वाहात येत होता. किती झाडांची, किती प्रकारची पाने त्यात सतत पडत होती. पाण्याच्या प्रवाहाबरोबर कित्येक वाहात जात होती; जी एकाला एक लागून अडकून राहातात ती पाण्याखाली थिजून दगडासारखी होतात. दोन्ही काठांवरची फर्न (नेचा) पाण्यामध्ये झुकली होती. मुळांजवळ काळा रंग असलेल्या या नेच्यांवर हिरवी पाने होती आणि पाण्यात होते पांढरे शुभ्र गोटे. त्या नेच्यांवर जणू काही कसले तरी कडक लेप चढले होते पण तरी झाडे मेली नव्हती. जंगली झेंडूंच्या झाडांच्या मुळांवर पाणी वाहात होते, मुळे गारठून दगड झाली होती, झाडाच्या शेंड्यावर दोन पिवळी फुले दिसत होती.

आपली सर्व शक्ती कामी लावीतच हे पाणी खाली उतरत होते. खाली फक्त एक कुंडभर साधे पाणी दिसते.

' फॉसिल ' (fossil) उचलून मी ओटीत भरली. अभिजितला दाखवायला हवीत ना, नाहीतर बापलेक दोघे मिळून आमचे बोलणे उडवून लावतील.

आक्का म्हणाल्या, " हीच तर गंगोत्री. कल्पना करा– गंगा अशीच धरणीवर उतरली आहे. " एवढे बोलून त्यांनी त्या ओढ्याचेच पाणी थोडेसे डोक्याला लावले.

इतक्यात शशीमहाराजांच्या चेहेऱ्यावर हसू खेळू लागले. माझा दांडगा उत्साह पाहून त्यांना आनंद वाटत होता. त्यांनी विचारले, " झालं ना ? आता बसला विश्वास ? आता चला परत फिरू या. "

उड्या मारीत मारीत खाली उतरले. आता थकवा मुळीच वाटत नव्हता. हसत, बोलत केव्हाच लक्ष्मणझूला ओलांडून या बाजूला आलो आणि मग मात्र हुश्श करून पुन्हा थांबलो.

लक्ष्मणझूल्याची इतर कितीतरी चित्रे पाहिली होती. दोरखंडाच्या या पुलावरून बकरीमेंढ्या जातानाची, खेचराच्या तोंडातील लगाम धरून लोक येतानाची, पाठीवर टोपल्यांची ओझी वाहाणाऱ्या कुलींची– कितीतरी चित्रे. दोन बाजूंना दोन उंच पर्वत आणि खाली खोल गंगेचा प्रवाह पाहून डोके फिरायला लागते. तोच पूल आम्ही सहज पार करून आलो.

शशीमहाराजांनी सांगितले, " पूर्वी या पुलावरून जाणं म्हणजे मरणच होतं. एका मारवाड्यानं पुष्कळ पैसा खर्च करून तो नुकताच बांधून काढला; म्हाताऱ्या आईला घेऊन तो बद्रीकेदारला जात होता. आई म्हणाली, " हा पूल मला पार करता यायचा नाही. तू पूल चांगला बांधून दे. तोपर्यंत मी या बाजूलाच राहीन." पूल होईल या आशेने सबंध वर्षभर या लक्ष्मणमंदिराच्या जवळच म्हातारी थांबली. पूल तयार झाला, तेव्हा ती बद्रीकेदारला गेली. "

लक्ष्मणमंदिर होते या तीरावर. ब्रह्महत्त्येचे प्रायश्चित घेण्यासाठी, एका पायावर उभे राहून लक्ष्मणने दोनशेबारा वर्षे इथे तपश्चर्या केली होती.

दादा म्हणाले, " नशीब, आजकाल कलियुगात तसे ब्राह्मण जन्माला येत नाहीत ! लक्ष्मणाचीच तशी दशा झाली तर आमचं काय झालं असतं ते विचार करूनच पाहा. "

लक्ष्मणाची मूर्ती पांढऱ्या दगडाची होती.

चार भावांपैकी तिघांना पाहिले, आता बाकी राहिला एक शत्रुघ्न.

पंड्या म्हणाला, " चला ना, ते पण दाखवतो. आणखी जरा पुढे गेल्यावर वाटेतच ते मंदिर लागेल. "

पाहिले – चार भावांपैकी तिघेही काळे होते. फक्त लक्ष्मण तेवढा गोरा होता.

व्रजरमण म्हणाले, " हे बरोबर दाखवलेले नाही. शत्रुघ्नसुद्धा गोरा होता. फक्त भरत श्रीरामचंद्राप्रमाणे श्यामल होता. "

हरिद्वारला परत आलो. कोणखळला जायला टॅक्सी तयार होईना. काहीतरी

टॅक्सची भानगड होती. वळणावर त्याने आम्हांला उतरवले आणि आश्वासन दिले, " जरा पुढं पायी गेलात की टांगा मिळेल. "

निरंजनी आखाड्यातून परत येत होतो. मध्यरात्र झालेली होती. गंगेच्या काठावर वटवृक्षातळी दाट अंधारात एक नागा संन्यासी पाठमोरा बसला होता. डाव्या हाताने त्याने तोंडातली बासरी धरली होती व उजव्या हाताने तो डमरू वाजवीत होता.

धुनीच्या उजेडात काहीतरी चकाकले – काय होते त्याच्या हातात घातलेले ? हातात सोन्याचे कडे घातलेला, त्या दिवसाचा ब्रह्मकुंडावरचा तोच तो नागा संन्यासी.

दोन खाटांच्या लांबीरुंदीचा भारतवर्षाचा नकाशा उघडून त्यावर दादा, आक्का आणि मी वाकलो होतो. एक एक जागा शोधून काढीत होतो, आणि लाल निळ्या पेन्सिलीने त्यावर खुणा करीत होतो. 'ब्रॅडशॉ' उघडून वेळ, अंतर, स्टेशन सर्व काही त्यांच्या काळ्या चामड्याच्या नोटबुकामध्ये दादा टिपून घेत होते.

कुम्भस्नान संपले आता देशपर्यटन.

आक्का म्हणाल्या, " एकदा बाहेर पडलोच आहोत तेव्हा सरळ काही परत जाणार नाही. दिल्लीला बाळ – धाकटा मुलगा–आहे त्याला भेटून पुढं मथुरा, वृंदावनला जाऊ. "

" वृंदावनला मात्र घाईगर्दी करून चालणार नाही. गिरिगोवर्धन, बरसाना, नन्दग्राम सर्व जवळ जवळच आहे. सारं हिंडून पाहिलं पाहिजे. "

दादा म्हणाले, " बरं. "

" वृंदावनाहून जयपूर, उदयपूर, चित्तोड–"

" चित्तोडला मात्र चांगलं राहिलं पाहिजे काही दिवस. "

दादा म्हणाले " राहू या. "

" पुष्कर–द्वारका हेसुद्धा मोठं तीर्थस्थानच. "

" कुम्भमेळ्यानंतरच लोक द्वारकेला जातील, त्याआधीच आपण जाऊन फिरून आलो तर ?"

दादा म्हणाले, " चला ".

" या प्रवासात अयोध्येलासुद्धा जावं म्हणते मी. "

" परतीच्या प्रवासात वाटेतच अयोध्या लागेल. तेव्हाच उतरून पाहता येईल, नाही का ?"

दादा म्हणाले, " उत्तम होईल."

" सकाळीच काय चाललंय तंबूत बसून," आत येता येताच शशीमहाराज म्हणाले. दीर्घ निःश्वास सोडून दादा उठून उभे राहिले. ते म्हणाले, " किती दूरपर्यंत जायची इच्छा आहे त्याचा हिशोब करून लिहूनच ठेवीत होतो. बायकांचं मन माहीत आहे ना ? ओढीत ओढीत शेवटी त्या कुठं नेऊन टाकतील, त्याचा काही नेम नाही. ठरल्याप्रमाणं वागणं तर कठीणच."

" तर मग ? परत केव्हा येणार ?"

" परतायचं कशाला ? स्नान तर झालंच आहे. आता देशपर्यटन करून घरी परत जाऊ."

" हे काय ? कुम्भमेळ्यासाठी आलात. कुम्भाचं स्नान करणार नाही ?"

" आँ," आक्का चमकल्या. त्यांनी विचारलं, " म्हणजे आता काय केलं ? स्नान नव्हे ते ?"

" स्नान तर होतंच परंतु ते कुम्भाचं नव्हे." शशीमहाराजांनी मान हालवली.

स्नान संपवून पदरी पुण्य गाठीस बांधून परतीच्या वाटेवर पाऊल ठेवणार; ठिकठिकाणी ' येत आहोत, येत आहोत ' अशी पत्रं पाठवलेली; अशा वेळी शशी-महाराज हे काय सांगत होते आम्हांला ?

मी म्हणाले, " आक्का, हे तुझ्या त्या रूपा मिस्त्रीसारखं झालेलं दिसतंय."

रूपा मिस्त्रीला वय झाल्यावर लिहायला शिकण्याची हौस वाटू लागली. कुठून तरी एक पाटी मिळवून खडूने त्यावर दोन्ही बाजूंना काहीतरी खरडून ती रोज एकदा आणून दाखवायची आणि विचारायची, " बाबू, पाहा ना, झालं की नाही लिहिणं ?" बाबू मान वेळावत – ' नाही. ' तोंड वाकडे करून रूपा मिस्त्री पाटी उलटीपालटी करायची, ती विचारायची, " इतकं पाटीवर लिहिलं यातलं एकही लिहिणं झालं नाही ?"

तंबूत बसून फक्त काथ्याकूट करीत होतो.

दादा म्हणाले, " तसं कधी झालंय ? हे पाहा ना वर्तमानपत्रातलं कात्रण ठेवलंय. वर्तमानपत्रात आलं होतं की १४ फेब्रुआरी, १८ मार्च आणि १३ एप्रिल या

तीन दिवशी तीर्थस्नान. यातलं कोणतंही एक केलं तरी झालं. गर्दी जमण्यापूर्वी स्नान आटपून परत जाऊ अशा विचारानंच तर सुरुवातीला आलो. हे बरोबर नसतं तर वर्तमानपत्रांत जाहिरात कशाला दिली असती ?"

ज्ञानमहाराजांना बोलावून आक्कांनी विचारले, "अहो आताचा जो योग गेला, तेव्हाचं स्नान म्हणजे कुम्भाचं स्नान ना ?"

आक्कांचा प्रश्न ऐकून ज्ञान महाराज हो हो हो करून हसायला लागले. त्यांनी सांगितले, "कुम्भयोग अजून लागलाच नाही. शिवरात्री आणि कुम्भ दोन्ही वेगळी."

हताश होऊन आक्का परत आल्या. मनातली शंका जाईना. पूर्णानंद, तत्त्वानंद, रघुवीरानंद, आत्मानंद जितके म्हणून स्वामी समोर भेटत होते त्यांना गाठून घाबरतच आक्का विचारीत होत्या, "कुम्भाचं पहिलं स्नान होऊन गेलं. होय ना ?"

त्यांना असे वाटायचे, कुणी चुकून तरी म्हणावे की, 'हो, ते कुम्भाचंच स्नान'. परंतु व्हायचे उलटेच. त्यांचा प्रश्न ऐकून ते हसत व पुढे निघून जात, जाता जाता पुन्हा मागे वळून पाहात व पुन्हा हसत.

आक्कांचे तोंड सुकून एवढेसे व्हायचे.

मी म्हणाले, "कोणत्या दिवशी कुठला योग हे तत्त्व बंगालमध्ये तरी सर्वांना माहीत असतं का ? त्यांना यातलं काही माहीत नसलं तर परत जायला काय हरकत आहे ? त्यांना माहीत असतं तर मात्र गोष्ट निराळी. कारण, कुम्भमेळ्याला जाऊन कुम्भस्नान न करताच परत आलो म्हणून बदनामी करतील ते."

दादा म्हणाले, "बरोबर आहे, कदाचित कुणाला माहीत नसेल. नाहीतर आपण त्याच देशातले असून ही चूक कशी केली ? कुणाला काही कळणार नाही. चला, परतच जाऊ." त्यांच्या बोलण्याला आक्कांची संमती आहे किंवा नाही हे पाहाण्यासाठी दादांनी आक्कांकडे पाहिले.

उद्विग्न चेहऱ्याने आक्कांनी मान हलवली, "उंहू, तसं कसं होईल ? कुम्भाचं स्नान हे पहिलं काम, देशपर्यटन हे दुसरं. आता तर पक्कं कळलं आहे की १८ मार्चला कुम्भयोग सुरू होतोय. १३ एप्रिलला त्याचा शेवट आहे. दुसऱ्या तारखेची गरज नाही. काय वाटेल ते करून १८ मार्चला कुम्भाचं स्नान करायलाच हवं."

"त्यानंतर इतक्या जागी हिंडायला वेळ मिळेल का ?" दादा काळजीत पडले.

"आजपासून १८ मार्च म्हणजे अजून तीन आठवड्यांचा अवकाश. एका जागी इतके दिवस बसून घालवण्यात काय फायदा ? इथं साधूसंतसुद्धा अजून तितकेसे

जमले नव्हते की त्यांना पाहाण्यात तरी दिवस जातील. त्यापेक्षा एवढया वेळात जितकं हिंडून येता येईल तितकं यावं."

दादा म्हणाले, "तर मग यादीतून अर्धीअधिक गावांची, धामांची नावं काढून टाका. फक्त मोजकी काही गावं ठेवा. नशिबी असलं तर बाकीची होतील पुन्हा कधी तरी दुसऱ्या खेपेला." दादांनी नोटबुक काढले आणि पुन्हा हिशोब करायला सुरुवात केली.

आंबराईतले बहुतेक सर्वच तंबू रिकामे होते. ओल्या जमिनीवर पसरलेल्या चटया उन्हात वाळवून गुंडाळून ठेवल्या होत्या. काही दिवसांनंतर त्या पुन्हा लागणारच होत्या. शिवरात्रीनिमित्त जे आले होते ते इतर तीर्थस्थाने पाहायला निघून गेले होते. मणिबहादुरसुद्धा वृंदावनला गेले होते. पौर्णिमेला आम्हीही तिथे जावे असे त्यांनी पुन्हा पुन्हा बजावून सांगितले होते.

शशीमहाराजांनी दुजोरा दिला, "जा, जा, जाऊन पाहून या, हरिद्वार ज्ञानाची जागा आहे आणि वृंदावन भक्तीची. तिथं भक्तिभाव मनात ठेवूनच सर्व काही पाहा. वृंदावन म्हणजे तपोभूमी. तीनशे वर्षांपूर्वी महाप्रभूंच्या शिष्यांनी तिथं तपस्येचा ओघ सुरू केला. आजही तो तसाच चालू आहे. सनातन गोस्वामींची जागा पाहून या. मनामध्ये त्यांची ती भावनाच सतत जागृत ठेवा. भक्तांनी इतकी घोर तपश्चर्या केली की खुद्द भगवान येऊन म्हणाले — "काय स्वयंपाक केलाय ! मीठच नाही. खाणार कसं ?" भक्तांनी सांगितलं, "जेवायचं तर जेवा, नाहीतर जेवू नका. आमच्याकडे जे आहे ते आम्ही दिलं." भक्ती खरी असेल तरच भक्त परमेश्वराला असं बोलू शकतो. अशी आहे वृंदावनाची महती. ती तपस्येवर आहे, मंदिरावर नाही."

जायचे नक्की झाले. दोलयात्रेला वृंदावनातच राहायचे. आयुष्यात किती दोल-पौर्णिमा आल्या-गेल्या, किती रंग खेळलो, किती रंग लावले, लावून घेतले, परंतु जीवनात रस घ्यायचे कुणाला कळले ? गुलाल माखलेली पांढरी जुईची फुले हातातून रस्त्यातल्या धुळीत पडतात. कृष्णाच्या दोलयात्रेत तो रंग कुठे जाऊन पोचतो तो या खेपेला पाहीन.

आक्का म्हणाल्या, "बद्रीकेदारला सरळ कसं जायचं ते शशीमहाराजांना विचारून वहीत नीट लिहून घ्या. या वेळी जाता आलं नाही तरी बद्रीनाथला आणखी एखाद वेळी जाणारच —"

ज्ञानमहाराज एकदा नव्हे आठनऊ वेळा निरनिराळ्या ऋतूंमध्ये बद्रीकेदारला

गेले होते. प्रत्येक जागेचे नाव, कुठे कोणत्या वस्तूची काय किंमत आहे, रात्री जेवणाची सोय कुठे चांगली आहे, हमालांनी काय सांगितले तर आपण काय ठरवायचे, सारे काही पोपटपंची केल्यासारखे ते व्यवस्थित सांगू शकतात.

आक्का म्हणाल्या, "बरं, असं ऐकलंय की बद्रीकेदारचा दरवाजा उघडतात तेव्हा सहा महिन्यांअगोदरची फुलं, वाती अगदी तशाच राहिलेल्या असतात? फुलं कदाचित बर्फामुळं ताजी राहात असतील परंतु वात कशी राहील ?"

ज्ञानमहाराजांनी सांगितले, "यात अशक्य काय आहे ? एकदा तिबेटला गेलो होतो. त्या वेळी एका मंदिरात पाहिलं होतं. पाच मण तूप मावेल असा एक दिवा सोन्याच्या खांबावर बसवलेला होता. वर सोन्याचंच झाकण अडकवलेलं होतं– थंडीमध्ये तूप गोठून मेणबत्तीसारखं होतं. दिवा तेवत राहायला काहीच अडचण येत नाही. बद्रीकेदारलाही तसंच होतं. बर्फ पडायला सुरुवात झाल्याबरोबर पुष्कळसं तूप ओतून पंडचे निघून जातात, वात तशीच जळत राहाते."

शेजारी बसून म्हाताऱ्या आजीबाई गोष्टी ऐकत होत्या. त्या म्हणाल्या, "हो, हो, असंच होतं, मीसुद्धा ऐकलंय आणि का होणार नाही ? ही सारी त्या परमेश्वराचीच इच्छा नाही का ?"

मानभूमहून ही वृद्धा कुंभस्नानासाठी आली होती. ती बालविधवा होती आणि शिवानंदमहाराजांची शिष्या होती. वडिलांनी कित्येक बिघे भातजमीन ठेवली होती. वर्षाचे भात विकून दोनशे रुपये घेऊन, फार लांबून ती इथे आली होती. तिने सांगितले, "परमेश्वराजवळ आले आहे त्यात गैरसोय कसली ?" फार देवभोळी, सरळ आणि विनयशील होती. पुरुष समोर दिसताच घुंघट ओढून घेत होती. फुसू फुसू बोलायची. संधी मिळताच बद्रीकेदारलाही जाऊन आली होती. तिने सांगितले, "पायींच गेले होते. पैसे किती लागतात ? मला तर पंचवीससुद्धा लागले नाहीत. आपली दोन कांबळी बखोटीला मारून निघाले प्रवासाला. बरोबर आणखी एक म्हातारी होती. तिला चालता येईना; ती कान्डीत बसली. "बाई ग ! काय तो त्रास कान्डीत ! टोपलीत बसवून टोपली पाठीवर घेऊन जातात. झलर, झलर, त्या हलण्यानं अंगाची हाडं खिळखिळी होऊन जातात."

'बुढी मा' म्हणूनच आम्ही तिला हाक मारीत होतो. तीन एक महिने इथं राहण्याची तिची इच्छा होती. ती नुसते विचारायची, "तुम्ही आणखी किती दिवस राहाणार ? सर्व तर निघून गेले, तुम्ही दोघी उरल्या आहात. तुम्ही निघून गेल्यावर मी स्वयंपाक घरात जेवायला जाणारच नाही. एकटी बाई माणूस, लाज वाटते, मी

आपली देवळात जाईन आणि प्रसाद घेऊन परत येईन. बरोबर घरचे पोहे, कुरमुरे, गूळ आहे. त्यातूनच थोडं थोडं खाईन. "

जवळच एका छोट्या तंबूत ती राहायची. रात्री दिवा-उजेडाचीही तिला गरज नव्हती, ती म्हणायची, " अंधारात चुपचाप चांगली राहते मी. "

म्हातारं माणूस — एकाएकी आजारी बिजारी पडली तर — स्वामीजींना तिची फार काळजी वाटायची. तिला तिच्या गावी एकदा पाठवले म्हणजे त्यांची काळजी दूर होईल.

हे ऐकून ' बुढीमा'ला धक्का बसायचा. ती म्हणायची, " किती आनंदात आहे मी इथं, दररोज किती आनंद मिळतो मला. परंतु स्वामीजी जेव्हा मला पाठवून द्यायच्या गोष्टी बोलतात – तेव्हा मला फार दुःख होतं. माझा हा सगळा आनंद दुःखात मिसळून जातो. साऱ्या आनंदावर विरजण पडतं. माझ्याकडं पैसे नाहीत म्हणूनच असं होतं असं मला वाटतं. "

मी विचारले, " पैसे असते तर जास्त काय झालं असतं ? "

" स्वामीजींना दिले असते. हल्लीच्या दिवसात जेवण द्यायला कमी का पैसे लागतात ? "

मी सांगितले, " तुम्ही त्या गोष्टीचा कशाला विचार करता ? जगात कोण कुणाला खायला घालतं ? सर्व काही देव करतो. "

" खरं सांगता ना तुम्ही ? पैशासाठी तर हे मला जायला सांगत नाहीत ना ? माझा चुकीचा समज झाला होता. तर मग आता तसा विचार करणार नाही. पाहा ना कशी सुखा-समाधानानं राहाते मी ! मनात आलं तर कधी ब्रह्मकुंडावर किंवा सतीघाटावर जाते, नाही तर जात नाही. मठाच्या घाटावरच गंगेत डुबकी घेऊन येते आणि मंदिरात देवदर्शन करून तंबूत बसून राहाते. शांतपणे जपतप करते. अशी शांत, एकांत कुटी कुणाला मिळते सांगा ? ' त्याच्या ' कृपेनंच तर ती मला मिळाली. आता ' त्यानं ' ठेवलं तर राहीन ' त्यानं ' पाठवून दिलं तर निघून जाईन. तेच बरोबर. उगीच वाईट वाटून घेणार नाही. "

हातात वेळ आहेच तेव्हा ऋषिकुल बघून आलेले बरे. गुरुकुल तर त्या दिवशी पाहिले. गुरुकुल, ब्रह्मचर्याश्रम आणि आर्य समाजाचे विश्वविद्यालयदेखील पाहिले. सुवर्णमहोत्सव होणार आहे, अनेक निमंत्रित व्यक्ती येणार आहेत. मोठा थाटा-माटाचा समारंभ होणार आहे. रस्ते, घाट यांची दुरुस्ती चालली आहे, मांडव

घालण्याचे काम सुरू आहे, प्रचंड कंपाउंड आहे; इकडची तिकडची सर्व जागा मिळून सतराशे बिघे जमीन होते.

उघडया अंगाने, फक्त लंगोट घालून ब्रह्मचारी मुले मोकळया मैदानात दबकून दबकून पळापळी करीत होते. डोक्यावरून आंघोळ करण्यासाठी आज प्रत्येकाला एक एक तांब्याभर गरम पाणी मिळणार होते. म्हणून आंघोळीच्या आधी हातपाय हलवून मोकळे करीत होते.

परीक्षा संपली होती. सुट्टी चालू होती. तरी कुणालाच घरी जायला मिळत नाही. इथे कित्येक वर्षांचे सलग असे सत्र असते. काही मुले बागेतला पाचोळा गोळा करीत होती. दुसरा एक गट खिडक्या, दारांना रंग लावीत होता. आणखी एक गट झोपण्याच्या खोलीची जमीन धुऊन स्वच्छ करीत होता. लाकडी तक्तावर बिछाने गुंडाळून ठेवलेले होते. डोक्याच्या बाजूला, वह्या, पुस्तके, कपडे ठेवण्यासाठी एक एक भिंतीतले कपाट होते. जेवणाच्या खोलीत ओळी ओळीने गोणपाट अंथरलेले होते. घंटा झाल्याबरोबर ताट, वाटी, भांडे घेऊन मुले जागेवर येऊन बसतील.

मोठया मुलांचेसुद्धा तीन विभाग आहेत——आयुर्वेद, आर्टस् आणि वेदविद्यालय. ' बिर्ला हॉल ', ' हवन मंदिर ' अशा कितीतरी टोलेजंग इमारती आहेत. नुसत्या गोशाळेसाठीच कुणी तरी बाहात्तर हजार रुपये देणगी दिली होती. गोशाळेचा दरवाजादेखील काय प्रेक्षणीय होता. जणू काही किल्ल्याचे सिंहद्वारच ! प्रत्येक विटेगणिक काय पैसा ओतला असेल.

फाटकाजवळच दुकान मांडून विक्री चालली होती. दंतमंजन, केसाचे तेल, अन्नपचनासाठी गोळया, इत्यादी आयुर्वेद विभागाने तयार केलेल्या नाना वस्तू होत्या.

सेवाश्रमच्या पूर्वेला ' गुरुकुल ' आणि पश्चिमेला ' ऋषिकुल ', दुर्गादत्त शर्मा आणि पंडित मालवीय हे दोघे या ऋषिकुलाचे संस्थापक होत. नियम, व्यवस्था, शिक्षण सर्व गुरुकुलाप्रमाणेच होते. परंतु आवारात शिरताच चोहोकडे कसे गलिच्छ वाटले. व्हरांडयामध्ये बालब्रह्मचारींचा गट स्तवन करीत उभा होता, कुणाच्या अंगावर कांबळे होते तर कुणी नुसता सोगा खोचून उभे होते. काहींनी गंजिफ्रॉक व पँट घातली होती. काहींचे अजून स्नानही झालेले नव्हते. व्हरांडयाच्या खाली नळाजवळ उभे राहून काहीजण अंगाला थबथबून तेल लावीत होते. मळके कपडे, फाटकी कांबळी, इकडे तिकडे पडलेल्या विटक्या सतरंज्या, माशांची भणभण जसा काही अगदी निर्वासितांचा तळच.

ऋषिकुलाजवळच श्रीगुरुमंडळ आश्रम होता. मी असे ऐकले आहे की इथे प्राचीन हरिवंश पोथीची हस्तलिखित प्रत आहे.

वेळ दुपारची होती. घर बंद करून चाव्या घेऊन चौकीदार निघून गेला होता. आम्ही सांगितले म्हणून एकजण चावीच्या शोधार्थ धावला.

आवारात नारायणाचे मंदिर होते. मंदिराच्या व्हरांड्यात आम्ही वाट पाहात उभे राहिलो.

व्हरांड्यात एका बाजूस रंगीबेरंगी झालर लावलेला, 'ग्रंथसाहेब' ठेवण्याचा पलंग होता – एक शीख महिला तिथे आली आणि गंगाजलाचा तांब्या बाजूला ठेवून पलंगावर बसली. गंगास्नान आटपून घरी परत जाताना वाटेत ती ग्रंथसाहेबातील दोन पाने डोळ्याखालून घालणार होती. फार अवाढव्य पुस्तक आहे. हे पुस्तक वाचणं हीच या लोकांची पूजाअर्चा, सर्व काही.

पोटावर घट्ट पट्टा बांधलेला, शर्टपँट घातलेला एक छोटासा मुलगा एकसारखा पुढे येत होता आणि अनोळखी चेहेरे पाहून मागे जात होता. कित्येकदा असे केल्यावर हळूच येऊन तो पलंगाच्या खाली शिरला व जमिनीवर हात फिरवून त्याने धूम ठोकली.

मी मुद्दाम वाकून पाहिले, एका जाड खांबाच्या आडोश्याला उभे राहून, इकडेतिकडे पाहून, धुळीने माखलेली छोटीशी मूठ त्याने शर्टाच्या आतून छातीवर व नंतर कपाळावर लावली.

चावीच्या शोधात जी मुले गेली होती ती परत आली व त्यांनी चावीचा मालक सापडत नसल्याचे सांगितले. कदाचित तो बाजारात गेला असेल किंवा गंगेच्या घाटावर! हरिवंश बघणे काही झाले नाही.

आज सर्वच बघून झाले. चण्डीपर्वत पाहिला. मनसादेवीच्या मंदिराला दुरूनच नमस्कार केला होता. इतक्या उंच पर्वतावर चढायला आक्कांना परवानगी नव्हती. दादांचेसुद्धा गुडघे दुखत होते. उंचसखल वाटेने चालताना त्यांना फार त्रास होतो. ढगांपर्यंत पोचलेल्या शिखराकडे एकवार पाहून त्यांनी नजर खाली केली होती. देवता दयाशील असतात, त्या नक्की क्षमा करतील हे मला माहीत होते.

बघायचे राहिले होते फक्त बिल्वकेश्वर. तेही आजच होऊन जाऊ दे. त्यात काय हरकत आहे?

भोलागिरी आश्रमाच्या उलट दिशेला बिल्वकेश्वर होता. रस्ता अगदी सरळ होता. मंदिरापर्यंत टांगा जायचा.

खाली उतरताच आधी कालभैरव होता. कालभैरव सोडून पुढे गेल्यावर बिल्वकेश्वर होता.

पाऊलवाट पांढऱ्या धुळीने भरलेली आणि वेडीवाकडी होती. त्याच वाटेने पुढे गेल्यावर पक्क्या बांधणीचे अंगण लागले. त्याच्या कडेला एक कडुनिंबाचे झाड आणि झाडाखाली बिल्वकेश्वर मंदिर.

अंगणात एका बाजूला पांढरे शुभ्र केस, व शुभ्र दाढीमिशा असलेले एक साधू-महाराज बसले होते. जणू पूर्वीच्या ऋषिमुनींचेच हुबेहूब चित्र ! समोर काही विद्यार्थ्यांना बसवून ते साधू त्यांना शास्त्र शिकवीत होते. पूर्वीसारखेच शिकून झाल्यावर ज्याची त्याची पुस्तके घेऊन शिष्य निघून गेले. नंतर आम्ही त्यांच्याजवळ जाऊन बसलो. बिल्वकेश्वराविषयी त्यांना माहिती विचारली.

त्यांनी सांगितले, " याची माहिती नाही तुम्हांला ? हेच स्वयंभू शिव; सती पार्वतीला त्यांनी इथंच दर्शन दिलं होतं. कडुनिंबाच्या जागी अगोदर बेलाचं झाड होतं. बिल्ववृक्षाखाली ते प्रकट झालं होतं म्हणून बिल्वकेश्वर हे नाम. "

म्हणजे या ठिकाणीच शिवाला पाहून सतीची ' न ययौ न तस्थौ ' अशी अवस्था झाली होती. छद्मवेशी शिवाच्या तोंडची व्यंगोक्ती ऐकून, तोंड फिरवून सती निघून जात होती. ज्याला पती म्हणून मिळवण्यासाठी एवढी महा कठीण तपस्या केली, त्याच शिवाची निंदा ऐकणे सतीला असह्य झाले.

सतीला परत जाताना पाहून शिवाने स्वतःचे खरे रूप धारण केले व तो म्हणाला " जाऊ नकोस, मी कोण आहे ते वळून पाहा ! "

शिवाला पाहून सतीची पुन्हा तीच अवस्था झाली – जाताही येत नव्हते, की थांबताही येत नव्हते.

बिल्वकेश्वराच्या जरा पुढेच सतीकुंड होते. दोन पर्वत बाजूंना आणि त्यांच्या-मध्ये हे कुंड होते. आता ते बांधून काढून विहिरीसारखे केले आहे.

पर्वतावर सुकलेल्या गवताचे चमकणारे गुच्छच्या गुच्छ लवून हेलकावे खात होते. कित्येक झाडांची मुळे नुसती इतस्ततः पसरली होती. जणू कशाला तरी धरून ठेवण्यासाठी ती काही शोधीत होती. वरच्या बाजूला फांद्या नव्हत्या, पाने नव्हती, उजेड, हवेची गरज नव्हती. दगडामधूनच रस शोषून घेण्यातच त्यांची सर्व शक्ती खर्ची पडत होती.

इथे येऊन उभे राहाताच पहाडावरील ओढ्यात पाण्यात आकंठ उभी राहून,

हातात जपमाळ घेऊन जप करणाऱ्या सतीचे नंददांनी काढलेले चित्र डोळ्यांसमोर तरंगू लागले. योग्य स्थानच तपस्या सफल करते.

सतीकुंडाला लागूनच जरा वरच्या बाजूला पर्वतावर एक छोटी गुहा होती. एक आख्यायिका सांगतात की भोलागिरी ज्या दिवशी प्रथम या गुहेत शिरले तेव्हा त्यांनी दिवा लावताच पाहिले, एक साप उजेड पाहून सरसर निघून जात होता. ' मत भागो बेटा ' असे म्हणून भोलागिरीने हातातला दिवा मालवून टाकला. ते जितके दिवस या गुहेत होते तितके दिवस त्यांनी पुन्हा दिवा म्हणून काही लावलाच नाही. अजूनही इथे नेहमी मोठ्ठा साप पाहायला मिळतो. डोंगरावर लाकूडतोडे जातायेता नेहमी त्याला पाहातात. कधीकधी बिल्वकेश्वराच्या अगदी अंगणापर्यंत जाऊन पोचतो.

गुहेत चढायला पायवाट होती, पायऱ्या नव्हत्या. अंग चोरून चढायला लागते. एवढ्यातच आम्हांला किती त्रास होतो ! आणि ते असेच दिवसांमागून दिवस वरखाली जाऱ्ये करायचे. दुर्गम अशी जागा ते मुद्दामच निवडून काढायचे.

सतीकुंडाच्या अलीकडे डोंगरावर घनदाट जगल होते. दोन पर्वतांमध्ये खाली दरीत स्त्रीपुरुष, मुलाबाळांनी भरलेल्या कितीतरी झोपड्या होत्या. जणू काही एकाएकीच वस्ती झाली होती आणि एक दिवस एकाएकीच ती नष्ट होणार होती. कसा हा अस्थिर विचार ! लांबट अंगणामध्ये लांबट शेगडीवर एका ओळीत हंडे ठेवलेले होते.

मी म्हटले, " आक्का, बघा, बघा, बघा, किती सुंदर व्यवस्था ! सर्वांचा मिळून स्वयंपाक करण्याची काय अद्भुत पद्धती ! नवीन प्रकार आहे. आपल्यालाही असं करता येईल. "

आक्कांना ओढून घेऊन मी तिथे गेले. जवळ जाऊन पाहिले, एकच नव्हे तर अशा पाचसहा लांब चुली या टोकापासून त्या टोकापर्यंत अंगणात होत्या. प्रत्येक चुलीवर तीन-तीन हंडे खळखळ उकळत होते. इतक्या हंड्यातला भात कितीतरी जण खातात !

लाकडे धगधगत होती. काही मागास स्त्रिया चुलीच्या दोन बाजूंनी वाळक्या काटक्यांचे लहान लहान तुकडे जुळवून हंड्यात टाकीत होत्या.

मी जास्तच जवळ गेले. भात नव्हता तो. उकळत्या पाण्यात हंडाभर लाकडाचे तुकडे शिजत होते. खैर(खदिर)तयार होत होते.

पर्वतावर जे जंगल होते तिथेच खैराची झाडे होती. तुकडे तुकडे करून पुरुष-

मंडळी लाकडे कापून देत होती व बायका पाठीवर ओझी घेऊन ती खाली आणून टाकीत होत्या. खैराच्या लाकडाचे ढीगच्या ढीग पडले होते. पाण्यात उकळून त्यांचा रस काढून घेतल्यावर ती उन्हात वाळवून पुन्हा जळणासाठी वापरता येतात. उकळत्या पाण्यात पुन्हा पाणी घालून हे लाकूड उकळलेले पाणी आटवून जो काढा उरतो तोच खैर. खैर तयार होताच हंडे उचलून झोपडीत नेऊन ठेवतात. एक थेंब इकडे तिकडे होऊ देत नाहीत. कडा पहारा असतो.

आईची आठवण झाली. थोडासा खैरा तिच्यासाठी नेता आला तर ? नाही तर, परत गेल्यावर तिला जर सांगितले की खैर करताना पाहून आले तर आई तोंड पाहील का माझं काही दिवस ? मी तिच्याशी बोलायला गेले तर उगीच या खोलीतून त्या खोलीत फिरत राहील, काही कारण नसता कोठीच्या खोलीत बाटल्या वगैरे इकडच्या तिकडे करील, कळशीतील मोहरी सुपात ओतून पुन्हा आणखी फटाफट पाखडत राहील. राग कमी झाल्यावर शेवटी ती म्हणेल, " चांगल्यापैकी खैर कित्येक दिवसांत मिळाला नाही. रेतीमाती मिसळलेला, तोदेखील पाच रुपये शेर मिळतो, तिथं कशी अस्सल वस्तू असेल, थोडी स्वस्तमुद्धा असेल ! थोडा आणला असतात तर काय बिघडलं असतं ?"

जमशेटपूरला गेलो तेव्हाची गोष्ट. काय तो आईचा राग ! ती म्हणायची लढाईचा बाजार. मच्छरदाणी बांधायला खिळा मिळत नाही. हे स्थान म्हणजे लोखंडाचं स्थान. आठवण ठेवून दोन खिळेसुद्धा आणायला हवेत."

आक्कांनी खैराची एक काटकी उचलली आणि खैराचे हंडे घेऊन जो माणूस जात होता त्याच्यामागे त्या घाईघाईने गेल्या, " ए बाबा, हामलोक बांगला मुलुक से आया. थोडा खयेर देखने के लिये दीजिये ।" असे म्हणून तिने हातातली काडी पुढे केली, तीवर त्या माणसाने थोडा खैर लावून द्यावा म्हणून.

तो माणूस धावत आत शिरला, " देखना हाय तो देख लो हियां से ।" असे म्हणून त्याने हात हंड्यांकडे दाखवला.

आक्कांचा विरस झाला. हातातली काटकी फेकून दिली, म्हणाल्या, " पाहिलंस, थोडासुद्धा दिला नाही, ताजा खैर कसा लागतो ते चाखून पाहिलं असतं. "

हळूहळू रस्त्यावर, घाटावर गर्दी वाढत होती. जवळपास खुली मैदाने जेवढी होती तिथे सकाळ-संध्याकाळ डेरे पडत होते.

कच्च्या लाकडाच्या फळ्या लावून दुकानदार त्यांच्या घरांचे व्हरांडे शक्य तितके मोठे करीत होते. लाकडी आणि दगडी कोळशाच्या वेगवेगळ्या शेगड्या घालीत होते. साधुसंतांसाठी अंतराअंतरांवर अन्नछत्रे उघडली जात होती. आता म्हणे खरी गर्दी. वृंदावनाला पण दोलपौर्णिमेनंतर घाईने सर्वच परत येतील. माझ्या मनात आले, आता ही अशी गर्दी तर मग काय होईल कळत नाही. एक मात्र बरे सर्व रस्ते गल्ल्या आधीपासूनच पाहून ठेवल्या होत्या. निदान हरवण्याची तरी भीती नव्हती.

हातात तांब्याचे कुलपात्र घेऊन हसत हसत एक पुजारी पुढे येऊन वाट अडवून उभा राहिला. सुंदर, रेखीव चेहेरा, मुंडण केलेले. भगवे वस्त्र परिधान केलेले; चांगला ओळखी ओळखीचा वाटला.

एकदम आठवण झाली – अरे, हे तर त्या दिवशी पाहिलेले गृहस्थ ! ज्यांच्या बागेत फुलांनी बहरलेली पपनसाची झाडे प्रथम पाहिली. परंतु कोण हे ? त्या दिवशी होता गृहस्थी वेश आणि आज साधूचा साज !

आजही आग्रहाने ते त्यांच्या बागेत घेऊन गेले. बागेतच एक लहानशी झोपडी त्यांचे निवासस्थान होती. चिकाचे पडदे लावलेले, अर्धवट अंधार असलेले ते एक घर होते. त्यांचे नाव होते प्रयागदास अवधूत. ते उदासी संप्रदायाचे होते. ब्रह्म-देशांत त्यांच्या वडिलांचा मोठा व्यापार होता. हा एकुलता एक मुलगा होता. एक-विसाव्या वर्षी घर सोडून ते तेवीस वर्षे सतत साधना करीत आले होते. आता बरेचसे संसारी झाले आहेत. वडिलांच्या संपत्तीने जमीनजुमला विकत घेऊन, बागबगीचा करून साधूंची सेवा करताहेत. रस्त्याच्या पलीकडे घराच्या अगदी समोर जी पडिक जमीन आहे तिथे ते अन्नछत्र उघडणार आहेत. शुभकार्याची सुरुवात म्हणून आज तिथे पूजा करून घरी परत येत होते, अशा वेळी वाटेत आमची भेट झाली. ते म्हणाले, 'वेळ मिळाला म्हणजे येत जा मधूनमधून.''

वळणावर पानांच्या दुकानामध्ये दुकानदार लहान मुलाला कडेवर घेऊन डोलवून डोलवून झोपवीत होता,

'जय हनुमान की वीर हनुमान,  
वीर हनुमान की जय हनुमान'

तिथून दोन आण्याचे विडे विकत घेतले. रात्री जेवणानंतर स्वयंपाकघरातून तंबूत

परत येत होतो. म्हाताऱ्या आजीबाई आक्कांना म्हणाल्या, " काय हो आई, मी रोज तुम्हांला पाहाते राणूमालासुद्धा पाहते, तुम्ही दोघी फार चांगल्या आहात. तुमचा मेहुणा कसा काय आहे ? "

हळूच हसत आक्का म्हणाल्या, " माझा मेहुणा पण फार चांगला आहे. "

आजीबाई म्हणाल्या, " तसं म्हणत नाही मी, मी विचारते त्यांना धर्मज्ञान आहे ना ?"

आक्का म्हणाल्या, " हो आहे की. "

" मग ते बरोबर आले नाहीत ?"

आक्का त्रासल्या होत्या. त्यांनी एक आवंढा गिळला, त्या म्हणाल्या, " नाही. ते आले असते, पण कामाचा व्याप होता. वेळ नव्हता–"

" नाही, नाही, तसं नाही मी विचारीत. " असे म्हणून आजीबाईंनी माझ्याकडे थोडा वेळ पाहिले आणि मग हलक्या आवाजात आक्कांना विचारले, " हे वय म्हणून विचारते. काही बिनसले नं तर नाही ना ?"

नव्या दिल्लीचं लोकांना काय आकर्षण वाटतं ते विचार करूनदेखील मला कळलं नाही. रंगित फुलांच्या झुडुपांनी घेरलेल्या विशाल वृक्षांच्या पहाऱ्यांत लॉन असलेल्या एक एक बंदीशाळाच जणू त्या. खिडकीतून शेजारच्या घरातील अंगणात मोलकरीण भांडी घासताना दिसत नाही की पाठभर ओल्या केसांतून बोटे फिरवून गच्चीतून केस वाळवताना शेजारची मुलगी दृष्टीस पडत नाही. भिंतीच्या पली-कडून सासूसुनांच्या भांडणाचा आवाज ऐकू येत नाही, की छकड्यांचा कानठळ्या बसवणारा खडखडाट, ट्रॅमबसची भकभक, फेरीवाल्यांच्या आरोळ्या ऐकू येत नाहीत. जातायेताना वाटेत शेकोटीभोवती बसलेले शेतकरी मजूरही कुठे काही दिसत नाहीत.

अंथरुणात पडून मनात विचार करीत होते आणि एकटक खिडकीकडे पाहात होते, तिथे अजून पहाटेचा प्रकाश दिसत नव्हता, आज झाले तरी काय ? कुणाचीच चाहूल लागत नव्हती. सेजोदीच्या (तिसऱ्या नंबरची बहीण) बागेतील मोठमोठ्या झाडांवर तर कितीतरी पक्षी राहतात, पहाट होते ना होते तो त्यांच्या आवाजाने झोप मोडते. ते पक्षी अजून का उठले नाहीत ? फक्त एक घुबड मधून मधून ओरडतेय–घूघू–घू, घूघू–घू.

सेजोदीची आई सांगते–'घुबडाच्या आवाजाने झोप येते' मी डोळे मिटून एकचित्ताने ऐकू लागले–घूघू-घू, घूघू–घू, ओः काय कटकट ! हृदयांतरीची सारी यंत्रणा जणू या हाकेने फिरायला लागते.

बिछाना सोडून मी बाहेर आले.

सभोवती सारे दुःख भरल्यागत वाटले.

पहाट होऊनही पहाट होत नव्हती, पक्षी उठूनमुद्धा गात नव्हते. सुगंधी फुलांच्या राशींनी बगीचा नुसता भरलेला पण एकाही मधमाशीचे गुणगणणे ऐकू येत नव्हते. फक्त काही छातारे (सात बहिणी Seven Sisters) पक्षी मैदानात उडत होते आणि गवतातले किडे वेचून खात होते. त्यांना जणू सुखदुःखांची काही जाणीवच नव्हती. त्यांच्याकडे चुकूनमुद्धा कुणी पाहत नाही. भुरकट रंगाचे पक्षी, गोल गोल आकाराचे पाहिले तर वीटच येतो. ना रूप, ना रंग, ना गुण, वसंत ऋतूतील नानाविध रंगांचे वैचित्र्य, नाना प्रकारच्या पक्ष्यांचा जलमा, या सर्व गोष्टींमध्ये छातान्यांना कुठे स्थान आहे ?

मला असे वाटते सर्वांचा अनादर व अवहेलना यांमुळे दूर झिडकारल्या गेल्या कारणांनी हे पक्षी आपापसांत मिळूनमिसळून राहात असावेत. थंडी, उन्हाळा, पाऊस, वसंत त्यांना काही नाही. दुःखांनी भीतीने ते गोंधळून जात नाहीत. सहामात जण मिळून थव्याथव्यांनी कानाकोपऱ्यात, अंधारात, दुर्लक्षित असे फिरतात. म्हणूनच इंग्रजी भाषेत Seven Sisters (सेव्हन सिस्टर्स) हे त्यांचे आणखी एक नाव आहे.

सात बहिणी, यांना कशाचा एवढा रुसवा की ज्यामुळे त्या इतक्या विरक्त होऊ शकल्या, रुसवा का आघात ?

एकाएकी मला पश्चात्ताप वाटू लागला. नकळत वरच्यावर मी किती चुका करते. इतके दिवस या सात बहिणींना वाईट नजरेनेच नाही का पाहिले ! स्वयंपाकघराच्या जवळच मळ्यातल्या पालक भाजीवर या जेव्हा झेप घेत तेव्हा 'दूर दूर' असे म्हणत हातात दगड, विटकर घेऊन त्यांना मारायला धावायची मी आणि आज या सात बहिणींविषयी मला प्रेम वाटू लागले ! या वेळेला योग्य अशाच या मैत्रिणी होत्या जणू, वाट पाहून पाहून इतक्या दिवसानंतर त्यांनी ओळख दिली होती.

सगळीकडे कसे कोंडल्यासारखे वाटत होते. घरात आणि बाहेर कशी स्तब्धता

पसरली होती. कुठे म्हणून एक हास्यलहरी नव्हती. मला माहीत होते, हे असे फार वेळ टिकणार नाही, पण या काही क्षणांतच किती या अपरिमित यातना.

इतका वेळ थेंब थेंब पाऊस पडत होता असे वाटते. केसांतून पाणी ओघळत होते. पातळ, शाल ओलसर लागत होती, खाली गवतावर पाण्याच्या थेंबाचे मोती दिसत होते. मन उल्हसित झाले.

अश्रुजलांनीच मनातला दु:खभार हलका करावा लागतो, त्याशिवाय दुसरा तरणोपाय नसतो. म्हणून म्हटले, " धरित्री रड, आणखीही रड, अश्रुजलानं सारं एकदा धुऊन टाक, तरच मग तोंडावर हसू फुटेल. नाहीतर हे असं आतल्याआत रडणं पाहून हृदयाला पीळ बसतो.

गावाहून पत्र आले. मधल्या बहिणीने लिहिले होते. सानूदिदीचे पती, धाकटया आत्याचे भाऊ भैरव नदीच्या पाण्यात वाहून गेले; अतसीचा भाचा किती लायक मुलगा होता.—विधवेचा एकमात्र आधार होता. तो आणि चार नंबरच्या सुनेची मुलगी राखी हिचा पती व मुलगा दोघेही गेले. कडेवरचे मूल फक्त दीड वर्षाचे होते. प्रोफेसर जावई बायको-मुलाला घेऊन जाण्यासाठी सुट्टीत घेऊन आले होते. पण भैरव पूल काही त्यांना ओलांडता आला नाही. आगगाडी थांबवून दरोडेखोरांनी सर्वांना मारून कापून खाली पाण्यात फेकून दिले.

कुणी वाचले नाही, कडेवरचं मूलसुद्धा ओढून घेतनं. अरे देवा ! त्याबरोबर राखीलासुद्धा का नाही मारून टाकलं ? हृदयावर मणाचं ओझं ठेवून जगण्यासाठी तिला का जिवंत ठेवलं ?

काय वाटेल ते चाललं सगळीकडे. प्राणाची जणू काही किंमतच नाही; कसेही करून प्राण घेतला की झाले, वर्तमानपत्र वाचायला भीती वाटते. पत्र आले तर ते उघडायला भय वाटते. वाटते खूप खूप दूर पळून जावं, जिथं काहीही कानावर येणार नाही, अशा जागी जावं. आतबाहेर तडफडत फिरत होते मी. बाहेर रस्त्यात, मैदानात डोके फिरायला लागते. दोन्ही हातांनी कान बंद करून घेते. प्रयत्नांची पराकाष्ठा करून डोळे बंद करून घेते. परंतु हाय ! सरळ येऊन आतल्या मनावरच तो आघात होतो. चुकवायचे तरी कसे ?

मी म्हटले, " चला, आक्का परत जाऊ या, आता आणखी यात्रा करीत हिंडायची इच्छा नाही. "

असे म्हणतात मन शांत, स्थिर करायलाच लोक तीर्थयात्रेला येतात मग घरातल्या कुणासाठीही मन असे कासावीस का होते ?

एकच उत्तर पुन्हा पुन्हा कानावर येते हीच तर माया आहे. ही मायाच तोडता आली पाहिजे तरच मुक्ती मिळेल.

तशी मुक्ती मला कशाला मिळायला हवी ? माझं भीरू मन मला विरोध करून दटावू लागलं "–चूप बस. जे कळत नाही ते बोलू नकोस."

माझ्या वैष्णव मैत्रिणीसाठी माझे मन व्याकुळ होत होते ती आता जवळ असती तर मला वाटत होते तिचे सर्व बोलणे चांगले समजले होते. तिचा मार्ग म्हणजे सूर्यप्रकाशात दिसलेला स्वच्छ मार्ग होता.

दुसरे काही नको, काही बोलायला नको; फक्त शेजारी बसून ती मैत्रीण गाणे म्हणाली असती तर मी डोळे बंद करून ऐकले असते. तिचे गाणे म्हणजेच तिच्या भावना तिच्या तोंडची भाषा होती.

इथे येण्यापूर्वी एका एकान्त दुपारी तिची-माझी भेट झाली होती.

चित्र काढता काढता मन कसे बेचैन झाले होते. हातातला ब्रश मी खाली जमिनीवर ठेवला अन बाहेर येऊन सीताफळाच्या झाडाखाली उभी राहिले. घराच्या मागचे शेणाने सारवलेले हे छोटेसे अंगण, हाच फुरसतीच्या वेळचा माझा विरंगुळा. अशा वेळी मी हिंडते, फिरते, दात कोरते आणि इथे तिथे बसून जमिनीवर हात फिरवते. शेणाने सारवलेली जमीन म्हणजे जणू काही लहानपणची आईची मांडीच.

कित्येक दिवसांपासून मी पाहात होते, मुकलेल्या फांदीसारखे कसलेसे एक झाड जमीन दुभंगून वर येत होते. त्याला पाने काही फुटत नव्हती. मुन्नी त्याच्यावरूनच शेणाचे पाणी खराटयाने खराखर फिरवायची. शेणमाती अंगावर सुकल्यामुळे ते रोपटे चांगले जाड झाले होते. वेडौल असे ते रोप, त्या दिवशी चाकूने त्याचे तुकडे तुकडे करून गटारांत फेकून दिले. पुन्हा पाहिले तर तिथे लुकलुकित एक नवीन कोवळी फांदी आली होती; त्यावर काही लाल लाल पानेही होती, पण अजूनही ती पूर्णपणे उघडली नव्हती. मी वाकून पाहिले नवजात शिशूच्या इवल्याशा हाताच्या लाल बोटांची अग्रेच जणू ती––तीनच पाने होती. ते वेलाचे रोप होते. त्याची शक्ती अचाट होती. पायाखाली तुडवले, फांद्या तोडून फेकून दिल्या, मुळे

उपटून काढून टाकली, तरी मेले नाही. वसंताच्या आगमनाबरोबर त्याला एका बाजूला पालवी फुटली होती.

**" मरुनी न मरते सखी, असती या कैशा ज्वाळा**
**उचलुनी घाला कंठी, ही कंटकमाला. "**

गाण्याचे सूर ऐकून चमकून मी मागे वळून पाहिले. मैत्रीण कधी येऊन जवळ बसली होती ते कळलेसुद्धा नव्हते. गालातल्यागालात सखी हसत होती; तिच्या गालांवर नेहमी हसू असते. या हास्याची चिरधारा कुठल्या शिखरावरून तिच्याकडे येते हे जाणण्याची मला इच्छा होते. सखी हसत होती अन गात होती.

**" आकुल शरीर आज, व्याकुळ हे मन**
**मुरलीच्या मधुर सुरे तुटली ही बंधनं. "**

ठेंगणी-ठुसकी मैत्रीण माझी. तिच्या निरनिराळ्या वेळच्या बोलण्यावरून तिची मला हळूहळू ओळख होत होती. एके काळी प्रेमळ छत्र असलेल्या घरातली ती लाडकी लेक होती. परंतु त्यासाठी आज तिच्या मनात मुळीसुद्धा दुःख नव्हते. आपणहून कधी विचारायला गेलो आणि जास्त जाणून घेण्याची उत्सुकता दाखवली तर हसून सखी म्हणायची, " तो माझा पूर्वाश्रम. नाव काढायचं नाही. "

आता रमू विचारते, मामी तुमच्या मैत्रिणीची हौस तरी किती ? म्हातारी झाली तरी उत्साह नुसता ओसंडत असतो. पोरवयात कशी होती माहीत नाही. "

मीही त्याचाच विचार करते. छोट्या छोट्या पांढऱ्या केसांनी भरलेले, वपन केलेले डोके, जणू काही पावसाळ्यात फुललेले कदंबाचे फूलच. एकसुद्धा दात नव्हता तोंडात, चेहेरा सगळा सुरकुतलेला, तरी काय ते तिचे नाक, डोळे, काय ती त्यांची ठेवण ! पूर्वीचा तिचा तो चेहरा एकसारखा डोळ्यांसमोर येत राहतो. मी तिला विचारले होते, " सखे , आईवडलांचा सुखाचा आधार टाकून का निघून आलीस ? कोवळ्या वयात चूकच नाही का केलीस ? "

" चूक ! तू त्याला चूक म्हणतेस ? "

सखीचे हसरे मुख विषण्ण झाले. कपाळावरच्या काळ्या भुवया वर झाल्या. दोन्ही डोळ्यांत दोन ज्योती तेवू लागल्या. त्याच ज्योतीचा प्रकाश माझ्या तोंडावर टाकीत सखीने गाणे सुरू केले –

**" प्रेम नोहे, प्रीत नोहे, बादरायण तंत्र ।**
**कृष्ण सर्प करिता दंश, त्यावर न चाले मंत्र ।। "**

आज एक काळ्या रंगाचा रास्ता मून नेसखी आली होती. ते पाहून मला हसू लपवता येईना, मी तिला म्हटले, " छान शोभून दिसतेस हं. "

सखी म्हणाली, " घोष बाबूंच्या घरी धाकट्या मुलाचे लग्न होते. नवीन सुनेने मला ही साडी नेसवली. सगळ्या बायका माझा साज पाहून थट्टा करीत हसू लागल्या. मीही मनातल्या मनात हसत होते. तुला माहीत आहे – ज्या दिवशी त्यांचा हात धरून मी बाहेर पडले त्या दिवशी माझ्या अंगावर पांढरा रास्ता होता आणि आज –

**" काळे फासुनी सर्वांगाला कलंकिता झाले ।**
**कृष्ण वधूला हृदयि झाकोनिया ठेवियेले ।। "**

गात गातच काळ्या साडीचा पदर ओढून तिने अंगाभोवती लपेटून घेतला. मी विचारले, " तुला त्यांचा कधीही राग आला नाही ? तुला असं टाकून निघून गेले ते? "

दीर्घ निःश्वास घेऊन ती म्हणाली, " मी खोटं सांगणार नाही. स्वतः उगीच मोठे-पणा घेणार नाही. नाही कसा ? आला होता. खूप राग आला होता. त्यांना जितकं जास्त दुःख, तितका माझा रुसवाही जास्त. आणि या सर्वाच्या वरताण म्हणजे मनात शतपटीनं जास्त मरणान्तिक तिरस्कार उत्पन्न झाला होता. त्या तिरस्काराच्या आगीनं सारं हृदय जळून खाक झालं. "

" असं पाहा, जवळचं माणूस दूर गेलं की त्याला धरून ठेवण्याचा प्रयत्न करण्या-इतका दुसरा मूर्खपणा नाही. "

सखी गप्प झाली. दोन्ही हातांनी डोळे झाकून बसून राहिली.

सखी पुढे सांगू लागली, " दिवस जात होते. आग वाढत होती. सहन होईना अगदी. आग कशी थंड करू ? कोणत्या विहिरीचं पाणी आणून ओतू ? जमिनीवर लोळण घेत होते, थंड जमिनीवर छाती टेकून पडत होते, पण शांती मिळत नव्हती. अजिबात शांती नव्हती. वेड लागेल की काय ? असं वाटायला लागलं होतं. खरोखर यापेक्षा वेड लागलेलंच बरं, पण ते तरी कुठं होत होतं ? दोन डोळ्यांतील जल-धारांनी धुळीचासुद्धा चिखल होत होता. "

" मी विचार केला, एक दिवस तो परम निष्ठुरच तर माझ्या नजरेला अति सुंदर वाटला होता. त्या सुंदर पुरुषाच्या हाताच्या मिठीमध्ये मी स्वतःला भाग्यवान समजले होते. त्याच्या छातीवर डोकं ठेवून मला स्वर्गसुख तुच्छ वाटलं होतं. तेव्हा आमच्या प्रेमात तसूभरसुद्धा भेसळ नव्हती. एक टिपूससुद्धा खोटेपणा नव्हता. म्हणून तेव्हाचा तोच क्षण मी हृदयात जतन करून का ठेवू नये ? "

" ज्या दिवशी मला हे सत्य गवसलं त्या दिवशी मी बचावले, काय तो आनंद! ज्या सागराच्या किनाऱ्यावर पुन्हा वसतिस्थान करायचं म्हणून बसून राहिले होते त्याच सागराच्या लाटांवर मान-अभिमान, घृणा-राग सर्व सोडून देऊन हात तोंड धुऊन वर निघून आले. घरी येऊन देवासमोर पणती लावून देवाच्या चेहेऱ्याजवळ धरली. मी पाहिला तो चेहरा आणि हा चेहेरा आज एकजीव होऊन गेला होता. तेव्हा मी कधीही रडले नाही. कशाला रडू –

**" चण्डीदास म्हणे ढाळिता अश्रु कशासाठी ।**
**तो कृष्ण कन्हैया तुमच्या वसतसे हृदयी ॥ "**

सेजोदीने येऊन विचारले, " चला त्या दिवसाचा टूम्ब (Tomb) पाहायला जायचं ? बारा मैल लांब ड्राईव्ह, छान वाटेल. "

मी म्हणाले, " नको ग सेजोदी, आज मन लागत नाही. "

" तर मग बिर्ला मंदिराला चलतेस. आईसुद्धा जायचं म्हणाल्या होत्या. दाखवून आणू या. "

मागच्या खेपेलासुद्धा बिर्ला मंदिराला गेले होते. संगमरवरी दगडाचे विशाल मंदिर. दाराजवळच टोपल्या भरून ठेवलेल्या गुलाबांचा सुवास येत होता. दर्शना-साठी येणारे लोक पुडी विकत घेऊन आत जात होते. एकीमागून एक अशा पायऱ्या चढत होते. एका बाजूला वाघ, दुसरीकडे सिंह. कठड्यावर सोंडेला सोंड लावलेले हत्ती ओळीने होते. दारावरच्या कोनाड्यांतून पद्मकलिका झुलत होती. पांढऱ्या भिंतीवर रंगित आणि कोरीव अशी चित्रे होती. मधूनमधून पुराणगाथा लिहिलेल्या होत्या. पिवळ्या आणि काळ्या रंगाचे नक्षीदार दगडी कमळ जमिनीवर पसरले होते. मंदिराच्या सभोवार कालवा होता; पण तो कोरडा पडला होता. बागेत जांभई देत उभ्या असलेल्या वाघाच्या तोंडात गुहा दाखवली होती. शिवाय उंट, गेंडा, झरा, झुडुपांनी भरलेले जंगलही होते. झोपाळ्याच्या बाजूने पुढे जाऊन आलू छोले खाऊन जेव्हा बाहेर पडले तेव्हा लक्षात आले की, सर्व काही पाहिले परंतु मंदिरात देवदर्शनच नाही घेतले !

सेजोदीने विचारले, ' इतका कसला विचार करतेस ? जावंसं नाही वाटत का ? पूर्वी पाहिलं होतंस ? "

मी म्हणाले, " ते असू दे. चल, आणखी एकदा जाऊन पाहून येऊ या, कुठं काय काय आहे ते. "

मारवाडी, गुजराथी, पंजाबी, सिंधी, नेपाळी, उडिया, बंगाली सर्व प्रांतांतील सर्व यात्रेकरूंनी ठासून भरलेला आगगाडीचा लहान डबा पाहून मजा वाटत होती. सर्व-जण एकाच निमित्ताने निघाले होते, मथुरा-वृंदावनला, श्रीकृष्ण-लीलाभूमीच्या दर्शनाला. जणू काही नाना तऱ्हेचा साज करून एकाच कुटुंबातली मंडळी निघाली होती. एकमेकांविषयी सर्वांना सारखीच आपुलकी वाटत होती. ही तिचा मुलगा ओढून मांडीवर घेत होती. हा त्याला आपली जागा बसायला देत होता. पत्र्याच्या पेटचा, पितळी डबे उघडून एकमेकांना जेवण वाटून देऊन खात होते. मातीच्या खुज्यातील थंड पाण्याचा ग्लास घागरा घातलेल्या नववधूसमोर मलबारी प्रौढेने धरला. मराठी आईच्या कडेवरचे वर्षादीडवर्षाचे मूल सर्व लोकांपुढं हात करून म्हणत होते शेक अँड. आईमावशींची हसून हसून मुरकुंडी वळत होती. बाळाच्या तोंडचे बोल काका-मामांनी हौसेने शिकवलेले दिसत होते. उठून उठून सर्वचजण छोटासा हात हातात घेऊन शेकहँड करून येत होते. अशा गोड हाकेला न जुमानणे कुणाला तरी शक्य झाले असते का ?

आगगाडी मथुरेला थांबली. येथून वृंदावन तीनएक कोस अंतरावर. येण्या-जाण्यासाठी बस, मोटर, टांगा या वाहनांची सोय होती. आम्ही आधीपासूनच ठरवले होते की वृंदावन पाहून परत येताना वाटेत मथुरेला थोडे दिवस मुक्काम करायचा. या वाटेनेच परत जायचे होते. तेव्हा दूरचे आधी उरकलेले बरे.

स्टेशनवर उतरून हमालाच्या डोक्यावर सामान देऊन प्लॅटफॉर्मवरून आम्ही बाहेर आलो–– बापरे ! जणू गांधील माशांचे मोहोळ फुटले होते–– काही गाडी-वाले हमालांच्या डोक्यावरील पेटचा, बिछाने, आमच्या हातातला तांब्या, पिशवी, पुस्तके, गाठोडे जे मिळाले ते झडप मारून घेऊन दिसेनासेदेखील झाले ! सगळे कसे एकदम झाले. सर्व गमावून आम्ही रिकाम्या हातांनी रस्त्यातच हतबुद्ध होऊन उभे

राहिलो. आक्का म्हणाल्या, " याच्या त्याच्या तोंडाकडं काय पाहता ? शोधा लवकर. पाहा कुठं गेलं सर्व सामान-- एई कुली सामान उमान काहां गया ?" मूर्ख हमालाने हात उलटे करून माहीत नसल्याचे सुचवले.

'शोधा शोधा', 'पाहा पाहा' या कल्लोळात आम्ही सारे वेड्यासारखे धावत होतो.

आक्का म्हणाल्या, " हे काय. हे इथं आहे– वर, वर. हं. खाली– "

पार्वतीच्या शरीराच्या तुकड्याप्रमाणे आमचे सामान वेगवेगळे होऊन, एकेका टांग्यात विराजमान झालेले मी पाहात होते आणि गाडीवाला निश्चितपणे डाव्या हातात लगाम धरून आणि उजव्या हातात चाबूक घेऊन तयारीत बसला होता. आता निघाले की झाले.

ते सर्व सामान एका जागी गोळा करणे म्हणजे आणखी एक कामच होते. कुणी आपला हक्क सोडणार नव्हता. एका गाडीत टिफिन कॅरिअर ठेवला होता, म्हणजे टांग्यातच आम्ही बसायला पाहिजे. कुणाच्या टांग्यात पत्र्याची ट्रंक ठेवलेली होती. तो ती घट्ट धरून ठेवीत होता. त्या टांग्यात जर चढलो तरच स्वतःची ट्रंक परत मिळण्याची आशा. याप्रमाणे कुणी कंदील, कुणी बादली, कुणी करंडी दोन हातांनी घट्ट धरून बसून राहिला. उपायच नव्हता. त्रासामुळे थकवा आला होता. पायात उभे राहण्याची शक्ती नव्हती. असे वाटत होते की रस्त्यावर धुळीतच पाय पसरून बसकण घालावी.

शेवटी कुणी आणि कसे सर्व सामान एकत्र करून दोन टांग्यांत चढवले ते नीट आठवतच नाही. मला फक्त कळत होते की ट्रंकेवर दोन पाय ठेवून दोन्ही हातांनी जवळची गाठोडी पकडून आक्का आणि मी टांग्यात शेजारी शेजारी बसून वृंदावनाच्या रस्त्यावरून चाललो होतो. स्टेशन मागे टाकून पुष्कळ वेळ झाला होता.

पांढरट धुळीने भरलेला रस्ता, दोन्ही बाजूंना ओसाड मैदान, त्यात लहान मोठे पांढऱ्या मातीचे ढीग आणि जंगली काटेरी झुडपे. झाडाची हिरवी पाने धुळीमुळे धुळकट दिसत होती. रस्त्याने बस, मोटर गेली की वादळासारखा धुळीचा लोट उठायचा. त्या धुळीमुळे रस्ता, गाडी, मनुष्य, झाडे, पाने, डोक्यावरचे आकाश सर्व काही झाकले जायचे. बराच वेळ डोळे, नाक बंद करून राहावे लागत होते. ज्याला जास्त वेळ प्राणायाम करता यायचा त्याचीच तेवढी धडगत होती.

आक्का म्हणाल्या, "हीच व्रजरजः. याच रजांमध्ये महाप्रभू चैतन्यांनी लोळण घेतली होती."

एकाच वाटेने गटागटांनी यात्रेकरू येत होते. गटागटांनी परत जात होते. जणू काही अहोरात्र उत्सवाचे आमंत्रण होते. लोकांच्या येण्याजाण्यात खंड म्हणून नव्हता.

कितीतरी मैदाने, देवळे, धर्मशाळा मागे टाकून एकदा वृंदावनात येऊन पोचलो. दारात पान चघळत पंड्ये बसले होते. ते बघतच होते– कुणाला धरायचे, कुणाला पकडायचे.

कौपीन घातलेली लहान मुलांची टोळकी रस्त्याच्या कडेला लाकडी आरसा डाव्या हातात धरून टिळा लावीत होती.

बंगाली वैष्णवी हातात जपमाळेची पिशवी घेऊन घाईघाईने दाटी करून चालल्या होत्या–म्हाताऱ्या, तरुणी–सर्व बरोबरच.

गाडी गल्लीतून चालली होती. घरासमोरील छोटया अंगणात मोर, पारवे, कावळे, साळुंकी, पोपट यांचे थवे मिळून मिसळून दाणे वेचून खात होते. आजोबा व नातू फरसबंद व्हरांड्यात बसून मूठ मूठ दाणे फेकीत होते.

रामकृष्ण आश्रमात पोचायला संध्याकाळ झाली. इथेसुद्धा कोणखलप्रमाणेच हॉस्पिटलसंबंधीच यांचे काम होते. आजाऱ्यांची सेवा करण्यासाठीच हे होते. यांचे बोराचे झाड, बेलाचे झाड, भाजीचा मळा, विहिरीचे पाणी, स्वयंपाकघर, झोपायची खोली, मंदिर सर्व काही जणू सजवलेले घरच होते.

पौर्णिमा जवळ आली होती. मोठमोठ्या काळ्या झाडांच्या खालची पांढरी माती चांदणे पडल्यामुळे चकाकत होती. एकेका झाडाची खूण लक्षात ठेवून या चमकणाऱ्या प्रकाशात मी आपली एकटीच आपल्यातच दंग होऊन फिरत होते.

वाऱ्याबरोबर एक अपूर्व असा सुगंध आला. मन वेडावून गेले. मन भरून मी जोराचा श्वास घेतला. काय तो सौरभ ! त्या वासाने तन्मय होऊन डोळे मिटत होते. कोणते फूल ? ओळखीचे तर वाटते. पण ओळखता येत नाही. पुन्हा जोराचा श्वास घेतला–– हे तर अगदी आपले. अगदी जवळचे–– पण कुठे आहे ते ? जणू काही स्वतःच्या घरचीच सून पण अगदी सर्वसामान्य नव्हे, विशेष व्यक्तिमत्त्वाचे आवरण असलेली. हे झाड, ते झाड शोधले. या झाडाखाली, त्या झाडाखाली गेले. त्याच्या घन अंधकार असलेल्या कडेवर, काळे झाड मला ओढून जवळ घेत होते. परंतु कशाचाच पत्ता लागू देत नव्हते.

कुणाचा तरी जोराचा गुंजारव कानी आला; जणू काही पाण्याने भरलेल्या मेघांचा गुरुगुरु असा आवाजच; जणू दुथडी भरून वाहणाऱ्या नदीचा खळखळाट; जणू ओढयाची गर्जना, वज्राचा निनाद.

भीतभीतच मी पुढे गेले, चंद्रप्रकाशात हे काय अप्रतिम दृश्य! ज्योत्स्नेने भर-लेला यमुनेचा विराट, शुभ्र वालुकातट दिग्दिगन्तापर्यंत पसरला होता. आणि त्या प्रकाशात साधूंचा मेळा भरला होता.

वालुकामय विस्तीर्ण प्रदेश, जणू पद्मानदीच्या गढूळ पाण्याचा समुद्रच. समोर किनारा मुळीसुद्धा दिसत नव्हता. तिथेच असंख्य साधू निर्भयपणे, निश्चित उद्देशाने धुनीच्या क्षीण प्रकाशाचा आश्रय घेऊन बसले होते. मी स्तब्ध झाले. कसली ही जत्रा? कुठे जाऊन पोचणार होते ते? यांना ऊन, वारा, पाऊस, तुफान कशाची तमा नाही. पाण्याच्या प्रवाहाच्या मुखाशी परम निष्ठेने त्यांनी नौका सोडल्या होत्या. जणू काही आईच्या मांडीवरचे मूल आईच्या तोंडाकडे पाहात निर्भयपणे दूध पीत होते.

साधूंची धुनी, झोपडया लहान होत होत कुठपर्यंत गेल्या होत्या—त्या पलीकडे नजरेच्या आड विलीन झाल्या होत्या. या अशा रात्री, याच वेळी, अगदी याच क्षणी जावे, जवळ जाऊन पाहावे अशी इच्छा झाली.

आक्कांनी मोडता घातला. त्या म्हणाल्या, "इतक्या रात्री कुठं जाणार? उद्या पाहा."

उद्या दिवसाच्या उजेडात पाहीन ते निराळे दिसेल. पण आजचे हे पाहणे किंवा न पाहणे याचे स्वारस्य तेव्हापर्यंत राहणार नाही. स्वच्छ उजेडात यातल्या किती आणि कोणत्या गोष्टी पुसून जातील ते कळत नव्हते. पुन्हा शोधून त्या थोडयाच मिळणार होत्या?

मी म्हणाले, "आक्का, तसं केलं तर काही तरी गमावल्यासारखं होईल."

"बरं तर, विचार करून पाहाते."

आश्रमाचे रात्रीपुरते सर्व काम संपल्यावर या आश्रमाची जबाबदारी ज्याच्यावर होती ते म्हणाले, "तुम्ही जर जाणारच असाल तर या ब्रह्मचाऱ्याला बरोबर घ्या. रस्ता-वाट माहीत असलेले माणूस बरोबर असणे चांगले. शिवाय पलीकडे नागा साधूंची गर्दी आहे. ते फार रागीट असतात, माहीत आहे ना? बोलता बोलता मारामारी, कापाकापी सुरू करतात, नाना तऱ्हेची तीक्ष्ण हत्यारे त्यांच्याजवळ असतात. म्हणून या जत्रेनिमित्त यांना एका बाजूला जागा दिली आहे. त्या बाजूला जाऊ नका. त्यांच्या बाबतीत सावध असा."

धीर निघत नव्हता. नागा साधूंच्या भीतीने राखी रंगाच्या शालीने डोके, तोंड, अंग चांगले लपेटून घेतले. कोण आणि काय आहे ते समजणे आता शक्य नव्हते.

वाळूवर अनवाणी चालणेच सोयीचे, म्हणून घरात जोडे काढून ठेवून दाराला कुलूप लावून आम्ही निघालो. इतक्यात 'हां, हां' म्हणत स्वामीजी धावत आले; ते म्हणाले, "काय, करता काय? पायाला गारठा लागून आजारी पडाल ना, या वेळी वाळू किती थंड असते ते माहीत नाही का? थंडीने कुडकुडत बसाल. जसजशी दुपार होते तसतशी वाळू तापत जाते. तशीच दिवस मावळायला लागल्या-वर तितकीच थंड होत जाते."

नाइलाजाने पुन्हा मागे फिरून दार उघडून पायात जोडे घातले.

सेवाश्रमाच्या अगदी सीमेला लागूनच यमुनेच्या वाळूचा तट आहे, पूर्वी इथूनच यमुना वाहत जायची. आता सरकत सरकत दूर जाऊन ती कुठेतरी वाळूमध्ये गुप्त झाली आहे. चंद्रप्रकाशात सहजासहजी दिसत नाही.

किनाऱ्यावरून खाली उतरून वाळूच्या पात्रातून चालू लागलो, एक पाय वाळू-वरून उचलून व दुसरा पाय वाळूवर ठेवून. खरोखर, काय थंड! जोड्यावरच जेवढी म्हणून वाळू पायाला लागत होती तेवढ्यामुळेदेखील थंडीच्या रात्री अंग कसे शहारून निघत होते.

सुरुवातीलाच नागा संप्रदायाचे लोक दिसले. भीत भीत जरा दुरूनच चालत होतो आणि आडून आडून पाहात होतो.

बरेच साधू होते. कामात अगदी व्यग्र. कुणी धुनीवर भाकऱ्या शेकत होते, कुणी पितळी परातीत पीठ मळीत होते. कुणी या थंड वाळूवरच उघड्या अंगाने कोपरा-वर डोके ठेवून झोपले होते. काही जण गोलाकार बसून गप्पा मारीत होते. शास्त्रा-विषयी चर्चा चालली होती. कुणी कुणी जपमाळ काढून जवळच ध्यानस्थ बसले होते. एक दोन सुकलेल्या फांद्या मध्ये मध्ये वाळूत खुपसून ठेवल्या होत्या. कुणी साधूनीच आणून ठेवल्या असणार. फांदीवर झुलत होते त्यांचे कमंडलू, रुद्राक्षाच्या माळा, लाल कपड्यात बांधलेल्या छोट्या गीता; बुक शेल्फ, वॉर्डरोब, स्टॉकस्टँड, सर्व म्हणजे ही वाळकी फांदी, एक दिवस नाही, दोन दिवस नाही, वर्षामागून वर्षे अशीच जातात. घरादाराची काळजी नाही, सुखात, झोपेत व्यत्यय नाही. शिदोरीची कमतरता नाही, सर्व उत्तम आहे.

आक्का म्हणाल्या, "काय कळतंय आम्हांला! आमचं ज्ञान ते तरी किती?

नाहीतर आपण सांगू शकतो का कोणत्या शक्तिबलानं, कोणत्या ध्येयासाठी त्यांची ही खडतर तपस्या चालते ! मोठमोठे पंडितसुद्धा यांच्यामध्ये राख फासून बसून आहेत-आपण ओळखू शकतो का ? तेवढे सामर्थ्य आहे का आपल्यात ?"

किती अगणित साधुसंत इथे जमले होते. एकाच जागी त्यांना असे एकत्र पाहता येईल याची कल्पनाही कधी नव्हती. हीच तर खरी बघण्यासारखी गोष्ट. जे स्वतःच्या डोळयांनी पाहिल्याशिवाय कधी समजत नाही. हरिद्वारला मात्र असे पाहिले नाही. शहरात, गंगेच्या काठी, पर्वतावर सगळीकडे ते पसरलेले होते.

बरोबरचा ब्रह्मचारी म्हणाला, " तरी आता गर्दी कमी झाली आहे, याच्या पाच-सहा दिवस आधी आला असता तर गर्दी कशाला म्हणतात ते पाहायला मिळालं असतं. एकादशीची प्रदक्षिणा झाल्यावर शेकडचा-शेकडयांनी साधू हरिद्वारला जाऊ लागले आहेत."

नागासंप्रदायी साधूना सोडून आम्ही दुसऱ्या दलाजवळ आलो. हे लोकसुद्धा कपडे जास्त वापरीत नाहीत; तरी नागासारखे अगदीच विवस्त्र नाहीत. अर्थात वृंदावनाच्या नियमानुसार इथले नागादेखील बोटभर चिंधी लावून असतात. कुठून आणि केव्हा हा नियम झाला ते माहीत नाही.

नदीच्या या पात्रावरच जरा अंतराअंतरावर कूपनलिका, विजेच्या दिव्याच्या ओळी, रेडिओ आणि ध्वनिक्षेपक लावले होते. सर्व व्यवस्था सरकारतर्फे केली होती. रात्रंदिवस जागा स्वच्छ केली जात होती; पत्रावळी, फाटके कागद, शेंगांच्या पुडयांचे कागद सर्व झाडून मेहतर कचरा टोपलीत भरीत होते. त्याबरोबरच ध्वनिक्षेपकावर नामस्मरण, गीतापाठ चालू होता. देवाच्या मूर्ती बसवून अनेक संप्रदायांच्या महन्तांनी या जागी आपल्याला हवे तसे मोठमोठे तंबू, छावण्या चोहो-बाजूंना उभारल्या होत्या. मध्यभागी छत असलेला मांडव होता.

यांपैकीच एका मांडवांत रासलीला चालली होती, मी पाहिले प्रेक्षक म्हणजे सर्व भस्मचर्चित आणि डोक्यावर जाडजाड जटांची वेटोळी असलेले साधू होते.

लहान मुले राधाकृष्ण आणि अष्टसखी झाली होती. जर व खोटी कलाबूत लावलेला घागरा, ओढणी, काळीभोर पेडाची वेणी, नाकात लोलक, कपाळावर मुकुट, असा साज करून खुर्चीवर बसलेली राधा आणि तिच्या भोवताली अष्टसखी. सर्वजणी कृष्णविरहाने व्याकुळ झालेल्या होत्या. सर्वजणी एकमेकींच्या अंगावर अंग टाकून फक्त ' हाय कृष्णचंद्र ', ' हाय व्रजमाधव ', ' हाय गोपीरमण ', ' हाय प्राण-

वल्लभ ' असे म्हणून छाती फोडीत नि:श्वास टाकीत होत्या, आणि थांबून थांबून विलाप करीत होत्या.

त्या किती वेळ अशा रडू शकतात हे पाहण्याची उत्सुकता होती म्हणून उभ्या राहिलो—त्यांचा तो विलाप काही संपेना. या कंटाळवाण्या दु:खापासून तोंड वळवून मी इकडे तिकडे पाहिले. दुरूनसुद्धा जो तो आपल्या जागी बसल्या बसल्या पडून रासलीला पाहात होता. त्या वाटेने जाता येता कुणी त्यांच्या रासलीला बघण्यात बाध आणला तर त्या स्थितीतसुद्धा आरडाओरड करून त्यांना बाजूला करीत होते.

मांडवाच्या उजव्या बाजूला जरा अंतरावर आणखी एक जमाव होता. तिथे छातीवर ठासून पदके लावलेला, काळा वेस्टकोट घातलेला एक जादूगार बाणांचे खेळ करून दाखवीत होता. प्रेक्षकांमधूनच दोघे हसत येऊन मध्ये उभे राहिले. जादूगाराने सांगितल्याप्रमाणे दोन दगडांना दोरा बांधून दोन बाजूला उभे राहिले. रस्त्यात किंवा घाटावर भुले ज्याप्रमाणे दोरे काटतात त्याप्रमाणे हे दोघे दोऱ्याचे टोक हातात घट्ट धरून बांधलेला दगड हलवू लागले. जादूगाराने दुरूनच बाण मारून एकाच नेमात दोन्ही दोरे काटून टाकले.

हर्षध्वनी करून साधूंनी टाळ्या वाजवल्या. ' वाहवा ' ' वाहवा 'चा आवाज निनादला.

आता या वेळी एका छत्रीच्या चार बाजूंना चार धाग्याना चार दगड बांधून ते लोंबकळत ठेवले. छत्रीचा दांडा धरून एकजण ती डोक्यावर फिरवीत राहिला. ते दगडही त्याच्या भोवती फिरू लागले. जादूगार एका नेमात चारी धागे एकदम कापणार होता.

गोपींचा विलाप संपला होता. त्या सर्व गळ्यात गळा घालून हलत डुलत निघून गेल्या. विरहाच्या यातनामुळे कुणाला सरळ ताठ उभे राहता येणे शक्य आहे का? गोपी गेल्याबरोबर हातात बासरी घेऊन कृष्ण आला.

मथुरेचा राजा होऊनही कृष्ण सुखात नव्हता. कसले तरी दु:ख त्याला कासावीस करीत होते. सिंहासनावर कृष्णाने जी एकदा मान खाली घातली ती तो काही केल्या वर उचलीचना. दरबारातील शेकडो विनंत्या, विनवण्या फुकट गेल्या. पुष्कळ वेळ असाच गेल्यावर कृष्णाने उद्धवास बोलावून आणण्याचा आदेश दिला.

आक्का म्हणाल्या, " चला, चला, आणखी काय पाहायचंय ? "

मी सांगितले, " उद्धवाला कोणत्या महत्त्वाच्या कामासाठी बोलावलं ते एकदा पाहून जाऊ या. आणखी थोडा वेळ थांबा. "

आरडाओरड करून सभेमधूनच उद्धवाला त्याचे अनुयायी हाका मारू लागले. थंडीच्या रात्री पाय मुडपून ते सर्व बसले होते. पुन्हा पुन्हा उठणे त्यांना कसे शक्य होते ?

धोतराच्या सोग्याच्या टोकाने तोंड पुशीत पुशीत उद्धव येऊन हजर झाला. अधोवदन कृष्णाला पाहून त्याची हनुवटी हलवून त्याने विचारले, " कशाला बोलावलंस, काय झालं ? "

रडत रडत कृष्ण म्हणाला, " मला गोकुळची आठवण येते. "

उद्धव म्हणाला, "हरी को गोकुल की इयाद आयि है; और किसी की इयाद आयि है ? "

रडू काही थांबेना, कृष्ण म्हणाला, " व्रजाची आठवण येतेय. "

उद्धवने विचारले, " व्रजको इयाद आयि है, औंर किसी की इयाद आयि है ? "

कृष्णाची मान दुःखभाराने खाली जाता जाता अगदी छातीजवळ येऊन ठेपली. कृष्ण जितक्या वेळा म्हणायचा की, "मला लोण्याची आठवण येते, दह्याची आठवण येते, यशोदा आईची आठवण येते, नंद बाबांची आठवण येते." तितक्या वेळा उद्धव पुन्हा तेच विचारायचा. " आऊर किसी की इयाद आयि है ? "

इतक्या खोचक बोलण्याने कृष्णाला स्वस्थ बसवेना. दोन्ही हातांनी उद्धवला मिठी मारून तो ढसाढसा रडू लागला. खरे म्हणजे त्याला गोपींची आठवण होत होती. काय ते रडणे ! डोळ्याच्या पाण्याला खळ म्हणून नव्हता. दर्शकांमधून एकाने लाल पंचा तिकडे फेकला. त्याच पंचाने उद्धव कृष्णाचे डोळे पुसू लागला व त्याच्या छाती-पाठींवरून हात फिरवून त्याचे सांत्वन करू लागला. कृष्ण आक्रोश करून रडत होता आणि हुमसून हुमसून रडता रडता हाक मारून गात होता –

**" ऊधो भइयारे तुम व्रजको गमन करो ।**
**मेरे विना राधिका, गोपिका, तिनके दुःख हरो ऊधो ।। भइयारे. " ।**

तोंडाला पदर लावून मी ' ही ही ' करून हसणार इतक्यात एकदम थांबले. अनपेक्षितपणे कुठून तरी जणू चाबकाचा फटकाच बसला गालावर.

थोडया दूर अंतरावर अंधुक प्रकाशात खुंटाला टेकून एक अति जीर्ण झालेला वृद्ध यात्री बसला होता. त्याच्या अंगावर एक कांबळे होते व तो तोंड गुडघ्यात घालून

एका नजरेने रासलीला पाहात होता आणि त्याच्या क्षीण गालांवरून डोळ्यांतील अश्रुधारा वाहात होत्या.

मी म्हणाले, " चला आक्का, आता घरी जाऊ या."

"का ? तिकडं अजून पुष्कळ बघायचं राहिलंय ना."

मी म्हणाले, " राहू दे, उद्या पाहाता येईल."

पुन्हा ती वाळू तुडवीत किनाऱ्यावर आलो. सेवाश्रमचा दरवाजा उघडाच होता. मी मान खाली घालून चालले होते. विहिरीजवळच्या फरसबंद रस्त्यावर पाय ठेवताच कालचा तो रात्रीचा सौरभ, त्याने सर्व भावना भारून टाकल्या. मी मान वर करून पाहिले, लहान पपनमाचे झाड फुलाफलांनी डवरले होते, जणू काही पांढऱ्या मोत्यांचे कारंजेच.

क्यांहाँ, क्यांहाँ, क्यांहाँ, रात्रीच्या शेवटच्या प्रहरापासूनच कानाजवळ आवाज सुरू झाला. झोपून राहणं कसं शक्य होतं ? चहूकडे दाट अंधकार होता, तरी मी उठले, उश्याकडची खिडकी उघडली. त्या बाजूला झाडाझुडुपांनी भरलेले जंगल होते. तिथल्याच झाडाच्या फांद्यांवर बसून मोर व लांडोर उड्या मारीत ओरडत होते – क्यांहाँ, क्यांहाँ, क्यांहाँ. काय त्यांचा तो आवाज ! इतक्या सुंदर पक्ष्यांचा हा कसला कर्कश कंठस्वर ! या विसंगतीचे फार दुःख होत होते. मन काहीही गोष्ट मान्य करायला तयार होत नव्हते. चांगल्या गायकाच्या तोंडून कटू भाषण ऐकून कितीदातरी माझे मन दुखावले होते. कितीही विचार केला तरी मला कधी समजले नाही की, इतक्या गोड गळ्याचे जे अधिकारी असतात, ज्यांच्या स्वरलहरीतून इतके अमृत पाझरते, त्यांत विष कसे असते ? हो, हेमुद्धा शक्य असते; नक्कीच असते. तशी शक्यता नसती तर या डोळ्यांनीच हे कसे दिसले असते ? आपण नेहमी ऐकतो ना, की या सृष्टीमध्ये दोन परस्परविरोधी धर्म शेजारीशेजारी वास करतात. हेसुद्धा त्या विधात्याच्या नियमनाचेच आणखी एक गूढ !

आक्का अगोदरच उठल्या होत्या. त्या झोपल्याच कुठे होत्या तर उठल्या म्हणायचे ? रात्री कुशीवर वळताना डोळे उघडून जेव्हा जेव्हा पाहिले तेव्हा तेव्हा आक्का आपल्या खाटेशेजारच्या खिडकीचे गज धरून स्वस्थ बसलेल्या होत्या. या पूर्वी आणखीही कितीतरी रात्री त्याना अशाच एकट्या जागत बसलेल्या मी पाहिले होते. मध्यरात्री निरभ्र अशा आकाशातील असंख्य तारकांमध्ये चाचपडून त्या कुठल्या हरवलेल्या धनाचा शोध घेत होत्या ? जे एकदा चकवून निसटून गेले आहेत

ते का पुन्हा सहजासहजी हाती लागणार आहेत ?

रात्रीच्या जागरणाचा थकवा आक्कांच्या चेहे-यावर आणि डोळयांत दिसत होता. मला माहीत होते, तरी मी विचारले, "काय झालं होतं आक्का तुम्हांला ? नवीन जागेत झोपायला त्रास का झाला ? "

"नाही. नाही, तसं नाही. सुंदर चांदणी रात्र; चंद्रप्रकाश होता का दिवसाचा उजेड होता ह्याची गल्लत होत होती. म्हणून बसून बघत होते."

"हे बघण्यातच सगळी रात्र बसून काढलीत ? "

आक्कांच्या तोंडावरचे हसू मावळले, त्या विषण्ण झाल्या. त्या म्हणाल्या, "किती तरी प्रयत्न करते ग राणी, पण झोप कुठं येते ? माझ्या रात्री अशाच जातात; अंथरूण म्हणजे आग वाटते मला."

आक्कांना ओढून बरोबर घेऊन सरळ यमुनेच्या काठी आले. काल रात्री दिशा नक्की कळली नव्हती. आज आता काही चुकणार नव्हते. पूर्वेकडील आकाशात काळया आवरणांमधून प्रकाशाची किरणे हळूहळू बाहेर येत होती. प्रशस्त असा तो वाळूचा चर त्या प्रकाशात थोडा थोडा दिसू लागला होता. दूरच्या अस्पष्ट दिसणाऱ्या झाडांचे शेंडे हळूहळू स्पष्ट होत होते. पांढऱ्या धुक्यात पांढऱ्या वाळूवर काळया साधूचा गट येरझारा घालीत होता; जणू काही घराच्या भिंतीवर तोंडात अंडी घेऊन काळया मुंग्याच धावपळ करीत होत्या. काही साधू हात-तोंड धूत होते, लोटा त्रिशूळ घासीत होते, ट्यूबवेलच्या विहिरीवर स्नान करीत होते, पाठीला-छातीला भस्म लावीत होते, सर्वच गडबडीत होते. उगवत्या दिवसाच्या स्वागताची घाईघाईने तयारी चालली होती.

पूर्वेकडच्या आकाशातील प्रकाशात आता रंग भरले होते. तेच रंग यमुनेच्या पाण्यात, साधूंच्या अंगावर, वाळूवर, या बाजूच्या झाडांच्या शेंडयांवर, मंदिराच्या सोन्याच्या कळसावर पडले होते. बघता बघता त्या रंगामध्ये होळीचा खेळ सुरू झाला, अगदी डोळयांदेखत. मी व्याकुळ झाले. इतका वेळ हे सर्व रंग कुठे लपले होते ?

आक्का म्हणाल्या, "हे पाहा. त्या गुलालाचं तबक." मी पाहिले पूर्वेकडच्या आकाशातील रंगित प्रकाशात गोल गरगरित, लाल टुकटुकित सूर्य वर आला होता.

प्रातःस्नानाची वेळ झाली. लक्ष्मीविलास तेलाची बाटली घेऊन एक बारीकशी काडी शोधण्यासाठी आक्का बाहेर गेल्या. थंडीने गोठलेले तेल काडीने खोचून काढायला हवे होते. नाहीतर इतक्या भल्या पहाटे तेल वितळवून घेऊ म्हटले तर तेवढे ऊन तरी कुठे होते ?

घरी आले तेव्हापासून पाय वर घेऊन मी पलंगावर बसले होते. आक्का म्हणजे हेकेखोर, यमुनेत स्नान करायलाच हवे. तरी काल रात्री झोपण्यापूर्वी व्रजरमणने, खोलीच्या दुसऱ्या एका बाजूला बसून सांगितलेले मी पडल्या पडल्या ऐकले होते. यमुनेत म्हणे मोठमोठी कासवे असतात. पाण्यामध्ये सारखी त्यांची वळवळ चालते. हाताने त्यांना बाजूला करून स्नान करावे लागते. कासवाची पकड ! अरे बापरे ! लहानपणी आजीकडून ऐकले होते. कासवाने चावा घेऊन पकडून ठेवले, की काही केल्या ते पकड सोडीत नाही. अगदी आकाशात विजेचा कडकडाट होईपर्यंत. कासवाचा गळा कापून टाकला तरी ते पकड सोडीत नाही. अखेरच्या क्षणीसुद्धा ते 'आ' म्हणून करीत नाही. तरी, कासव पापी लोकांनाच ओळखून चावते. त्याशिवाय कासव म्हणे प्रेत खाते. असे सांगतात की, यमुनेच्या तीरावर चिता पेटताच तोंडात चूळ आणून कासव चिता विझवून टाकतात. प्रेत खाण्याची इतकी तीव्र इच्छा ! इतके सगळे ऐकल्यावर कुणाला धाडस होणार ? तरी आक्का मानायला तयार नव्हत्या. हातात साडी, पंचा घेऊन त्या म्हणाल्या, 'उठ'.

माझ्या मनात आले. त्या काळी कदाचित यमुनेत कासवे नसतीलच. तसे असते तर त्या दुष्ट बायाबापड्यांनी आनंदाने राधेला पुन्हा पुन्हा यमुनेवर पाठवले असते. राधेच्या जाण्यायेण्याबाबत त्यांनी एवढी ओरड केली नसती.

आक्का म्हणाल्या, "हो, किती शेकडो माणसं स्नान करतात, काही होत नाही. आणि तुमच्या वेळेला ..."

मी म्हणाले, "तीच तर अडचण आहे. काही होत नाही तोपर्यंत नाही. काही झालं की लगेच म्हणतील, पापी होती म्हणून झालं."

व्रजरमणने धीर दिला, ते म्हणाले, "भिऊ नका. पाण्यात स्थिर उभं राहिलं तरच कासव चावून पकडतात, नाहीतर काही करीत नाहीत, असंही ऐकिवात आहे." काय करणार ? पंच्याचे बोचके हातात घेऊन आक्कांच्या मागे मागे निघाले.

इतके दिवस यमुनेचे चित्र डोळ्यांसमोर होते, त्याबरोबर आज काहीसुद्धा मेळ बसत नव्हता. श्रीराधाराणीचे मन वेडावून टाकणारी त्या निळ्या रंगाची बहार तिथे नव्हती की देता देता पुढे जाणारी आणि जाता जाता समोरचे सर्व धुऊन घेऊन जाणारी गंगेची बेछूट उद्दाम गती तिथे नव्हती. ही जणू भ्यालेली, कफल्लक, वंचिता प्रेयसी होती. मलिन मुखाने, क्षीण आवाजाने गतायुष्यातील स्वतःची रूपयौवन गाथा ती जणू कानात गात होती. कुणी कल्पना करण्यातच समाधान मानीत होते,

तर कुणी कोव करूनच मरत होते. नाहीतर आजचे काय ते यमुनेचे रूप ! राधेची कळशी म्हणे अथांग पाण्यात वाहून जायची – पण ते तरी कुठे आहे ? यमुनेच्या मध्यभागी गुडघाभर पाण्यात डुबकी मारून लोक काठावर येत होते.

कोरड्या वाळूमध्ये कपड्यांचे बोचके ठेवून आक्कांच्या सांगण्याप्रमाणे यमुनेला स्पर्श करून हात कपाळी लावून पुढे पाऊल टाकले. अरे बापरे ! हे काय पाण्यात, एक का दोन ? गंगेत माशांचे स्तूप पाहिले होते आणि इथे दिसतात कासवांचे काळे पर्वत, जाड जाड माना बाहेर काढून ते पुढे येत होते. मागे जात होते, ते पाहून तीन उड्यांतच मी मागे झाले.

आता काय करावे ? एक डुबकी तरी मारायलाच हवी. तिथे जाणार तरी कशी? कुठून हिम्मत आणणार ? व्रजरमणनी सांगितले होते, नुसते स्वस्थ उभे राहिले तरच भीती, शिलचरच्या आलेकबाबाची आठवण झाली. 'अलख निरंजन' होते ते, या नावानेच त्यांना सर्वजण ओळखीत. सर्वांगावर लावलेल्या घंटा व घुंगरांचा छुम छुम आवाज करीत ते भिक्षेस निघत. कुठेही थांबत नसत.

उशीर करून उपयोग नव्हता. 'कृपा कर आलेक बाबा' असे म्हणून सपासप पाणी छिटकून, पाय नाचवून 'लेफ्ट राइट' करीत करीत एक हात खोल पाण्यात कशीबशी बुडी मारली आणि किनाऱ्यावर आले. आता आज दुसऱ्या कुणाच्याही नावाने बुडी नाही; त्यांची आठवणच झाली नाही. स्नानानंतर देवदर्शनासाठी बाहेर पडलो. वाटेत एक पंड्या बरोबर आला. तो म्हणाला, "जवळचं, हाताजवळचं मंदिर सोडून दूर जायचं नसतं, चला, मी एक एक करून सर्व दाखवतो."

पहिल्याने रंगनाथमंदिरात गेलो. दक्षिण भारतातील अति प्राचीन मुख्य मंदिर, श्रीरंगम्. त्याच धर्तीवरचे हे मंदिर. प्रचंड दार. समोरच खूप उंच असा सुवर्णस्तंभ. पंड्याने सांगितले की, साडेबारा मण सोने लागले तो स्तंभ तयार करायला. खालपासून वरपर्यंत तांब्यावर सोन्याचा पत्रा चढवून तयार केला होता. नाव 'गरुडस्तंभ'. पण लोक याला म्हणतात 'सोन्याचा ताडवृक्ष', हा ताडवृक्ष पाहण्यासाठीच यात्रेकरू इथे गर्दी करतात. झकपक मोटरीत बसून आजच सकाळी एक यात्रेकरूंचे पथक आले होते. फक्त एकच दिवस ते राहणार होते. मी विचारले, "वृंदावनाला एकच दिवस राहून आपण पाहणार तरी काय ? जे दिसतंय ते धावपळ करून पाहिलं तरी कित्येक दिवसांत पाहून संपेल असं वाटत नाही."

ते म्हणाले, "आणखी सर्व ते काय पाहाणार ? हे मानसिंहमंदिर, शाहूजींचे मंदिर आणि ताडवृक्ष असलेलं हे मंदिर तेवढं बघून जाणार."

सोन्याच्या ताडवृक्षावर सूर्याची किरणे विखुरली होती. पाहाताना डोळे दिपत होते. वरती तीन ठिकाणी सोन्याच्या पत्र्याने मढवलेल्या घंटा झुलत होत्या – एक, दोन, तीन, चार – आठ – दहा – आणखी मोजता आल्या नाहीत. डोळे घट्ट मिटून घेतले. आक्का म्हणाल्या, ' मला वाटते सोळा होत्या. ' दादा म्हणाले, ' बारा. '

गडबड करीत सर्वजण मंदिराकडे धावले. द्वार उघडीत होते. आता देवदर्शन देणार होते. प्रचंड दार जोराने ओढून उघडताना, बंद करताना त्याला लावलेल्या चौऱ्याऐंशी घंटा जोरात वाजत होत्या – ढंग्, ढंग्, ढंग्, ठण्, ठणू, ठण्. भोगारती-साठी लगेच ते दार बंद होणार होते. देवळाचा सभामंडप दर्शनाकांक्षींच्या गर्दीने अगदी खच्चून, ठासून भरून गेला. या एवढ्या गर्दीमध्ये रंगनाथाचे डोळ्यांनी दर्शन घेणे म्हणजे मोठे भाग्यच.

रंगनाथाचे दर्शन घेऊन मंदिराला प्रदक्षिणा घालताना मोकळ्या हवेत, आकाशा-खाली मी निघून आले. बाहेरून मंदिराची बांधणी पाहून मनात आले की, समोरचा आणि मागचा भाग असा कसा उलटासुलटा. जे प्रवेशद्वार म्हणून व्हायला हवे होते त्या दाराने लोक बाहेर पडत होते; आणि त्या मानाने लहान असलेल्या दाराने आत येत होते. हे काय आणखी विलक्षण !

दादा म्हणाले, ' चालता चालता गोष्ट ऐका तर. भक्त नामदेव रोज मंदिरात येऊन त्यांच्या इष्टदैवत रंगनाथला गाणे ऐकवीत. एक दिवस मंदिरात अत्यंत गर्दी झाली. या गर्दीत जोडे बाहेर ठेवले तर ते हरवण्याची शक्यता होती आणि मंदिरात जोडे घालून जायला मनाई होती. नामदेवांनी काय केले ? फाटक्या जोड्यांची माया तरी काय कमी होती ? इकडे गाणे ऐकवण्याची वेळ निघून चालली होती. पुष्कळ विचार करून जोड्यांचा जोड कमरेला बांधून ते मंदिरात आले आणि त्यांनी गायला सुरुवात केली. नामदेवांना तर तुमच्यासारखी इतक्या कपड्यालत्त्यांची कटकट नव्हती; भिक्षा मागून, गाणी गाऊन त्यांचा दिवस व्यतीत व्हायचा. आता फाटक्या कपड्यांतून कुठूनतरी जोड्याचा थोडासा भाग बाहेर दिसत होता. एकाची तिकडे नजर गेली, आता काय करणार ? सर्वच धावून आले आणि मानगूट पकडून त्यांनी नामदेवांना मंदिराच्या बाहेर काढले. परमेश्वराला गाणे ऐकवताना व्यत्यय का आला ते भावविव्हल नामदेवांना अगोदर समजलेच नाही. पंड्या पुजारींना त्यांनी विनवणी केली – " माझं गाणं अजून संपलं नाही, पुरं करू द्या. " त्यांची विनवणी कोण ऐकणार ? ते आत शिरायला जाताच मानगूट पकडून त्यांना बाहेर काढू लागले. समोरच्या दाराने त्यांना आत जाताच येईना. म्हणजे आज परमेश्वराला

गाणे ऐकवता येणार नाही तर. पण तसे कसे होईल ? हातात एकतारी घेऊन नामदेव मंदिराच्या मागच्या बाजूला निघून गेले. तिथे उभे राहून, तल्लीन होऊन ते गाऊ लागले. अश्रुधारांमध्ये त्यांची हृदयव्यथा वाहून जाऊ लागली. हे भगवन. आज असंतुष्ट का झालात ? परंतु काय आश्चर्य ! सर्व पाहातच राहिले. देवाची मूर्ती फिरली होती. रंगनाथजींनी पाठ फिरवली होती व उभे राहून ते नामदेवांचे गाणे ऐकत होते. त्याच वेळेपासून रंगनाथाच्या मंदिराचे पुढचे दार मागचे झाले आणि मागचे दार प्रवेशद्वार झाले. ''

रंगनाथमंदिराच्या डाव्या बाजूला सर्वत्र भक्त स्वामीजींच्या स्मृतिप्रीत्यर्थ बांधलेली अनेक लहान लहान देवळं होती. प्रत्येकासमोर एक एक पंडया होता. पैसे न टाकता दर्शन घेणे म्हणजे यात्रेकरूंना कठीणच होते. सर्व मूर्ती लहान लहान व काळया दगडाच्या होत्या. दरवाज्याच्या वरच्या बाजूला हिंदीमध्ये सर्व माहिती दिली होती. मनात येईल ते नाव पंडया सांगून टाकीत आणि पैसे उचलून कनवटीला लावीत. एका मंदिरांत होते श्रीभट्टनाथ स्वामी, विश्वक्सेन स्वामी आणि बर्बर स्वामी. पंडयाने हात हलवून समजावून सांगितले, '' या तीन मूर्ती म्हणजे राम, लक्ष्मण आणि सीता आहेत. तिघांना तीन पैसे द्या. ''

याचप्रमाणे भक्तिसार, महायोगी, भूतयोगी, सरयोगी स्वामी हे दशरथ, कौसल्या, भरत व शत्रुघ्न समजले जातात. कुरेश आणि लोकाचार स्वामी बनतात राम–सीता.

आक्कांनी धमकावले, '' लिहिलेलं दिसतंय ना, हे कोण, ते कोण, कशाला उगीच पुन्हा पुन्हा विचारता ? द्या, नमस्कार करा आणि तीर्थ घेऊन छातीला व डोक्याला लावा. ''

समोरच्या अंगणात एक कुंड बांधलेले होते. व्रजरमणनी सांगितले, '' यातच हत्ती आणि सुसरींची झुंज होते. '' कुठं, कुठं, '' विचारीत धावत पाहायला गेलो. हिरवेगार पाणी. तळ दिसणे कठीण होते. गज आणि ग्राह इथे कुठे आहेत ? पंडयाने सांगितले, '' आता कुठचे ? दरवर्षी विशिष्ट दिवशी कागदी गज-ग्राह तयार करतात. त्यानंतर दोन नौकांत त्यांना घेऊन पाण्यात दोन गटांमध्ये लढाई होते. लढाईत जेव्हा कोणाचीच हर होत नाही तेव्हा अगदी शेवटच्या क्षणी रंगनाथ गरुडावर स्वार होऊन येतात आणि तीक्ष्ण धारेच्या चक्राने ग्राहाचा (सुसरीचा) शिरच्छेद करतात. पुष्कळ लोक पाहायला येतात. जत्रा भरते, जागेसाठी धक्काबुक्की होते.

मंदिराच्या मागच्या बाजूच्या मोठ्या मुख्य दाराजवळ तीन मजली घरासारखे उंच असे एक गॅरेज होते. त्याच्या समोरच्या बाजूला खालपासून वरपर्यंत मातीची भिंत होती.

हे काय आहे ? असे बंद का ?

पंड्या म्हणाला, " त्यात रथ आहे. सबंध वर्षभर असाच बंद करून ठेवतात. रथयात्रेच्या वेळी भिंत फोडून तो बाहेर काढतात. तसं नाही केलं तर 'तीर्थयात्री' सर्व आधीच पाहून टाकतील आणि मग रथाच्या वेळी गर्दी होणार नाही. ते म्हण-तील, तो आधीच पाहिला आहे. "

मानसिंहाचे मंदिर, खालून पाहिले की वाटते जणू लाल दगडाचा एक प्राचीन प्रासा-दच. गच्ची, व्हरांडा, खांब, चौकी किती म्हणून तिथे. खालच्या जमिनीपासून पायऱ्या पायऱ्यांनी रुंद जिना वर सभामंडपापर्यंत गेला होता. सर्व मिळून काय सुंदर नक्षीदार दगडाचे काम होते.

हेच ते पुरातन रूप गोस्वामीचे गोविंदाचे मंदिर. मानसिंहाने रूपगोस्वामीच्या इच्छेनुसार हे बांधून दिले होते. काय सुंदर आणि किती उंच !

पंड्या म्हणाला, " हे आणखीसुद्धा उंच होतं. पूर्वी याच मंदिराच्या कळसावर मांजवात लागत असे. एक दिवस अमावस्येच्या रात्री स्वतःच्या घरात बसून बादशहा औरंगजेबला हा प्रकाश दिसला. त्याने विचारले, ती रोषणाई कुठली ? माझ्या राजवाड्यापेक्षा जास्त उंचावर दिवा लावण्याइतकं साहस कुणाचं ? " लगेच सेनापतीला पाचारण करून त्यानं हुकूम सोडला – " जा, तोडा, लुटा. " इकडं जयपूरच्या राजालाही स्वप्न पडलं. स्वप्नात येऊन गोविंदान सांगितलं – " मला लवकर घेऊन ये, ते मंदिर फोडायला येत आहेत. " दुसऱ्याच दिवशी राजानं माणसं पाठवली आणि गोविंद, गोपीनाथ आणि मदनमोहन या तिघानाही तो घेऊन गेला. बादशहाचे लोक आले आणि त्यांनी पाहिलं तर काय मंदिर रिकामं. त्यांनी मंदिराचा कळस तोडून, मोडून नष्ट केला व ते परत गेले.

मोडतोड झालेल्या स्थितीतही हे मंदिर किती प्रचंड वाटत होते. पूर्वी कसे होते कुणास ठाऊक.

दादा म्हणाले, " असं ऐकलंय की, पूर्वी याच्यावर चार मजल्यांइतका उंच मंदि-राचा कळस होता. "

सभामंडपात शिरून वरच्या बाजूला पाहिले, सबंध छपराला बसवलेले घुमटासारखे गोल दगडाचे कमळ होते आणि त्यालाच मधाची पोळी लागली होती. आक्कांना सांगितले, ' बघा, बघा मधमाश्यांची पोळी. ' – मान वर करून सर्वकडे पाहून त्या म्हणाल्या, " खरंच की, कितीतरी पोळी. सुरक्षित अशी जागा पाहून त्यांनी पोळी बांधली. "

मधमाश्या नव्हत्या. खरे म्हणजे पाकोळ्या होत्या त्या. दिवसाच्या प्रकाशात एरवीच अशा एकत्र गोळा होऊन लोंबकळत होत्या. इतक्या उंचावर पाकोळ्या मधमाश्यांप्रमाणेच वाटल्या. इतरांनादेखील तसेच वाटते की नाही ते मी पाहिले. आक्कापासून सर्वांची परीक्षा घेतली.

मंदिराच्या आत गोविंदाची मूर्ती होती. ही मूर्ती नकली होती. मंदिर रिकामे ठेवायचे नसते म्हणून नंतर त्या जागी प्रतिनिधी म्हणून दुसरी मूर्ती बसवली होती. खरा गोविंद तर जयपूरला होता. गोविंदाचे दर्शन झाल्यावर मंदिराला लागून असलेल्या एका अरुंद जिन्यावरून व्रजरमणने आम्हांला एका छोट्या दरवाज्याजवळ नेले. इथे काही तरी विशेष दाखवणार होते. आत शिरताच मी समजले की, या जागी यात्रेकरू फारसे येत नसावेत. चांगले माहीत असल्याशिवाय हे स्थान लक्षातच येत नाही. एकदोन माणसे इथे बसून पिठाच्या लाट्या कापीत होते. एकजण शेगडीवर कढई ठेवून भाजी करीत होता, मला वाटते हे सर्व नैवेद्यासाठी असावे. आम्ही आत आल्यामुळे ते जरासे त्रासलेच. व्रजरमणच्या आग्रही खुणांमुळे एकाने पिठाची लाकडी परात बाजूला सारून वाट करून दिली. तिथे अरुंद बोगद्यासारखा एक अंधारी जिना होता. हातात पणती घेऊन त्या उजेडात एक एक पायरी उतरून आम्ही शेवटच्या पायरीवर येऊन थांबलो. एखाद्या लहान हौदाप्रमाणे चौकोनी जागा होती. कच्ची जमीन आणि दमटपणा वाटत होता. एकच दिवा जळत होता; काळ्या जमिनीवर दोनचार पांढरी फुले पडली होती. कुणी तरी केव्हा तरी पूजा करून गेले होते.

व्रजरमण म्हणाले, "हीच गोमाटिला, या ठिकाणीच गोविंदप्रभू स्वत: प्रकट झाले. "

आक्का म्हणाल्या, " काय थोर महिमा त्यांचा ! इथं काय आहे ते कुणालाही माहीत नव्हतं. एक कामधेनू रोज सकाळी इथं खाली उतरून येऊन नेमकी गोविंदाच्या डोक्यावर उभी राहायची, आणि आपोआप तिच्या आचळातून दूध पाझरायचं. स्वप्न पडल्यानंतर रूपगोस्वामींनी जेव्हा गोविंदजीला विचारलं की तुम्ही जे तिथं आहात ते तुम्ही खाता काय ? गोविंद म्हणाले, " कामधेनूचं दूध पितो रोज.

त्या कामधेनूच्या दुधानं भिजलेली ओलसर भूमीच तर खूण म्हणून त्यांनी रूपला दाखविली. " असे बोलून त्या भिजट जमिनीवरून आक्का हात फिरवू लागल्या.

गोमाटिलातून बाहेर येत असता, गोविंदमंदिराच्या दक्षिण बाजूचा बारीक दरवाजा उघडून एक वैष्णव हसतमुखाने हात हलवून म्हणाला—

**" कृष्णनाम कृष्णगुण कृष्णलीलावृंद ।**
**कृष्णस्वरूपासम सर्व चिदानंद ।। "**

" श्रीभगवान केव्हा प्रकट होतात तर केव्हा अंतर्धान पावतात. नाश काही पावत नाहीत. लोकांच्या नजरेसमोर गोचर होणं किंवा न होणं हाच काय तो फरक "

बोलता बोलता, दरवाजाच्या चौकटीवर हनुवटी टेकून एकदोन दिवसांचे वासरू बसले होते, त्याला कडेवर उचलून बाजूला खाली उतरवून ते वैष्णव आमच्याजवळ आले. ते म्हणाले, " व्रजनाभांनी तीन मूर्ती तयार केल्या होत्या. उषा म्हणजे व्रजनाभांची आई त्यांना म्हणाली, " बाळा, मला कृष्णमूर्ती तयार करून दे." कृष्णमूर्ती करून व्रजनाभ ती घेऊन आले. ती पाहून आई म्हणाली, " याचा चेहेरा चांगला जमला आहे पण बाकी काही बरोबर झालं नाही. " तीच मूर्ती म्हणजे गोविंद. पुन्हा एक मूर्ती करून व्रजनाभ घेऊन आले. त्यांनी विचारले, " आई पाहा बरं या वेळी सर्व बरोबर झालं की नाही ? " आई म्हणाली, " बाबा, याचे चरणयुगुल ठीक झाले आहेत, बाकीचं शरीर बरोबर झालं नाही. " ती मूर्ती झाली मदनमोहन, व्रजनाभांनी पुन्हा एक मूर्ती बनवली व ती घेऊन ते आले; त्यांनी म्हटले, " आई, आता तरी पाहा बरं, तुझ्या मनाप्रमाणं झाली की नाही ते." आई म्हणाली, " हो बाबा, याचं वक्षस्थळ बरोबर झालंय. " हे झाले गोपीनाथ, त्या गोविंदाचंच हे मंदिर. ' हे राई, हे कृष्ण ' असा हाहाकार करून रूपगोस्वामी रडायचे. कृष्णानं त्यांना स्वप्नात दर्शन देऊन म्हटलं, " रूपव्रजनाभनं तयार केलेला मी गोविंद वृन्दावनाला प्रतिष्ठापित झालो होतो, तुझ्याजवळच गोमाटिलाला मातीमध्ये मी राहतो, तू माझा उद्धार कर. तुझ्या हातची सेवा मिळावी म्हणून मी पुष्कळ दिवसांपासून वाट पाहातोय." या स्वप्नानंतरच रूपनी गोविंदाला इथे आणून त्याची प्रतिष्ठापना केली. त्यानंतर मानसिंहानं जयपूरहून लाल दगड आणून हे प्रचंड मंदिर उभारलं. "

दादा म्हणाले, " चला, कुठं तरी बसून तुमच्याकडून गोष्टी ऐकू या. "

वैष्णव आम्हांला मंदिरांत घेऊन आले, अगदी मूर्तीच्या समोर त्यांनी एक कांबळे अंथरले. आम्ही त्यावर बसलो.

वैष्णव ब्राह्मणाचे नाव होते भगवानदास. ते म्हणाले, " श्रीकृष्णाच्या विहारानंतर काळाच्या क्रूर दंशानं सर्व नष्ट झालंय. केवळ शास्त्रादि ग्रंथांमधूनच वृन्दावनाचा महिमा उल्लेखलेला आढळतो. तेव्हा व्रजेंद्रनंदच शचीनंदाचं रूप घेऊन नदियामध्ये अवतीर्ण झाले होते. त्यांनी एकेका गोसावी भक्ताला क्रीडास्थानाच्या शोधार्थ पाठवलं. ते स्वतःही आले; परंतु त्यांना जास्त दिवस राहाता आलं नाही. रूप-सनातनवर सर्व जबाबदारी टाकून ते नीलाचलला निघून गेले.

" तेव्हा वृन्दावनामध्ये लोकांची वस्ती नव्हती; सारा प्रदेश अरण्यांनी भरलेला होता. रूप-सनातन वृक्षवल्लरींच्या खाली बसून भजन करीत आणि वृन्दाजीजवळ प्रार्थना करीत की ज्या वृन्दावनाला तुम्ही स्वहस्ते सजवलं होतं, ती आता तशीच परत द्या. "

" सत्यवती राजकन्या म्हणजेच वृन्दा. कृष्णकृपेच्या आशेनं वृन्दा तपस्या करीत होती. कृष्ण प्रसन्न झाला व वर देण्यासाठी आला. वृन्दा म्हणाली, ' तुमच्या सेवेसाठी मी एक वन तयार करीन, तिथं एकाच वेळी सहा ऋतूंचा समावेश असेल. फुलाफळांची रेलचेल असेल, नानातऱ्हेच्या पक्ष्यांची मधुर किलबिल असेल, कल्पवृक्ष, कल्पलता, कामधेनू आणि रत्नजडित प्रासादांनी वन अगदी परिपूर्ण असेल. हे प्रभू तुम्ही मला असा वर द्या की तुम्ही नित्य तुमच्या प्रिय कांतेसह याच वनात विहार कराल. "

भक्ताने वश केलेल्या कृष्णाने, तथास्तु, तथास्तु, तथास्तु म्हटलं व विचारले, " अग वृन्दा, मी रोज माझ्या कांतेबरोबर विहार केला तर त्यात तुझा काय फायदा ? "

वृन्दा म्हणाली, " प्रभू, तुमचं युगुलरूप दर्शन मी नित्य घेईन. "

**" निजदेहसुख नसे गोपिकांना**
**कृष्णसुखामधी सर्वस्व लाभते त्यांना ।"**

" तुम्हांला एकत्र विहार करून जितका आनंद मिळेल त्याच्या शंभरपट आनंद तुमच्या युगुलदर्शनानं मला होईल. प्रभू मला आणखीही एक वर हवा; तुम्ही हे वन सोडून कुठंही जाणार नाही असं सांगा. "

कृष्ण म्हणाला, " बरं, तथास्तु । वृन्दावनम् परित्यज्य पदमेकम् न गच्छामि । "

" भक्तांच्या इच्छेसाठीच कृष्णाचा सर्व अवतार. वृन्दासाठी अति सुंदर लीला करून दाखवण्याकरिता कृष्ण आला. तेव्हापासून वृन्दाच्या या वृन्दावनामध्ये नित्य लीला होते. चैतन्य भागवतात सांगितले आहे, " गोरा[1] राणा अद्यापिही नित्य लीला करतो. जो कुणी भाग्यवान असतो त्यालाच त्या पहावयास मिळतात. "

" मी हतभागी, अकराव्या वर्षी वृन्दावनाला आलो; आज पासष्ट वर्षे वया-पर्यंत त्याच्या कृपेची वाट पाहात बसलो आहे. त्याला कधी दया येईल, तो कधी दर्शन देईल. " बोलता बोलता झरझर अश्रू गाळून भगवानदास रडू लागले. रडता रडताच ते म्हणू लागले, " विषयवासना सोडून माझं मन केव्हा शुद्ध होईल आणि कधी मी तो श्रीवृन्दावन पाहीन कुणास ठाऊक ? "

" ब्रह्मसंहिता सांगते की, स्वतः लक्ष्मी ज्या वृन्दावनामध्ये कांता होती, आणि श्रीकृष्ण जिथं पुरुषश्रेष्ठ होते, जिथं वृक्षवल्ली कल्पतरू होत्या, ज्या ठिकाणची जमीन चिंतामणिमय, जिथलं पाणी अमृत, साधं भाषण जिथं संगीत, साधं चालणं जिथं नृत्य, साधी बासरी जिथं श्रीकृष्णाची मोहून टाकणारी मुरली प्रियसखी असते ते वृन्दावन प्रेमचक्षू असल्याशिवाय दिसतं का ? प्रेमचक्षूंनी पाहतात त्यासच ते स्वरूप दिसते. "

" हाय रे, ते प्रेमचक्षू मला अजूनदेखील लाभले नाहीत. "

भगवानदासने डोळे पुसले आणि नजर खाली करून स्वतःला शांत केले.

सहसा दादा कुणाला पदस्पर्श करून नमस्कार करीत नाहीत. आक्कांना त्यांनी किती वेळा तरी खडसावले होते, " रस्त्यात, घाटावर जो भेटेल त्याच्या पायांला स्पर्श कशाला करतेस ? पायाला स्पर्श नाही केला तर काय आदर दाखवता येत नाही ? " त्याच दादांनी दोन्ही हातांनी भगवानदासांची पायधूळ घेऊन मस्तकी लावली; ते म्हणाले, " आज आता निघतो. परंतु पुन्हा एकदा आपल्याकडं येण्याची इच्छा शिल्लक राहीलच. "

रस्त्यात आल्यावर मी म्हटले, " सर्व चांगलं आहे, पण असं भोकाड पसरून रडतात कशाला ? " दादा म्हणाले, " श्रीमद्भागवतात सांगितलंय की परमेश्वराचं नाव ऐकून जेव्हा कुणाच्याही डोळ्यांतून पाणी येतं तेव्हा ते त्याच्या फार पुण्याईचं फळ असतं, एरवी असं होत नाही. "

व्रजरमण म्हणाले, " पवित्र वृन्दावनधामी श्रीराधागोविंदाच्या भजनामध्ये

१. चैतन्य.

तल्लीन होणाऱ्या भागवतांकडून श्रीराधागोविंदाचा महिमा ऐकायला मिळणं ही अत्यंत भाग्याची गोष्ट आहे. परमेश्वराच्या असीम दयेशिवाय हे मुळीच शक्य नाही."

आक्का म्हणाल्या, "तुलशीदासाचं रामचरितमानस" वाचलं नाही ? तुलसीदासांनी लिहिलंय, बिभीषण हनुमानाला सांगत आहे –

"हे हनुमान, आता माझी खात्री झालीय, माझ्या उद्धाराबाबत मला आता मुळीच संशय नाही. कारण, तुझ्यासारख्या विष्णुभक्ताबरोबर माझी मैत्री झालीय."

"हरीच्या कृपेशिवाय हरिभक्ताचं मिलन अशक्यच. तुलसीदासानेच या साधनेसंबंधी आणखी एका जागी म्हटलंय,

**"बिन सत्संग न हरिकथा,**
**तेहि बिन मोह न भाग,**
**मोह गये बिनू रामपद होई,**
**न दृढ अनुराग ।।"**

"सत्संगाशिवाय हरिकीर्तनाचा लाभ नाही, हरिकीर्तन ऐकल्याशिवाय मोह दूर होत नाही व मोह दूर झाला नाही तर श्रीरामचरणी दृढ भक्ती जडणार नाही."

रूप आणि सनातन हे दोघे भाऊ होते. गौड देशाचा नबाब हुसेन शहाच्या दरबारात सनातन प्रधानमंत्री होता व रूप अर्थसचिव होता.

एकाच वेळी दोन्ही भावांच्या मनात विरक्ती निर्माण झाली. संधी पाहून संसारत्याग करून रूप वृन्दावनाला आले. सनातन मात्र अडकून पडले.

त्यानंतर सनातनना राजकार्यात गोडी वाटेना आणि नवाबही त्यांना सोडीना, तब्येत बरी नाही या सबबीवर सनातन घरात बसून राहत आणि पंडितांबरोबर भागवतातील तत्त्वांचा आस्वाद घेत असत. सनातनची प्रकृती पाहायला नवाबाने वैद्य पाठवला. परंतु वैद्याला सनातनच्या शरीरात कोणताही आजार शोधूनही सापडला नाही.

नवाबाला संशय आला. एक दिवस अचानक येऊन तो उभा राहिला, आणि म्हणाला, "तू माझा उजवा हात, तुझ्याशिवाय राज्यकारभार चालवणं अशक्य, आजाराचं ढोंग करून तू बाहेर पडायला पाहतोस – तुझी इच्छा काय आहे ?"

सनातननी मनातले सर्व काही मोकळेपणाने सांगून टाकले. नवाब काही कबूल होईना, तो म्हणाला, "मला तू हवासच."

सनातननी काकुळतीला येऊन विनवणी केली. तो म्हणाला, " माझ्याच्यानं आता ते काम होणार नाही. "

नवाबाचीही जिद्द वाढली. सनातनना कैद करून त्यांना कारागृहात ठेवले. दारावर कडक पहारा ठेवला.

याच वेळेला राजा प्रतापरुद्राबरोबर नबाबाचे युद्ध सुरू झाले, नबाब ओरिसाला युद्ध करायला निघून गेला. या संधीचा फायदा घेऊन पुष्कळ पैसा लाच देऊन सनातन तुरुंगातून पळाला. डोंगराळ प्रदेशातील वाटेने पायी चालत, शिधासामग्रीशिवाय त्यांनी काशीयात्रा केली, त्यांच्याबरोबर फक्त एक नोकर होता. दिवसा चालून झाल्यावर रात्री वाटेत एका जमीनदाराच्या घरी त्यांनी आश्रय घेतला. जमीनदाराने त्यांचे इतके उत्तम तऱ्हेने आदरातिथ्य केले की सनातनच्या मनात संशय उत्पन्न झाला. त्यांनी नोकराला बोलावून विचारले, " तुझ्याकडे काही पैसे आहेत ? "

नोकर म्हणाला, " हो, वाटेत काही गरज लागली तर त्यासाठी या सात मोहोरा लपवून बरोबर आणल्या आहेत. "

हे ऐकून सनातन संतापले. ते म्हणाले, " बरोबर काही घेऊ नकोस म्हणून मी तुला पुन्हा पुन्हा सांगितलं, तरी तू हा काळ– यम का बरोबर घेतलास ? दे सर्व माझ्या हातात. "

त्या सात मोहोरा घेऊन सनातन जमीनदाराला म्हणाले, " या एवढ्याच मोहोरा माझ्याजवळ आहेत. या तुम्ही घ्या आणि मला पर्वताच्या पलीकडे जाऊ द्या. तुम्हांला अर्थ व पुण्य दोन्हीचा लाभ होईल. "

तेव्हा हसत हसत जमीनदार म्हणाला,

" माझ्याकडं एक ज्योतिषी आहे. तुझ्याजवळ सात मोहोरा आहेत हे मला त्याच्याकडून आधीच कळलं होतं. आज रात्री तुमची हत्या करून त्या मोहोरा हस्तगत करायच्या असा विचार केला होता. परंतु तू बुद्धिमान आहेस. तू आधीच देऊन टाकल्यास. आता मी त्या मोहोरा घेणार नाही. अर्थ वजा करून फक्त पुण्यच पदरी घेऊन मी तुला पर्वताच्या पलीकडे पाठवून देईन. "

सनातन म्हणाले, " तुम्ही या मोहोरा घेतल्या नाहीत तर दुसरा कुणी आम्हांला मारून त्या घेईल. म्हणून तुम्ही यांचा स्वीकार करून माझे प्राण वाचवा. "

पर्वत पार करून सनातन हाजिपुरला आले आणि त्यांचा एकमात्र सोबती तो नोकर, त्याला निरोप देऊन निश्चित होत्साते गंगेच्या काठी येऊन ते बसले. तिथे अचानकपणे त्यांच्या मेहुण्याशी गाठ पडली. सनातनना पाहून मेहुणा फार आनंदित

झाला. त्याच्या मनात सनातनना घरी घेऊन जायचे होते. परंतु सनातन म्हणाले, " नाही. आता कुठंही जाणार नाही. तू मला गंगा पार करून दे, मी काशीला जाईन."

तेव्हा मेहुण्याने एक भूतानी कांबळे सनातनला दिले व त्याला गंगा पार करून दिली. भूतानी कांबळे अंगावर पांघरून, गंगा पार करून, पायी चालत काशीला येऊन पोचले.

महाप्रभू तेव्हा काशीलाच होते. सनातनना पाहून ते धावत आले व त्यांनी सनातनना मिठी मारून खुशाली विचारली. सनातनने त्यांच्या पायांवर लोळण घेतली व म्हटले, "प्रभूंच्या चरणांचं दर्शन झालं. आता माझी खुशाली ती बाकी काय ?"

सनातन प्रभूंच्या बरोबर परमानंदात होते. एक दिवस सनातनना वाटले, प्रभूनी जणू त्यांच्या भूतानी कांबळ्याकडे पाहिले. त्याच दिवशी गंगेच्या घाटावर त्यांनी ते कांबळे एका भिकाऱ्याला देऊन फाटकी गोधडी पांघरून ते परत आले. हे पाहून महाप्रभू हसून म्हणाले, "श्रीकृष्ण तुझे सर्व विषयरोग खंडन करीत असता, तो कुठला विषयभोग तुझ्या अंतरी राखणार आहे ? तीन मुद्रांची घोंगडी अंगावर घेऊन माधुकरी मागण्याने कार्य सिद्ध व्हायच्या ऐवजी लोक मात्र उपहास करतात."

या बोलण्याचे इंगित सनातनना ओळखले. त्यांनी तपन मिश्राकडून एक जुने धोतर मागून घेतले. मुंडन आधी केलेलेच होते. आता ते धोतर फाडून एक कौपीन व एक उपरणे तयार केले. गौड देशाचे प्रधानमंत्री सनातन यांनी पुरेपूर वैष्णव-वेश धारण केला.

एका ब्राह्मणाला दया आली; कुठं दारोदार हिंडून सनातन बिचारे भिक्षा मागणार ! त्यानं सनातनना आमंत्रण दिलं. तो म्हणाला, "जोवर आपण काशीला आहात तोवर रोज माझ्या घरी भिक्षा घेत जा."

पण तसं थोडंच होणार ! सनातन राजी होईनात. ते म्हणाले – "मी माधुकरी वृत्तीने राहीन पण एकाच ब्राह्मणाच्या घरी एकाच ठायी भिक्षा मागणार नाही."

माधुकरी म्हणजे मधुकर वृत्ती. मधुकर ज्याप्रमाणे एकाच फुलातून स्वतःला लागेल तेवढा सर्व मध घेत नाही, प्रत्येक फुलां-फुलांतून तो मधाचा संचय करतो, त्याप्रमाणे माधुकरी वृत्तीचा बैरागी एकाच घरातून आपल्या आहाराला पुरेशी भिक्षा घेत नसतो. प्रत्येक घरातून थोडं थोडं जेवण घेऊन तो आपली भूक भागवतो. म्हणून सनातन म्हणाले, " एकाच ब्राह्मणाच्या घरून सर्व भिक्षा कशी घेऊ ? " जीवनाच्या अखेरपर्यंत सनातन असेच कठोर वैराग्याने राहिले.

काही दिवस काशीला राहिल्यानंतर महाप्रभूंच्या आदेशाप्रमाणे सनातन वृन्दावनला आले. तेव्हापासून ते वृन्दावनालाच होते. एका जागी फार दिवस राहिले तर त्या जागेची माया जडते, म्हणून एकेका रात्री एकेका झाडाखाली ते आश्रय घ्यायचे, रात्रंदिवस ते भजन करायचे, राधाकृष्णाचे गुणगान करायचे. नामस्मरणात सदा मग्न राहायचे. घटकाभर निद्राधीन झाले तरी स्वप्नात राधाकृष्ण दिसायचे. त्यांचा एकही क्षण व्यर्थ जात नसे.

सनातनच्या गोष्टी ऐकून वेडावलेल्या मनानेच आम्ही एका उंचवटयावर येऊन पोचलो. हीच सनातनांची भजन करण्याची जागा. या निर्जन अशा जागी सनातन सारा वेळ भजनसंकीर्तन करीत असत. फक्त भिक्षेसाठी ते एकदा बाहेर पडत आणि ते जात तेदेखील फक्त मथुरेलाच, जे काही कण्या-पोहे मिळायचे तेच ते रात्री जेवत. मदनमोहन ज्यांच्याकडे मीठ मागायला गेले आणि दटावणी खाऊन परत आले ते हेच सनातन वैष्णव.

एक दिवस भिक्षा मागून सनातन परत आले, त्या दिवशी त्याना थोडे पीठ भिक्षा म्हणून मिळाले होते. ते पीठ भिजवून त्याच्या त्यानी काही मुटकुळचा तयार केल्या. इथे त्यांना आंगाकडी[1] म्हणतात – व त्या गोवऱ्यांच्या विस्तवावर भाजून मदनमोहनला खायला दिल्या. मदनमोहनचे खाणे झाल्यावर त्यांना प्रसाद मिळणार. मदनमोहनने तोंडात आंगाकडी घातली अन् ते म्हणाले, " थोडं मीठ असल्याशिवाय हे खायचं तरी कम ? थोड मीठ द्या ना. "

सनातन म्हणाले, " मीठ कुठून आणणार मी ? जे मिळालं ते दिलं, खायचं असेल तर खा. आज तू मीठ मागतोस, उद्या भाजी मागशील, परवा म्हणशील वरण पाहिजे; मी आहे बैरागी, माधुकरी मागून दिवस काढतो, तुला हवं ते कुठं मिळणार ? तुला हवं असेल तर तू स्वतः घेऊन ये. "

एक दिवस, दोन दिवस, तीन दिवस गेले – आज या उंचवटयाला लागून जो वाळूचा प्रदेश आहे तिथूनच पूर्वी यमुना वाहात असे. याच वाटेने व्यापारी त्यांच्या कामासाठी जहाजाने ये जा करीत. एक दिवस या उंचवटयाच्या अगदी पायथ्याशी मिठाच्या व्यापाऱ्याचे जहाज अडकून पडले. धक्काधक्की, हलवाहलवी कितीही केले तरी ते जहाज काही केल्या हलता हलेना. तेव्हा निरुपाय झाल्यामुळे डोंगरावरच्या

१ मध्य प्रदेशातील ' बाटी ' सारखा प्रकार.

साधूकडे बोट दाखवून लोक व्यापाऱ्याला म्हणाले, "आम्हांला तर काही करता आलं नाही. त्यांच्याकडं जाऊन पाहा. त्यांनी कृपा करून तुम्हांला काही उपाय सुचवला तर बघा."

व्यापारी सनातनकडे गेला व त्याने त्याच्या पायांवर लोळण घेतले. तो म्हणाला, "देवा, तुम्हांला काय हवं ते सांगा, मी देईन. पण माझी नौका सोडवून द्या." सनातन म्हणाले, "मला तर कशाचीच गरज नाही. परंतु या झोपडीमध्ये एक मुलगा आहे. त्याला काही हवं असेल तर त्याला जाऊन विचारा."

व्यापाऱ्यांनी झोपडीत जाऊन पाहिले तर तिथे मुलगा होताच कुठे ! मुलाच्या ठिकाणी तिथे होती बन्सीधराची मूर्ती. व्यापारी हसून म्हणाला, "हो, समजलो, होतास लहान मूल. पण झालास बन्सीधर. याची प्रतिष्ठापना करावी. हेच हवं ना तुम्हांला ? तेच होईल. या फेरीत जो काही फायदा होईल तो सर्वच्या सर्व खर्च करून तुमचं मंदिर इथं बांधीन–" एवढे बोलून व्यापारी नावेत जाऊन बसला आणि किनारा सोडून नौका प्रवाहावर सरसर जाऊ लागली.

या वेळी मिठाच्या व्यापारात त्या व्यापाऱ्याला सोळापट फायदा झाला. परत जाताना सर्व पैसा खर्च करून त्याने मदनमोहनाचे मंदिर बांधले आणि मंदि-राच्या कामकाजाची सर्व व्यवस्था करून दिली. व्यापाऱ्याचे नाव होते रामदास कपूर. त्याचे घरदार पंजाबमध्ये मुलतान जिल्ह्यात होते.

सनातनना साक्षात्कार होऊन ज्यांची इथे प्रतिष्ठापना झाली तेच हे व्रजनाभ मदनमोहन.

प्राचीन मंदिराच्या पडक्या कळसावर उगवलेले गवत वटवृक्षापर्यंत उंच वाढून झुलत होते. शेजारच्या मानसिंहाने बांधलेल्या मंदिरात मदनमोहनची स्थापना केली होती. गोविंद, गोपीनाथ, मदनमोहन, तिघांची मंदिरे मानसिंहाने बांधली होती. त्यांपैकी रूपस्वामीच्या गोविंदाचे मंदिरच सर्वांत मोठे होते. मानसिंह रूपस्वामींचे भक्त होते.

विटांचा छोटासा कळस असलेले मंदिर सनातनच्या भक्तांनी त्यांचे स्मारक म्हणून बांधले. त्याच्या आत कच्ची वेदी होती. तिथेच कोपऱ्यात लाल मातीचा दिवा लावून मंद ज्योतीच्या भोवती पांढरी शुभ्र जुई व मालतीची फुले जमिनीवर टाकून सनातनला श्रद्धांजली वाहिलेली होती.

पुन्हा पुन्हा इच्छा होत होती, ज्योतीवरून हात ओवाळून तिथे पडलेली मालतीची फुले उचलून आणून केसात माळावी.

या टेकडीजवळ दुसरी एक टेकडी होती. याला द्वादशादित्य टेकडी म्हणतात. एके काळी याच्या खालीच कालिया होता. रानावनात लपलेल्या ह्या जागेचा सनातनानेच उद्धार केला. अजूनसुद्धा इथे लोकवस्ती विरळच आहे. चोहोबाजूंना झाडाझुडुपांनी आणि जीर्णशीर्ण वृक्षांनी भरलेली जंगले आहेत.

व्रजरमण म्हणाले, " असं म्हणतात की, कालियादमन करून यमुनेच्या पाण्याने अगदी गारठून गेल्यामुळे थंडी घालवण्यासाठी श्रीकृष्ण याच डोंगरावर येऊन बसला. त्या वेळी बारा आदित्य प्रकट झाले व त्यांनी श्रीकृष्णाची थंडी घालवली. याच कारणामुळे याचे नाव पडले द्वादिशादित्य टेकडी.

या टेकडीचे आणखीही वैशिष्टच आहे. महाप्रभू चैतन्यांनी जगदानंद पंडितामार्फत सनातनला निरोप पाठवला होता. त्यांनी सांगितले होते, " सनातन, माझ्यासाठी वृंदावनाला थोडीशी जागा निवडून ठेव. "

निरोप मिळाल्यावर यमुनेच्या निर्जन किनाऱ्यावरील या टेकडीवर सनातनने महाप्रभूसाठी जागा निश्चित केली.

यानंतर महाप्रभू वृंदावनाला आले होते किंवा नाही, ते इथे बसले होते की नाही यासंबंधीचा पुरावा भक्त शोधीत नाहीत. ते आपले धरून चालतात की ज्या अर्थी महाप्रभूंनी येतो असे म्हटले होते आणि सनातनाने जागा शोधून ठेवली होती त्या अर्थी ते इथे नक्कीच आले असणार आणि राहिले असणार. म्हणून अजूनही त्यांच्यासाठी तिथे आसन मांडलेले असते.

द्वादशादित्य टेकडीच्या खालीच सनातनची समाधी आहे. गुरुपौर्णिमेला ते अंतर्धान पावले. त्यांच्या अंतर्धानाप्रीत्यर्थ इथे आषाढी पौर्णिमेला मोठा उत्सव होतो.

जवळच एक ग्रंथसमाधी आहे. गोस्वामीपाद लोकांनी जे सर्व ग्रंथ लिहिले. ते सर्वच ताडपत्र्यांवर लिहिले होते. त्या काळी त्यांना स्वत:लाच राहायला जागा नव्हती तर ग्रंथ वगैरे ठेवणार कुठे ? कधी झाडाच्या ढोलीत ठेवायचे तर, कधी दगडाखाली नाही तर गुहेमध्ये ठेवायचे. त्यामुळे ऊन, पाऊस व किड्यामुंग्यांमुळे अनेक ग्रंथ नष्ट व्हायचे. जे ग्रंथ वाचता येणे अशक्य झाले म्हणजे वैष्णवांच्या भाषेत ' पाठोद्धार करणे अशक्यप्राय झाले ', ते सर्व ग्रंथ एकत्र करून याप्रमाणे समाधिस्थ करण्यात आले. शास्त्रग्रंथ स्वत:च्या हातांनी नष्ट करणे हे जीवहत्येसमच होय.

आक्कानी समाधीवरून हात फिरवला व त्याला प्रदक्षिणा घालीत त्या म्हणाल्या, " अरेरे ! किती मौल्यवान होते हे ग्रंथ माहीत नाही. कुणाला कळलेसुद्धा नाहीत. '

यमुनेच्या किनाऱ्यानेच चाललो होतो. कृष्णलीला तर या किनाऱ्या किनाऱ्यावरच झाल्या होत्या. किती तरी पूर्वीच्या गोष्टी त्या. पण इथे चालताना जेव्हा लोकांच्या तोंडून एक एक गोष्ट ऐकतो तेव्हा वाटते जणू काही काल रात्रीच सर्व घटना घडल्या आहेत. इथली ही जागा आणि या कहाण्या यांच्या सुंदर मिलाफाचा प्रत्यय इथे येतो.

हाच तो कदंब वृक्ष ज्याच्यावर चढून श्रीकृष्णाने कालियावर झेप घेतली होती. झाडाच्या सर्व फांद्या यमुनेवर झुकल्या होत्या. या कदंबाच्या फांद्याफांद्यांवर राधा-कृष्णांची नावे आपोआपच फुललेली आहेत. ज्यांचे ज्ञानचक्षू विकसित झाले असतील त्यांनाच ती दिसतात. म्हणूनच, वेड्यावाकड्या फांद्यांवर राधाकृष्ण अक्षरे कल्पनेने-सुद्धा आम्हांला दिसत नव्हती. पण हे तोंड उघडून सांगण्याचे धाडस तरी कसे होणार ? रामकृष्णदेवांनी ती पाहिली होती. विजयकृष्ण गोस्वामींनी ती पाहिली होती.

आक्का म्हणाल्या, " हो, उठतात, राधाकृष्ण अशी नावं उठतात. झाडांच्या फांद्यांची गोष्ट तर सामान्यच, पण मी तर ऐकलंय की विजयकृष्णांच्या अंगावर राधाकृष्ण अक्षरे उठली होती. "

कदंबाची लहान लहान फळे गोळा करून पिशवीत कोंबली. घरी गेल्यावर ती अभिजितला दाखवीन.

वर मान करून व्रजरमण या फांदीवर त्या फांदीवर धुंडत होते. ते म्हणाले,"ही जागा भजन-साधनेसाठी फारच अनुकूल आहे. इथले मोठमोठे वृक्ष आपल्या शाखा, उपशाखा सर्वत्र पसरवून जणू काही या जगातील प्रखर तापापासून या जागेचे रक्षणच करतात आणि शांतशीतल छायेद्वारा भक्त लोकांना आवाहन करतात. "

सूर्यघाटावर आलो. हा तोच प्राचीन सूर्यघाट. राजकुमारी राधा रोज सकाळी सूर्य-पूजेचे निमित्त करून याच घाटावर यायची आणि धेनू-वेणू कुरणातच सोडून कृष्ण पुरोहिताचा वेश करून यायचा.

तीच चिरसनातन लबाडी. आजही माणसांच्या लीलांमध्ये तिचा प्रत्यय येतो. म्हणूनच त्यांच्या लीलांची कल्पना सहज लक्षात येत होती.

त्यांच्या नाना लीलांचे स्मृतिचिन्ह साऱ्या वृंदावनावर होते. हा तोच यमुनेचा तीर. शहराच्या मध्यभागी. सर्व वालुकामय प्रदेश आणि या प्रदेशाच्या सभोवती सर्व दुमजली घरे. पावसाळयात ज्या वर्षी या ठिकाणी पाणी जमते त्या वर्षी मोठीच

गडबड उडते. सर्व व्रजवासी इथे येऊन यमुनाकिनारी स्नान करतात. ते म्हणतात, 'बरोबर याच सुमारास कृष्णाने यमुनातटाकी विहार केला होता. पुष्कळ कालावधी-नंतर असा शुभ योग येतो.'

गायींचा एक कळप वाळूवर चरत होता. यमुनाकिनारी कोवळे गवत मिळेल या आशेने गुराख्यांसह त्या सर्व निघाल्या होत्या.

एक तर यमुनातीर आणि त्यात पुन्हा गोधूल ! आक्कांनी एक मूठभर वाळू उचलली आणि त्या म्हणाल्या, " थट्टा नाही—

**" धूलि नव्हे रे धूलि नव्हे, असे गोपींची पदरेणू,**
**माखिली ही धुली अंगी, नंदाचा नंदन कान्हू. "**

ज्ञानगुध्रीला आलो. ही तीच ज्ञानगुध्री जिथे कृष्णाच्या विरहाने व्याकुळ झालेल्या गोपीचे सांत्वन करायला उद्धव आला होता. त्यांचे सांत्वन करायचे बाजूलाच राहिले, गोपींचे कृष्णप्रेम पाहून उद्धवाने त्यांची पदधूली मस्तकी लावली व तो परत गेला.

हा तोच चीर-घाट. कृष्णाने इथे वस्त्रहरण केले होते. कपडे काढून गोपी यमुनेत स्नानास उतरल्यावर त्यांचे सर्व कपडेलत्ते घेऊन कृष्ण झाडावर लपून राहिला. तो याच झाडावर चढला होता. नाना रंगांचे कपडयांचे तुकडे वाऱ्याने फांद्यांवर उडत होते––इथे आलेले यात्रेकरू आपल्या मनाप्रमाणे कापडाचा तुकडा इथे बांधून जातात आणि ते पाहून त्यांच्या मनात पूर्वीच्या वस्त्र पळवण्याच्या गोष्टी जागृत होतात.

आक्का म्हणाल्या, " आता कृष्णलीला निरनिराळ्या किती पाहणार ? इथला प्रत्येक धूलिकण त्यांच्या स्मृतींनी माखलेला आहे. चला, त्यापेक्षा देवळे पाहून संपवू. या. या दिवसांत नाना वस्त्रालंकारांनी व्रज-गुराखी सजला आहे. हे त्याचे रूप काही नेहमी पाहायला मिळत नाही. "

वृंदावनातील बोळाबोळांतून देव आहेत. जवळ जवळ साडेपाच हजार देवळे आहेत. इथली मुख्य काही निवडून काढली तरीसुद्धा एखादा जाणकार मनुष्य बरोबर असायला हवा, जो या रस्त्यांच्या व घाटांच्या चक्रव्यूहातून आम्हांला बाहेर काढू शकेल. पंड्यांवर विसंबून चालत नाही.

व्रजरमण म्हणाले, " आपण कृपा करून थोडा त्रास सहन कराल, तर माझे गुरुदेव, स्वर्गीय मदनमोहनदास वैष्णव यांच्या कुंजात जाऊन सध्याचे महन्त नित्य-गोपालदासजी यांना बरोबर घेता येईल. "

" वा, हा तर उत्तम प्रस्ताव आहे. "

व्रजरमण पुढे म्हणाले, " परंतु वाट मात्र जरा अवघड आहे. पुष्कळ गल्ल्यांमधून जावे लागते. "

मी म्हटले, " त्यात काय हरकत आहे ! वृंदावनाचा आणखी एक भागही पाहून होईल. "

शहराच्या भरवस्तीतून आम्ही जात होतो. रस्ता दोन्ही बाजूंना पितळ, कासे, लोखंड, पुस्तके, खाद्यपदार्थ, कपडा, गाडगीमडकी, इत्यादी वस्तूंच्या दुकानांनी ठासून भरला होता. अगदी एकमेकांला लागून होती ही सारी दुकाने, एवढीसुद्धा फट दोन दुकानांत नव्हती. या दुकानांच्या मधून अरुंद रस्ता गेलेला होता आणि त्यावरून लोकांच्या प्रवाहाची भरती-ओहोटीची लाट वाहात होती. सबंध रस्ताभर गुलाल उधळला होता. जणू जाड, लाल (जाजमच) अंथरले होते. बोळाबोळांतून लोक पायांनी लाल गुलाल उडवीत चालले होते. जणू काही संध्या वर पाहून हसत होती. डोक्यावरच्या गुलालांच्या मेघांमुळे निळे आकाश झाकले गेले होते. वर, खाली लाल रंगाचाच खेळ; त्यामध्येच ढोल, चिपळ्या वाजवीत रंगांनी रंगलेले व्रजवासींचे दल स्वच्छन्द मनाने नाचत गात चालले होते. पाहावे तिकडे गोड हास्याला जणू उधाण आले होते. बाजूच्या गटारांतून रंगित पाणी वाहात होते.

अरुंदाहून अरुंद अशा बोळांतून हिंडून मदनमोहनदासांच्या उपवनात आलो. बंद असलेला दरवाजा धक्का देताच उघडला गेला. आत शिरून छोट्या अंगणात येऊन उभे राहिलो. लहान लहान अशी थोडीशीच घरे तिथे होती. त्यातल्या एका घराच्या व्हरांड्यात आम्हांला बसण्यासाठी घोंगडी अंथरली गेली. चहूबाजूंना कसा अगदी अंधार अंधार वाटत होता. उपनगरांतील राहण्याच्या जागेचे वर्णन वाचले होते — त्यासारखीच ही सर्व घरे मला वाटली. कुठून म्हणून उजेडाचा झोत आत येतच नव्हता. शहरातूनदेखील गल्लीकुचीत अशी अनेक घरे असतील, याच्यापेक्षा आमच्या खेड्यांतली कुंपणे असलेली झोपडीवजा घरे कितीतरी चांगली. किती हवा, उजेड, असतो तिथे. मामाच्या घरच्या त्या प्रचंड मोठ्या अंगणाची मला आठवण झाली. लक्ष्मी पौर्णिमेच्या रात्री सबंध अंगणभरून काढलेली ती रांगोळी, काय ती त्यांची अप्रतिम शोभा ! पांढऱ्या शुभ्र चांदण्यांत लेकीसुनांना घेऊन या आळीतल्या गृहिणी त्या आळीत आणि त्या आळीतल्या गृहिणी या आळीत रांगोळी पाहायला जात आणि कला-कौशल्याने काढलेल्या कलमीलता, शंखलता, पद्मलता (बंगालमधील

रांगोळ्यांचे प्रकार) पाहून एकमेकींची प्रशंसा करीत, रांगोळीने सुशोभित केलेले माझे ते पूर्वीचे अंगण कुठे गेले ?

समोरच विहिरीवर एक धिप्पाड वैष्णव स्नान करीत होता. स्नान संपवून लांब ओले केस पुशीत पुशीत तो समोर येऊन उभा राहिला. हेच गृहस्वामी नित्यगोपालदास, या उपवनातील गोवर्धन मूर्तीचे पुजारी, पूजाअर्चा सोडून रिकाम्या वेळी ते कुठल्याशा शाळेत शिक्षकाचे काम करतात. अंगात कपडे घालून ते तयार झाले. आमच्या बरोबर येणार होते ते, आम्हीही उठलो; अंगणातून दरवाज्याकडे गेलो.

इतक्यात जाड ओढणी सावरीत सावरीत एक काळी मुलगी धावत आली आणि आत शिरली. पक्ष्यांच्या एखाद्या थव्याची किलबिल जणू तिच्या आवाजात होती. काय उत्साह होता तिचा ! ती म्हणाली, "बिहारीजी तर आज बिहारीजीच दिसताहेत. बडा बढिया दर्शन; सब सोने के सोने ". दोन्ही हातांनी मूर्तीच्या ओसंडणाऱ्या सौंदर्याची ती वाखाणणी करीत होती.

नित्यगोपालदासानी विचारले, "दर्शनासाठी मंदिर खुले आहे ना ? "

मुलगी म्हणाली, "हो, मी आताच तर दर्शन घेऊन तुम्हांला खबर द्यायला धावतच आले. तुम्ही लगेच जा, पाय भराभर उचललेत तर अजूनही मंदिर खुलं मिळेल. लवकर निघा, " असे म्हणून तिने जवळ जवळ आम्हांला ढकलूनच दाराबाहेर काढले. तिला झालेल्या आनंदामुळे तिला काही केल्या शांत बसवतच नव्हते.

काय ती गर्दी ! तीव्र उत्सुकतेने सर्व धावत होते. जणू काही हातची गोष्ट निसटून जाईल. अशी भीती त्यांना वाटत होती. गर्दीमध्येसुद्धा चालण्याची एक नशा असते खरी. त्या सर्वांमध्ये मिसळून जाऊन धक्के देत देत मी पुढे जात होते आणि मला ढकलून दुसरे पुढे जात होते, हेवा दावा काही नव्हता, असेच चालायचे हा जणू नियमच होता.

गर्दीमध्ये एकाच दाराने आत जाता येत होते. तेसुद्धा जसे दुसरे घुसत होते तसेच आम्हीही घुसलो. बिहारीजींचे दर्शन घ्यायचे होते ना, मंदिराच्या समोर मोठे आवार होते, धक्के खात खात जितके पुढे जाता आले तितके पुढे जाऊन जागा पटकावली. नित्यगोपाळ म्हणाले, " इथं आता स्वस्थ उभे राहा, दर्शन बंद झालंय. "

समोर छातीइतक्या उंचीचा व्हरांडा होता आणि तिथे रंगित भारी किमतीचा पडदा लावलेला होता. त्याच्या आत बिहारीजी होते. एकदम पडदा थोडया वेळापुरता उघडायचे, आणि पुन्हा बंद करायचे, स्टेजवरच्या पडद्यासारखेच याला म्हणतात, "झांकी दर्शन ", पळभर बघण्यासाठी इतका वेळ उभे राहण्याची ती

तळमळ – भक्तिभाव आपोआपच उत्पन्न होतो. दर्शनाच्या ह्या लपंडावाचा काय अर्थ तो एक फक्त भक्त आणि परमेश्वरच जाणे. मी मात्र निष्कारण विचार करून मरत होते. नाहीतर हजार हजार लोक इतका त्रास घेऊन वाट बघत का थांबले असते ? आज होता दोलोत्सव, सर्व व्रजवासी आज बिहारीजींचे दर्शन घेणारच हे सर्वांना माहीत होते. तरी ते बिहारीजी किती निश्चित होते.

आता जास्त धीर निघेना, उभे राहून राहून पाय मोडायला आले. एका यात्रेकरूने करुण स्वरात शेजारी उभ्या असलेल्या चिमटाधारी एका साधूला विचारले, " दर्शनाला अजून किती अवकाश आहे ? "

उदास नयनांनी हसून साधू म्हणाले, " और, कुछ तपस्या तो करो जी, दर्शन करने की उत्कंठा जितनी ही बढेगी उतना ही दर्शन का आनंद ज्यादा लूट सकोगे ! "

आक्का म्हणाल्या, " ऐका, आपण सर्व संसारी जीव, नाना भोवऱ्यांमध्ये सदा सापडलेले असतो. परंतु परमेश्वर आपल्याला सोडीत नाही, संधी साधून तो आपल्याकडूनही तपस्या करून घेतो. आजसुद्धा या गर्दीत सापडून देवदर्शन घ्यायचं म्हणून थांबलो आहोत, त्याचाच विचार करतेय – हीसुद्धा तपस्याच झाली असं म्हणायला हवं. "

गर्दीच्या लोटांनी आणखी पुढे ढकलले गेले, पाय घट्ट दाबून उभी राहिले. पण मन काही तयार होईना. मन रिझवण्यासाठी खांद्यावरच्या झोळीतून वही पेन्सिल काढून छातीशी धरली. वाटले आता चटकन वेळ निघून जाईल. परंतु काय काढणार ? काही पाहिले तरी ते मनात भरेना, इकडे तिकडे पाहिले; एकाएकी डाव्या बाजूच्या गर्दीत एका बाजूला श्यामल वर्णाच्या, केस मोकळे सोडलेल्या एका व्यक्तीच्या चेहेऱ्यावर जाऊन नजर खिळली. ओल्या केसांवरून काळ्या काठाच्या साडीचा पदर घेतला होता. चेहेरा करुण दिसत होता. एकचित्ताने ती व्यक्ती समोर एकटक पाहत होती. दुसरीकडे कुठंही लक्ष नव्हते.

वही उघडून रेघा काढणार – मान वर केली, पाहिले; डोळा बंद केला, डोळा उघडला, पुन्हा पाहिले, खूप ओळखीचा चेहेरा, कुठेतरी, केव्हातरी पाहिला होता ! वही बंद केली – पुन्हा उघडली, जाऊ दे झाले. ओळखीचा चेहेरा म्हणून आठवण्याचा काय उपयोग ? हा श्यामल, प्रेमळ चेहेराच मनात राहू दे. काळ्या पेन्सिलीने काळे डोळे रेखाटणार इतक्यात आठवण झाली – अरे, ही तर त्या दिवशी हरिद्वारला ब्रह्मकुंडाच्या किनाऱ्यावर पाहिलेली ती बाई. आम्ही नव्यसाधिका जिच्या तावडीत सापडलो होतो ती.

भीतीने घाबरी झालेली ती स्त्री जरा मागे सरकून उभी राहिली.

माझी एक मोठी वाईट खोड आहे. गोष्ट ऐकता ऐकता मी गोष्टीतलेच एक पात्र होऊन जाते. त्यांच्या भावना माझ्या चेहेऱ्यावर व डोळ्यात दिसू लागतात. त्या स्त्रीच्या वर्णनातील, 'तांडवनृत्य', 'ऊग्र साधना', 'विश्वग्रासी' या गोष्टींच्या उल्लेखामुळे माझे दोन्ही डोळे थोडचा वेळापुरते फिरायला लागले.

विश्वासाने ती जिच्याजवळ येऊन उभी राहिली तिच्या डोळ्यांतमुद्धा तीच नजर, जी नजर पाहून कायमचा आसरा सोडून, भीतीने ती या अनोळखी धर्मशाळेत तहान, भूक, निद्रा कशाची पर्वा न करता निघून आली ती, तीच नजर इथेही !

एक क्षणभरच माझी तशी स्थिती झाली. दुसऱ्याच क्षणी मी माझी नजर कोमल केली, तोंडावर हसू आणले; परंतु त्या स्त्रीची भीती काही केल्या जाईना. तिचे तोंड सुकून गेले होते. दोन्ही हातांच्या मुठी छातीवर घट्ट धरून माझ्या डोळ्यांकडे ती पुन्हापुन्हा पाहात होती. शेवटी अशक्य होऊन लोकांच्या गर्दीचे निमित्त काढून बावरलेल्या मला बाजूला टाकून ती गर्दीत जाऊन दिसेनाशी झाली.

ठण्ठण्, घंटानाद होताच लोकांची चलबिचल झाली. 'जय जय' काराच्या नादांनी चारी दिशा घुमू लागल्या. समोरचा पडदा उघडला.

" सब सोने के सोने. " रत्नजडित वस्त्राभरणे लेवून, राजाला योग्य असा साज करून, लाल रंगाच्या सिंहासनावर, फुलांच्या हिंदोळ्यावर बसून बिहारीजी झोके घेत होते, डोळ्यांसमोर दिसत होते.

रत्नमाणकांच्या तेजाने डोळे दिपून जात होते. तिथले पुजारीसुद्धा आज खास सजले होते. ते रंगित रेशमी सोवळी नेसले होते. गळचात रंगित उपरणे, अंगांत टसरचा अंगरखा (मिरजाई), कपाळी चंदनाचा टिळा, गोऱ्या कांतीवर त्याची शोभा विशेष दिसत होती.

बिहारीजींना पाहातो न पाहातो, तोच पडदा पुन्हा पडला. थोडचा वेळाने पुन्हा उघडला, पुन्हा पडला, पुन्हा पुन्हा उघड-बंद, उघड-बंद असे चालले होते. बिहारीजींना जास्त वेळ खुले ठेवीत नव्हते. कारण, पूर्वी एकदा मथुरेला पळून गेले होते तसेच पुन्हा पळून गेले तर ? त्याशिवाय भक्तांच्या दृष्टीनेही त्याचे एक वेगळे महत्त्व आहे. दर्शनामध्ये हा अडथळा निर्माण झाल्यामुळे दर्शन घेण्याची इच्छा आणखी वाढतच जाते. अडचणी येणाऱ्या इच्छाच तीव्र होत जातात. खरा आनंद

नजरेचे काय आकर्षण असते कळत नाही. कुणीतरी जसे काही तिचे तोंड माझ्याकडे फिरवले, नजरेला नजर भिडताच गालातल्या गालात हसून त्या भयंकर गर्दीतूनही वाट काढून ती माझ्याजवळ आली. आणि म्हणाली, " हरिद्वारला जास्त दिवस राहता आलं नाही. ते येऊन घेऊन गेले, इथं पुन्हा परत आले. या वेळीसुद्धा न सांगताच आले, सांगितलं तर अडचणी उभ्या करतात. पण मन ओढ घेतं, काय करणार मी ?" अगदी मला चिकटून मान वर करून ती उभी राहिली; मला ती फार आपली अशी वाटली. मी विचारले, " कुठं उतरली आहेस ? "

" आहे एका धर्मशाळेत, परंतु पहिल्यानं आल्यावर उतरले होते आनंदमयी मांच्या आश्रमात, त्या तर म्हणाल्या की माझ्याकडंच राहा, परंतु मला राहता आलं नाही. त्यांची साधना – अरे बापरे ! अहो, आश्चर्याची गोष्ट काय ती माहीत आहे ? कितीतरी जणांची मला दीक्षा देण्याची इच्छा होती. जो पाही तो म्हणे, मी तुला मंत्र देतो, पण माझं मलाच पक्कं नीट ठरवता येईना. या आनंदमयी मा तर मला म्हणाल्या होत्या – चांगल्या घरची मी सून होते, कुठल्या मुहूर्तावर त्यांची भेट झाली देव जाणे – हो, तर त्या काय म्हणाल्या होत्या. तुझ्यामध्ये साधना आहे. तू माझ्याकडे येऊन राहा. तेव्हापासून माझं मन कसंतरी झालंय. घरी टिकतच नाही. का कोण जाणे पण त्यांच्या साधनेची पद्धत माझ्या मनाला पटत नाही. आताच तर जाऊन आले, एका दिवसापेक्षा जास्त राहता आलं का ? "

अशी काय साधनेची पद्धत असेल ? कळून घेण्यासाठी मन उत्सुक झाले. परंतु आम्ही ' नव्यसाधिका ' आम्हांला काहीसुद्धा माहीत असणे शक्यच नाही. आपला मानच आपल्याला अडवतो. मान राखून ठेवण्यासाठी मनात उत्सुकता होती तरी गप्प बसले. तरी ' हो नको ' करता करता शेवटी आक्कांनी स्पष्ट विचारलेच, " बरं, आनंदमयी मां' ची साधना आहे तरी कोणत्या प्रकारची ? "

" त्यांची साधना ? " जसं काही कुणी तरी तिला पकडायलाच जात होतं. दोन्ही हातांनी स्वतःच्या तोंडापाशी आडोसा करून ती म्हणाली, " भयंकर प्रकारची आहे. सहन करता आली नाही म्हणूनच तर निघून आले. "

आक्कांनी विचारले, " मां'ची पूजा भक्त कशी करतात ? "

" नाही नाही, ते मला सांगता यायचं नाही. भीतीनं छाती धडधड करते. ओल्या केसांनी, हात वर करून गोल फिरून तांडवनृत्य – जणू नन्दी-भृंगींचं पथकच. ऊग्र तपस्या– सर्व विश्वाला ग्रासून टाकणारा भाव – असे, असे अगदी आपण आता डोळे केलेत असेच सर्वांचे डोळे – बापरे बापरे बाप ! "

इच्छापूर्तीत नसतो तर त्या इच्छेमध्येच असतो. म्हणून तर वैष्णवगण इच्छा तीव्र करण्यावरच विशेषेकरून जोर देतात.

मी दोन्ही डोळे उघडले आणि तो श्यामल चेहेरा शोधीत शोधीत बाहेर आले. मनाला सारखी टोचणी लागली होती. त्या स्त्रीला मला पाहून फार बरे वाटले होते. मग क्षणभरात काय झाले? फार जवळची गोष्ट दूर निसटून गेली. तिला मी जशी दिसले तशी मी नव्हते हे मी तिला सांगू शकले नाही. निष्कारण भीतिग्रस्त झालेला तिचा चेहेरा मला सदैव यातना देत राहिला.

बांकेबिहारी, राधारमण, श्यामसुंदर, राधामाधवश्याम, राधावल्लभ सर्व एकच. जवळ राधा मात्र नाही. पूर्वी वैष्णव फक्त कृष्णाची पूजा करीत. एका कृष्णभगवानाशिवाय ते कुणालाच मानत नसत. राधेलादेखील ते सहन करू शकत नव्हते.

शशीमहाराज म्हणाले होते, "स्वयंपाक करता करता सनातन साधनेमध्ये मग्न होऊन जात. विस्तव विझून जायचा. बालिकेच्या वेशात राधा यायची आणि फुंकर घालून विस्तव फुलवायची; धुरामुळे डोळ्याला पाणी यायचं. पण त्रासून तिला घालवून द्यायचे. ते म्हणायचे, 'स्वयंपाक करपून जाईल, जाऊ दे, कच्चा राहिला तर राहू दे. देव तोच खाईल, तू जा.' म्हणून सांगतो की या सर्व भक्तांनी राधेला टिपं गाळायला लावली होती!"

श्रीकृष्णाजवळ राधेला प्रथम स्थान दिले ते नित्यानंदांची गृहिणी माता जान्हवी हिने. प्रथम पुष्कळ अडचणी आल्या. परंतु जान्हवीजवळ शास्त्र व तर्क या बाबतीत पराभूत होऊन सर्वांनी आपल्या हरकती काढून घेतल्या. त्या जितक्या पंडित होत्या तितक्याच शक्तिशालीसुद्धा होत्या. त्या वेळचे सर्व वैष्णवांचे प्रमुख पंडित जीवगोस्वामी यांनी सर्व वैष्णवांसह जान्हवीकडून समग्र भागवत ऐकले होते.

पुत्र वीरचंद्र प्रभू– 'चैतन्य-भक्ति-मंडले जिहो मूल स्तंभ'–ते जेव्हा दीक्षा घेण्यासाठी अद्वैत प्रभूजवळ जायला निघाले तेव्हा आईनी त्यांना बोलावून घेतले. त्या म्हणाल्या, "बाबा, तू दीक्षा घेण्याकरिता आचार्य प्रभूंजवळ का जातोस? मीच तुला दीक्षा देते–तयार होऊन ये."

गोष्ट किंवा गाथा अशी आहे की, जान्हवीने बोलावल्यावर पुत्र वीरचंद्र जेव्हा आईजवळ आले तेव्हा माता जान्हवी जप करीत होत्या. तरुण मुलाला समोर पाहून त्यांनी डोक्यावर पदर घेतला परंतु आश्चर्यचकित होऊन वीरचंद्राने पाहिले, दोन हातांत जपमाळ घेऊन आई जशा बसलेल्या होत्या तशाच होत्या. तेव्हा

योगैश्वर्यसंपन्न मातेच्या पायांवर त्यांनी लोटांगण घातले.

त्याच माता जान्हवीच्या कृपेमुळे आज कृष्ण राधेला जवळ घेऊन बसतो.

आज वृन्दावनामध्ये राजैश्वर्य पसरले आहे. कुठं हिऱ्याचे डोळे, कुठं हिऱ्याचा मुकुट, कुठं हिऱ्याच्या बांगड्या, हार, कुंडलं, बासरी एक ना दोन असंख्य हिऱ्या-मोत्यांचा सडाच चहूकडे.

मी पाहात पाहात चालले होते.

गच्चीवर म्हातारी, तरणे, पोरे, प्रौढ सर्वजण रंगांनी भरलेल्या घमेल्यातून पिच-कारी भरून बसले होते. ओळखीचे – बिनओळखीचे असा काही भेदभाव नव्हता. रस्त्यावरून जाईल त्याच्या अंगावर अचानक कुठूनवरी रंगित फवारा पडायचा.

घुंघट घेतलेल्या स्त्रियांच्या अंगावर, तोंडावर, बाजूंनी जाता जाता व्रजवासी मोठ्या कौतुकाने मूठभर गुलाल फेकीत होते.

मी रस्त्यावर पाहिले. भगवानदास अगदी खुशीत हसत हसत भराभर येत होते. ते म्हणाले, " पुढं जा, व्रजमाईंचा खेळ सुरू झालाय. पाहून या. "

आज दुपारी गोविंदजीच्या मंदिरात ' भंडारा ' होता. इतक्या सर्व लोकांची जेवणाखाण्याची जबाबदारी भगवानदासांवर होती. दुपारी त्या वाटेने येताना, सर्व देखरेख करतानाची त्यांची धावपळ पाहिली होती. त्यांना विश्रांती म्हणून नव्हतीच. [illegible] सर्व [illegible] फुरसत [illegible] [illegible] ते व्रजमाईंचा खेळ पाहायला गेले होते.

[illegible] क्रीड[illegible] [illegible] मी मणि[illegible] [illegible]. ते म्हणाले होते, " तुम्ही ही गोष्ट पाहिली नाहीत म्हणज तुम्ही पाहिलं तरी काय ? होळीच्या दिव-सात हातात काठ्या घेऊन बरसानेहून पुरुषांना मारण्यासाठी येतात. परंतु पुरुष उलटून मारीत नाहीत; ते मार खातात. एवढंच नाही तर मार खाऊन नंतर ज्या मारतात त्यांनाच ते मिठाई देतात. "

मी आक्कांना खुणावले. " इतकी वर्षं तुम्ही संसार केला, एखाद्या दिवसाचं शल्य मनात टोचत असेल तर त्याचा वचपा काढायला ही छान सुवर्णसंधी आहे. आजच्या या खेळाच्या पद्धतीमुळे दोन्ही एकत्रच साधता येईल. "

" उठा, उठा लवकर, या व्हरांड्यात या, " असे म्हणून दादांनी हातांनी ढकलून रस्त्याच्यामधून आम्हांला बाजूला केले, सुंई–, सुंई–, करीत एक काठी तिथेच येऊन पडली—व्रजमाईंच्या हातची काठी.

दादा म्हणाले, " रस्त्यात उभे राहून गप्पागोष्टी करता, वीरांगनाच की नाही सर्व ? ही काठी तुमच्या पाठीवरच पडली असती म्हणजे ? थोडक्यात वाचलात ! "

रस्त्याच्या दोन्ही कडांला लोक उभे होते. लेकीसुना, मुलेबाळे सर्व मिळून. जणू काही ढाक्क्याची मिरवणूक पहायला सर्वजण जमले होते. या गर्दीमध्ये जी जागा सापडेल, तिथे रस्त्याच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत हातात काठ्या घेऊन व्रज-माई धावपळ करीत होत्या. त्यांच्या चकाकणाऱ्या जड घागऱ्यांच्या मोठ्या लाटा त्यांच्या पायांतील वजनदार तोड्यांवर पडत होत्या. त्यांच्या चालण्याच्या लयी-प्रमाणे कमरेचा भारी करदोटा वर खाली नाचत होता. दंडावरचे बाजूबंद हाता-तील बांगड्यांबरोबर सूर जुळवून रुणुझुणू, रुणुझुणू गात होते. अंगठ्या आणि हस्त-पद्मांनी झाकलेल्या हातात काठ्या घेऊन, रंगित घुंघट डाव्या हाताने थोडा बाजूला करून माई द्रुत गतीने चालल्या होत्या. जर व काच यांच्या झळझळाटाने साऱ्या रस्ताभर बिजलीचा नाच चालला होता. जणू काही झिरझिरित ओढणीने एकत्र अवगुंठित केलेले आनंदाचे तुफानच.

पुरुषमंडळीही आपापल्या आवडीप्रमाणे मनमोहक साज चढवून सजली होती. अंगात बाराबंदी घातली होती, डोक्याला पागोटे बांधले होते. मार चुकवण्यासाठी त्या सर्वांनी हातांत सहा हात लांब काठ्या घेतल्या होत्या. परंतु जोडीदारणीकडून आज हार खाणार याच आनंदाने ते मनोमन भारावून गेले होते. हसतमुखांनी काठी पुढे करून मार चुकवीत चुकवीत ते मागे हटत होते—कुणी घाईने, तर कुणी साव-काश, तेवढ्यानेही व्रजमाईंना समाधान नव्हते. जे कोणी दूर होते त्यांच्या अंगांवर त्या काठ्या फेकून मारीत होत्या. कोण, कुठे असेल त्याच्यावर. कशाचा म्हणून विचार करीत नव्हत्या त्या. हे पाहून सारे दर्शक खळाळून हसतात. नंदग्रामचे पुरु-षही हसतात.

बरसानेची राजकुमारी राधा हिला नंदगावचा गुराखी कृष्ण रडवायचा, गोपींना ते सहन व्हायचे नाही. रागाने त्या पुरुषांना ठोकण्यासाठी नंदग्रामला धावत यायच्या. तो रिवाजच आतापर्यंत तसाच चालत आला आहे. सर्वांच्या उत्साहाने आनंदाला उधाण येते. त्याच पूर्वीच्या लीला ते डोळ्यांनी पाहतात.

यमुनेचा तीर जवळच होता. व्रजमाईचा खेळ पाहून मोकळ्या हवेत येऊन थोडे उभे राहिलो. साधूंचे भस्मचर्चित कपाळ आज गुलालाने रंगले होते. पांढऱ्या शुभ्र वाळू-वर जणू काही उदयकालच्या शेकडो अरुणांची धावाधाव चालली होती.

इथे चार वटवृक्ष होते. पंचक्रोशीला प्रदक्षिणा घालताना ते वाटेत लागतात.

एक आहे बन्सीवट. या वृक्षाखाली उभे राहून, मुरली वाजवून कृष्ण कन्हैया

राधेला साद घालीत असे. नंतर याच ठिकाणी तो गोपींबरोबर रासलीला खेळला होता. दुसऱ्या कुणालाही ती रास पाहायची परवानगी नव्हती. शिवाला राहवेना गोपीचा वेश घेऊन तो लपून आला. त्या वेळेपासूनच गोपीश्वर शिव या नावाने इथे शेजारीच शिव आहे.

दुसरा विश्रामवट. कुरणामध्ये गायी सोडून राधेला बरोबर घेऊन कृष्ण इथे विश्रांती घेई.

तिसरा शृंगार-वट. या वृक्षाखाली कृष्ण स्वतःच्या हातांनी राधेला चंदन-कुंकुम लावून सजवीत असे. शृंगारवटाच्या जवळच दोन बकुळीची झाडे आहेत. एक सरळ-सोट उभे आणि दुसरे त्याच्या अंगावर रेललेले. दोन्ही झाडांना फुले येतात. पण फळे फक्त एकाच झाडाला येतात. झाडाच्या फांद्यांनी मूर्तीचे मंदिर झाकले जाते असे पाहून दोन्ही झाडे कापून टाकायचा संकल्प पुजाऱ्यांनी केला. त्याच रात्री त्यांना स्वप्नात आदेश मिळाला, "आम्हांला कापू नका, आम्ही दोघे पतिपत्नी आहोत. वृक्षरूपांत तपश्चर्या करीत आहोत."

आणखी हा आहे अद्वैतवट. अद्वैत महाप्रभूंची भजनाची ही जागा.

अजूनसुद्धा ही जागा फार निर्जन, मनोरम आहे. मातीचाच ओटा, पांढऱ्या मातीचे अंगण, जीर्ण झालेल्या कडुनिंबाची हलकी सावली, सर्व मिळून कसे शांत, शीतल वातावरण बनले आहे.

मातीच्या लहानशा व्हरांड्यात बसून मी म्हणाले, "पाणी हवं प्यायला." पाणी प्यावेसे अगोदर वाटलेही नाही. एकदमच जाणीव झाली. तहान लागली होती. पाणी प्यावे आणि शांत व्हावे. या अशा जागेतच तर तहानलेल्यांनी पाणी प्यायला हवे

पुजाऱ्यांनी पितळी तांब्याभर पाणी दिले. घटाघट सर्व पिऊन मी उठून उभी राहिले.

•

एक अतिशय वृद्ध, गौरवर्णी ब्राह्मण, तुटलेले दोन्ही हात समोर पसरून. बोळक्या तोंडाने हसत हसत गात गेला—

**"व्रजधूलीमध्ये झाली नाही रतिलीला हाय रे हाय."**

मदनमोहनदासच्या उपवनात पाहिलेल्या काळ्या मुलीने आम्हांला गाठले. ती म्हणाली, "निधूवन, निकुंजवन, ही राधाकृष्णांची नित्य लीलास्थळे आहेत. त्या निकुंजवनात निघाले आहे, येणार ? हे इथं, जवळच आहे."

दिवस मावळायला आला होता. दिवसाचा प्रकाश म्लान झाला होता. अशा वेळी

आम्ही निकुंजवनात शिरलो. वन म्हणजे वनच. सगळीकडे नुसती झुडपेच झुडपे होती. त्यांच्या बाजूने पांढऱ्या मातीची अरुंद, वेडीवाकडी पायवाट चकाकत गेली होती. कुठे अंग चोरून, कुठे मान खाली करून चालत जात. झुडुपामध्ये लपलेल्या एका घरात जाऊन आम्ही उपस्थित झालो. समोरच छप्पर असलेला ओटा होता. इतक्या छोट्या जागेत किती माणसे गर्दीने बसली होती—त्यात जास्त करून नाना देशाच्या स्त्रियांचाच भरणा होता. त्यांनाच जणू तिथे महत्त्व होते. पुरुष मागच्या बाजूला उभे होते. इथेसुद्धा ' झांकी दर्शन ' व्हायचे होते. जमलेल्या सर्व लोकांना उत्कंठेने वाट बघत बसायला लावून पुजारी सावकाशपणे काठ्यांना तुपात भिजवलेला कापूस लावून लहान लहान मशाली तयार करीत पडद्यासमोर बसले होते. तोंड मिटून बायका आणखी किती वेळ बसू शकणार ? हातांनी टाळ्या वाजवून त्यांनी निरनिराळ्या सुरात भजन म्हणायला सुरुवात केली.

समोर बसलेल्या मारवाडी बाईच्या हातावर काय सुंदर मेंदीची नक्षी होती ! या बायका वाटलेल्या मेंदीने अशी नक्षी काढतात का कोणत्यातरी प्रकारचा रंग लावतात कुणास ठाऊक ? मला आठवण झाली. एक दिवस ईदच्या सणाआधी मेंदीची पाने नेण्यासाठी हनीफची आई आली होती. ती म्हणाली होती, " आमच्यामध्ये या सुमारास लहानमोठे, म्हातारेकोतारे सर्वांनीच मेंदी लावायची असते. आमच्या धर्मात तसं सांगितलं आहे."

मी विचारले, " कशी लावता तुम्ही मेंदी ?"

कशी कुणास ठाऊक, लहानपणी एकदा मेंदी लावायची हौस वाटली होती. दोघी बहिणींनी मिळून मेंदीची पाने खुडून व्हरांड्यात दगडाने वाटून हातापायांना फासली, पण रंगलीच नाही. त्याच्या बदल्यात आईच्या हाताचा मार मात्र चांगला खाल्ला. रडत रडत पाणी टाकून व्हरांडा धुऊन स्वच्छ केला. म्हणून हनीफच्या आईला म्हटले. " मला शिकवा ना, मीसुद्धा हातापायांना मेंदी लावीन."

त्या म्हणाल्या, " तुम्हांला जमणार नाही, ते तुमच्याच्याने होणार नाही. एक दिवस मी स्वतः येईन आणि मेंदी वाटून तुझ्या हातांना लावीन. बिबी फातिमाचा आम्हांला वर आहे ना. तुम्ही लावलीत तर रंग खुलणारच नाही. हीच तर आता मेंदी लावायची वेळ. नंतर बिबी फातिमा वडिलांच्या घरी निघून जाईल आणि मग मेंदीला रंग येणार नाही. त्या पुन्हा सासरी परत आल्या म्हणजे मग पुन्हा मेंदी रंगते. आमचा धर्म का सोपा आहे ? फार कडक नियम आहेत त्यात."

निकुंजवनात अजूनही गाणे चालले होते.

या त्यांच्या गाण्याच्या किंचाळण्याने कुंजवनातील शांतता कुठच्या कुठे गडप झाली.

कुंजवनाभोवती असलेल्या वाटेने फिरत फिरत बाहेर येत होते-- राधादासी बोलत बोलत बरोबर चालली होती-- " हा आहे ललिताकुंड, नाचता नाचता ललितांना तहान लागली, तर त्या कृष्णाला म्हणाल्या, " लवकर पाणी आणून द्या. "कृष्णाला तेव्हा कुठं पाणी मिळणार ? ताबडतोब हातातल्या बासरीने उकरून त्यानं कुंड तयार करून दिलं, ललितांनी पाणी पिऊन तहान भागवली."

" ही मुक्तालता. माता यशोदेच्या कानातील मोती श्रीकृष्णानं इथं पेरले होते. त्यांमधून ही लता उगवली. व्रजदेशांत तुम्हांला लताच जास्त पाहायला मिळतील, झाडं जास्त दिसणार नाहीत. सर्वच सखीभाव. वृंदावनातील पानं वेली पाहायला फारच बरं वाटतं."

" आणि हा झाला तमालवृक्ष. लोणी खाऊन याच झाडाला हात पुसले होते. हे पाहा या झाडाला कसं भोक पडलं आहे. ते आणि हे जे झाडावर अंड्यासारखं उगवलेलं दिसतं ते आहेत शाळिग्रामाचे दगड."

" माहीत आहे का, इथं संध्याकाळनंतर कुणी राहू शकत नाही. सेवाकुंज आहे ना हा. रोज रात्री क्रीडा करायला कृष्ण इथं येतो. त्या वेळी ती स्वतः कुंजाचा दरवाजा आतून बंद करून घेते. आता येताना वाटेत जी इतकी माकडं पाहिलीत, तीसुद्धा इथं थांबणार नाहीत. एक पोपटसुद्धा, कुणी लपून राहिला तर त्याच्या प्राणाशी गाठ असते. एकदा एका साधूला कृष्णलीला पाहण्याची हौस वाटली. तो इथंच लपून राहिला. त्यानंतर जरा रात्र झाली नाही तोच कुणी तरी त्याला ढकलून भिंतीवरून बाहेर फेकून दिलं. कुणी ते त्याला सांगता आलं नाही, तो फक्त एवढंच म्हणत होता की, " माझ्या अंगाला कशाची तरी झळ लागत आहे, सर्व आग आग होत आहे." असं सांगतात की तो बिचारा तडफडून तडफडून मेला."

" आणखी एकदा एक भक्त लीला पाहण्यासाठी लपून राहिला. राधा त्याला म्हणाली, बरं आहे, तू भक्त आहेस, पाहायचं तर पाहा; पण कुणाला काही सांगू नकोस."

दुसऱ्या दिवशी पहाटेच येऊन तिनं त्याला गाठलं आणि विचारलं, " काय रे, काय पाहिलंस ? सांग ना ? भक्त बोलायला गेला तर तो मुका झाला. लिहून दाखवून सांगायला गेला तर हात लुळा पडला; डोळ्यांनी खुणा करून सांगायला गेला तर

त्याचे डोळेच गेले. एक एक करून सर्व जाता जाता शेवटी तो भक्त मरून गेला.''

नीलागोविंद, राधादामोदर, नीलमाधव, बन्सीवदन हे सर्व श्यामसुंदरजवळ पाहून आलो. प्रत्येक देवळात चल आणि अचल अशा दोन मूर्ती असतात. अचल मूर्ती मंदिरात कायम, अढळ असते आणि त्याची प्रतिनिधी चल मूर्ती अशा उत्सवादी प्रसंगी बाहेर येऊन सर्वांना दर्शन देते. ज्याला जितका वेळ शक्य आहे तितका वेळ उघडया व्हरांडयात चल मूर्ती डोळे भरून पाहून मनीची आस पुरवतो. इथेसुद्धा तेच. मंदिरांच्या समोरच्या कठडा असलेल्या व्हरांडयात चल श्यामसुंदरची मूर्ती होती. आज सर्वांनीच त्याच्या अंगावर गुलाल उधळला होता. गुलालाच्या लाल रंगाने सारा व्हरांडा आच्छादून गेला होता. मी मूर्तीला प्रणाम करून परत येत होते. कठडयाला टेकून एक प्रौढ विधवा उभी होती. डाव्या हातात असलेल्या एका छोटया पुडीतून एक चिमटी गुलाल घेऊन ती श्यामसुंदरला म्हणाली, ''तुझ्या दोन्ही पायांवर थोडा गुलाल लावते.''

गोविंदजीच्या शेजारीच राधागोविंदचे मंदिर होते. शहराचा मुख्य भाग सोडून आम्ही बोळातून जात होतो. लवकर पोचायला हवे होते ना. बायका धावत धावत जात होत्या, ''अगबाई, श्रीराधेला जशा जटिला-कुटिला त्रास देणाऱ्या तशाच मला-सुद्धा. सहजासहजी बाहेर पडता येणार आहे का?'' असे आपल्या मैत्रिणीला म्हणत लाल काठाची साडी नेसलेली एक स्त्री मला धक्का मारून पुढे गेली.

मंदिराच्या दोन बाजूंला दोन जिने होते. एक आत जायला व दुसरा बाहेर यायला. त्याशिवाय गर्दी आवरणे शक्य नव्हते. एक वैष्णवी जाता जाता दुसरीला म्हणत होती ते मी वाटेने येताना ऐकले, ''श्रीराधाची काय लीला! आज त्या सुरेख कपडे लेवून सजल्या आहेत; आज चरणदर्शन घडलं तर मन शांत होईल.''

परंतु हा सुबल-वेश कुठे आहे? हीं तर सरळ सरळ साडी नेसलेली राधा. एरवी वाटते पायापर्यंत घोळदार घागरा असतो. एक पाऊल पुढे टाकून जरा पुढे जाऊन उभे राहण्याचा मी प्रयत्न केला. पाठ उघडी असलेली एक काळी स्त्री तोंडाने आग पाखडीत मागे झाली, ''फुटक्या कपाळाची, मला शिव्या देते, म्हणते रांड, मी विचारत्ये, तुला नवरे किती ग?''

ह्यांची काय भानगड होती कोण जाणे? ती हात जोडून राधागोविंदसमोर जी उभी होती तिलाच म्हणाली वाटते--तिचे ते बोलणे ऐकून तिने हसून हाक मारली. ''ये इकडं ये, किती ते, बघून जा.''

मानसिंहाचे मंदिर पाहून रुंद जिन्यावरून खाली मोठ्या रस्त्यावर आली. निरभ्र आकाशातील गोल चंद्रमा अगदी समोर दिसत होता. जणू काही निळ्या रंगाच्या साडीच्या पदराने झाकलेला श्रीराधेचाच मुखचंद्रमा.

चांदणे ओसंडून पडलेल्या या वाटेवरून त्या वाटेवर मी घरात फिरत होते. अंगावरची खादीची साडी चांदण्यामध्ये धबधबित दिसत होती. हात उलटेसुलटे करून पाहिले, पदराने तोंड जोरात घासून पाहिले, कुठेसुद्धा रंग लागत नव्हता. बाहेर सर्व स्वच्छ होते.

घरी परत आल्यावर लाल रंगाचे डाग पडलेले टसरचे नेहरू जॅकेट काढता काढता दादा म्हणाले, "कपाळाला आठ्या घालून रस्त्यानं अशी चालली होतीस, की तू बहुतेक ब्राह्मो असणार असंच सर्वांना वाटलं."

न्हाणीघरात जाऊन पाहिलं. कोरडा गुलाल छाती जवळून झरझर खाली पडला. कुणीतरी अंगावर फेकला होता. मला कळलेच नव्हते.

कुम्भमेळा चार जागी भरतो हे मला माहीत होते; परंतु वृंदावनालासुद्धा कुम्भ भरतो हे मला माहीत नव्हते. या वेळीच ते ऐकले.

रूप गोस्वामींनीच याची सुरुवात केली. त्यांनी कुम्भमेळ्याच्या प्रमुख व्यक्तींना विनंती केली की श्रीधाम वृंदावन ही श्रीराधागोविंदाच्या नित्य विहाराची जागा आहे. पद्मपुराण आणि भागवतामध्ये याचा महिमा वर्णिलेला आहे. विशेष करून हे महाप्रभूंचे आदराचे स्थान आहे. अतएव वृंदावनालासुद्धा कुम्भमेळ्याचे अनुष्ठान होवो.

सुरुवातीला त्यांनी हरकती घेतल्या. ते म्हणाले, "स्मरणातीत काळापासून जे होत आलं आहे त्यात परिवर्तन किंवा परिवर्धन करणं असंभवनीय आहे."

तेव्हा रूपनी शास्त्राधार देऊन कुंभ सुरू करण्याचे प्रयोजन प्रतिपादन केले. आचार्यांना त्यांचे म्हणणे नाकारता आले नाही. असे ठरले की, दर तीन वर्षांनी चार ठिकाणी जसा कुंभमेळा भरतो तसाच भरणार. त्यात फरक होणार नाही. परंतु ज्या वर्षी हरिद्वारला पूर्णकुंभमेळा होईल त्या वर्षी वृंदावनालासुद्धा कुंभस्नानाचा योग राहील. एक महिना आधी वृंदावनाला साधूंचे संमेलन होईल आणि त्यासाठी ते एकत्र येऊन व्रजपंचक्रोशीला प्रदक्षिणा घालतील आणि श्रीपंचमी, एकादशी व दोल पौर्णिमेला विशेष योग म्हणून यमुनेत स्नान करतील. तीच व्यवस्था आजपर्यंत चालत आली आहे. सर्व संप्रदायांचे साधू, महात्मा, दर बारा वर्षांनंतर इथे एकत्र

जमतात आणि दोल पौर्णिमेला अखेरचे स्नान करून हरिद्वारला परत जातात.

अशक्य होते ते केवळ एका रूपमुळेच शक्य झाले. तरीपण ते विनयाचे अवतार होते. महापंडित रूपनी स्वतःच्या नावामागे गोस्वामी असे नामाभिधान कधीही लावले नाही. असे म्हणतात की, ' भक्तिरसामृतसिंधू ' नावाच्या ग्रंथात त्यांनी आपले नाव ' बराकरूप ' म्हणजे क्षुद्ररूप असे दिले आहे.

वनमहाराजांची कुटी हीच ना ?

आक्का म्हणाल्या, " चला, आत जाऊन त्यांचं दर्शन घेऊन येऊ. कळलं का ? इथल्या सर्व महात्म्यांमध्ये हे एक अत्यंत थोर भजननिष्ठ महात्मा आहेत. यंदा यांच्याच प्रयत्नामुळं इतके साधू इथं जमले आहेत. त्यांनी मनावर घेतलं नसतं तर झालं नसतं. स्वतंत्र देशाच्या सरकारनं कळवलं की मेळचामध्ये हत्ती आणता येणार नाहीत, गांजा खाता येणार नाही, पटकी व देवीप्रनिबंधक लस टोचल्याशिवाय कुणाला येता येणार नाही. हे ऐकून सारे साधू चिडलेच, हत्ती, लस टोचणं, इंजेक्शन या गोष्टी समजू शकतात. परंतु गांजा नसला तर हे कसे राहणार ? इथली ही कडाक्याची थंडी, निसर्गाचा इतका प्रकोप, या गोष्टींना तोंड द्यायला निराश्रय साधूंना या गांज्याचाच तर एकमेव आधार असतो. शेवटी वन-महाराजांनी साधू व शासनकर्ते यांच्या मध्ये पडून मध्यस्थी केली. त्यांना हत्तीही आणता आले, गांजापण चालला आणि इंजेक्शन व देवीची लस टोचणे तर रस्त्याच्या वळणावळणावर चालले आहे; तुम्ही पाहिलंतच की, सर्टिफिकेट दाखवता आलं नाही तर एकालाच कितीदा तरी भोसकतात. "

वन-महाराज कुटीत नव्हते. यमुनेच्या तीरावर साधुमंडळींमध्ये गेले होते. आताच तर यमुनातीरावरून फिरून आलो, पुन्हा जायचे इतके दूर ?

आक्का म्हणाल्या, " राहू दे मग, दर्शनाचं भाग्य आपल्या नशिबी लिहिलेलं नाही. नशीब म्हणायचं अन् गप्प बसायचं तेच चांगलं. "

भव्य दरवाजा होता. दगडी कोरीव काम केलेले. लाला बाबूंच्या मंदिराचा कळस कितीतरी दुरून दिसतो. अशी आख्यायिका आहे की, एक दिवस त्यांच्या जमीनदारीच्या कामासाठी लालाबाबू बाहेर पडले. एका मातीच्या घरात धोब्याची मुलगी तिच्या वडिलांशी बोलत होती, ते त्यांनी ऐकले. धोब्याची मुलगी म्हणत होती, " बाबा, वासना पेटवा ना, उशीर होतो. " त्या प्रांतात भट्टीला वासना म्हणतात. त्यांचे बोलणे कानी पडताच लालाबाबू चमकले. " तेच की ! धोब्याची मुलगी

बरोबरच सांगत आहे. माझा जीवनसूर्यसुद्धा अगदी अस्तास जायला आला आहे, पण आजपर्यंत मी काही वासनेला आग लावली नाही ! काय करू ? " विचार करता करता बेचैन होऊन ते वृंदावनाला धावत आले, त्यांना सद्‌गुरू हवा होता.

पुष्कळ परीक्षा घेतल्यावर, सर्व गर्व चक्काचूर करून धुळीत मिसळून टाकल्यावर कुठे लालाबाबूंवर गुरुकृपा झाली. ती एक आणखी अद्‌भुत कहाणी आहे.

या मंदिरात रोज उत्तम प्रसाद करतात. रोज संध्याकाळी पंचवीस कंगाल इथे जेवतात. ही व्यवस्था कायमची म्हणून केलेली आहे.

वाटेतच लालाबाबूंचे कुंजवन लागले. श्रीमा जितके दिवस वृंदावनाला होत्या तितके दिवस त्या इथे येऊन राहिल्या होत्या.

जगदानंद स्वामींनी अगोदरच सांगून ठेवले होते, "घर बहुतेक बंदच असते. फारसे लोक येतच नाहीत, विशेष कुणाला माहीतही नाही. पुजाऱ्याला सांगून कुलूप उघडून घर पाहून या."

लतावेलींनी आच्छादलेले अंगण आणि दुमजली घर या खुणा लक्षात ठेवून ते घर शोधशोधून काढले आणि आत गेलो. दुसऱ्या मजल्यावर एका बाजूला लांबटशी खोली होती, एका भिंतीला फक्त एकच दरवाजा होता; रस्त्याच्या बाजूच्या भिंतीला लाकडी गज लावलेल्या दोन-तीन खिडक्या होत्या. दुसऱ्या दोन भिंती खालपासून वरपर्यंत विटांनी बांधलेल्या होत्या. त्याच्या पलीकडे विशेष महत्त्वाच्या काही खोल्या असतील म्हणून तिथे खिडकी, दरवाजा काहीच नव्हते. भिंतीवर खिळ्याला 'मां'चा एक फ्रेम केलेला फोटो अडकवलेला होता. दोल पौर्णिमेच्या दिवशी कुणीतरी येऊन काचेवरून 'मां'च्या भांगेला आणि पायांना गुलाल लावला होता, एवढी आठवण ठेवून हे काम केलेले पाहून फार बरे वाटले. कोळिष्टके लागलेल्या त्या बंद घरात या गोष्टींनी जणू मंद सुगंध पसरवला. धुळीने भरलेल्या फरसबंद जमिनीवर पायांचे ठसे उमटवीत उमटवीत उंबरठा ओलांडन मी बाहेर आले. हळूहळू दरवाजा झाकला. एका वेलीची एक बारीकशी फांदी खालून वाढत वाढत मोडलेल्या दरवाजाच्या फटीतून आत शिरली होती. तिच्या टोकावर माधवीची दोन फुले फुललेली मी पाहिली.

एकेका जागी मन कसे थबकून राहते. पुढे जायचंच नसतं. त्याला क्षणभरात केलेला सर्व संचय नंतर गर्दीमध्ये हरवून जाईल या भीतीने मन पुढे जायला तयारच नसते. संचय करण्याचा लोभच आतून पुढे ढकलत असतो.

या व्रजदेशातील प्रत्येक धुळीच्या कणात भक्तीचा महिमा मिसळला आहे. त्याचा

शेवट म्हणून सापडत नाही. महाप्रभूंनी ही धूली सर्वांगाला फासली होती; आणि आम्ही मात्र या धूलीपासून स्वतःचे रक्षण करण्यासाठी दोन्ही हातांनी कपडे सांभाळीत सांभाळीत उड्या मारीत रस्त्यावरून चालतो, मनाला टोचते ते. परंतु त्यावर इलाज सापडत नव्हता.

मनात विचारांचे वादळ उठले होते. इतक्यात आम्ही श्रीनिवासाचार्यांच्या कुंजात पोचलो. मातीच्या ढिगाऱ्यावर कडुनिंब आणि चिंच यांचे अतिप्राचीन वृक्ष शेजारी शेजारी होते. या उंचवट्यामध्ये झाडांची मुळे एकात एक घट्ट गुंतली होती. याच्या पायथ्याशीच श्रीनिवासाचे मंदिर आहे. एकदा ही झाडे कापायला लोक गेले. तर त्यांना दिसले की झाडावर कुऱ्हाडीचा घाव पडला नाही तोच झाडातून झरझर रक्त वाहायला लागले. त्यानंतर झाड काही कापले गेले नाही.

पुजारी म्हणाले, " याच वनविष्णुपूरच्या राजाने वाटेत दरोडा घालून अतिशय मौल्यवान असे समग्र गोस्वामी ग्रंथ लुटले. रामकृष्णांनी तीन दिवस वाळूचे पिंड खाऊन प्रायश्चित्त घेतले. या सर्व गोष्टी माहीत आहेतच, हेच ते श्रीनिवास प्रभू. जीवगोस्वामींनी यांना गौड देशात धर्मप्रचारासाठी पाठवले होते, बरोबर दोन ट्रंका भरून धर्मग्रंथ दिले होते. नंतर तोच राजा श्रीनिवास प्रभूंचा भक्त झाला. राजाने विचारले, " प्रभू, मी आपल्यासाठी काय बरं करावं ? " प्रभू म्हणाले, "या राज्यात येताना वाटेत ग्रंथांनी भरलेल्या दोन ट्रंका लुटल्या गेल्या; राजन्, तुम्ही मनात आणलंत तर तुमच्या लोकांकरवी त्या शोधून देऊ शकाल. या एकाच गोष्टीची मी तुमच्याकडून अपेक्षा करतो. " राजा म्हणाला, "प्रभू, दोन ट्रंका ? एक दिवस राज-ज्योतिषांनी हिशोब करून मला सांगितलं होतं की, अतिशय मौल्यवान रत्नादी गोष्टींनी भरलेल्या दोन पेट्या गाडीमधून या राज्यात येत आहेत. ते ऐकून मी माझ्या लोकांकरवी त्या लुटून आणून कोषागारांत टाकून ठेवल्या आहेत. आजपर्यंत त्या उघडून पाहायलादेखील वेळ मिळाला नाही. या त्याच पेट्या आहेत का ते आपण येऊन पहावं. "

" प्रभूंनी पाहिलं आणि ते आनंदानं नाचू लागले. ते म्हणाले, ' महाराज, ज्योतिषांनी खोटं सांगितलं नाही. या पेट्यांमध्ये अमूल्य रत्नं आहेत. मानवी-जीवनाचं परम सार्थक ज्यामुळं होतं, सर्व अभावपूर्ती ज्यामुळं होते, ती ही रत्नं आहेत. अर्थाचा अर्थ – अभावपूर्ती; परंतु राजन् अर्थ खरोखरच अभावपूर्ती करू शकतो का ? उलट तो अभाव वाढवतोच. जितक्या प्रमाणात अर्थाचा लाभ होतो त्याच्या अनेक पटींनी जास्त अभाव माणसाच्या मानगुटीवर बसतो. राजन्, हे ग्रंथ

आपल्या घरी विराजमान झाले, आपण धन्य आहात. ''

राजा अस्वस्थ झाला आणि उन्मळलेल्या वृक्षाप्रमाणे त्याने त्यांच्या पायांवर लोटांगण घातले. तो म्हणाला, ''मी राजा, परंतु कर्माने दस्यू झालो. मला या चरणांपासून वंचित करू नका. ''

सांगता सांगता पुजारी थांबले. पुष्कळ वेळ तिथे नीरव शांतता पसरली.

दादा म्हणाले, ''येतो तर. गोष्ट सांगायला लावून आपल्याला फार त्रास दिला.''

पुजारी म्हणाले, '' त्रास काय म्हणता ! आपल्याला सांगत असताना आम्हांलाही पुन्हा ठाकुरांची (रामकृष्णांची) गोष्ट ऐकता आली. आपल्या कृपेमुळंच ते शक्य झालं. हेच मित्रासारखं काम केलंत, म्हणून नमस्कार करतो तो स्वीकार करावा. '' असे म्हणून पुजाऱ्याने हात जोडून, कपाळाला टेकून, डोके नम्रपणे खाली केले. दादांनी, '' अरे, अरे काय करता हे. '' म्हणत त्यांच्यापेक्षा जास्तच मान खाली केली.

मानसिंहाच्या तीन मंदिरांपैकी अजूनही एक बघायचे राहिले होते – गोपीनाथचे. मानसिंहाच्या आधी मंदिरात जो पुरातन गोपीनाथ होता तो अगदी जीर्ण झाला होता. तिथे आता आहे श्रीगौरांग. तिथला वृद्ध काळा पुजारी. दात नसल्यामुळे 'फ्' 'फ्' करून बोलत होता. तो म्हणाला, '' आधी याला पाहून जा. राईच्या (राधेच्या) रूपाचा विचार करता करता गोविंद गौरांग झाले. ''

गोपीनाथ शेजारच्या मंदिरात होते. गोपीनाथ म्हणजे, ज्यांचे वक्षस्थलच प्रधान ते गोपींचे आश्रयस्थान; परंतु अंगरखा, कपड्यांनी ते वक्ष झाकून टाकले होते !

आक्का म्हणाल्या, ' ही तर खरी मूर्ती नव्हे, ती तर जयपूरला आहे. तिथे जाऊन त्या व्रजनाभ गोपीनाथला नीट पाहा. स्वप्नातील आदेशामुळे मधुपंडितांना बन्सीवटवृक्षाखाली गोपीनाथ सापडले होते. ''

राधारमणचे मंदिर बंद होते. आत नैवेद्याची आरती चालली होती. आता पंधरा एक मिनिटे वाट पाहायला हवी. बांधून काढलेल्या अंगणाच्या बाजूलाच असलेल्या थंड व्हरांड्यात पाय मोकळे सोडून मी बसले. एक अति सुंदर वैष्णव स्नान आटपून आला आणि भाळी चंदनाचा टिळा लावून मंदिराच्या समोर त्याने दोन्ही हात डोक्यांसमोर जोडून साष्टांग नमस्कार घातला. मी इतके नमस्कार पाहिले होते, इतके केले होते; परंतु प्रणामाचे सौंदर्य असे उठून दिसलेले मी पाहिले नव्हते. एकदम माझ्या डोळ्यांसमोर गौरांगाचे रूप उभे राहिले. या वयातच सौंदर्याचे भांडार

घेऊन तेसुद्धा असेच व्रजाच्या प्रांगणात पडले होते.

महाप्रभूंचा प्रिय पार्षद म्हणतो –

**श्रीरूप, सनातन, भट्ट रघुनाथ।**
**श्रीजीव, गोपाल भट्ट, दास रघुनाथ ।।**
**एई छय गोंसाई जबे व्रजे कैला बास ।**
**राधाकृष्ण नित्यलीला करिला प्रकाश ।।**

याच सहा गोस्वामींपैकी एक गोपालभट्ट – दक्षिणी ब्राह्मण; त्यांचा हा देव-श्रीराधारमण.

असे ऐकायला मिळते की, हा राधारमण पहिल्याने एक शाळिग्रामाचा दगड होता. एकदा वृंदावनाला एक श्रीमंत माणूस आला आणि त्याने सर्व मंदिरांतील मूर्तींना वस्त्रालंकारांनी विभूषित केले. गोपालभट्टाकडे ते आले व त्यांनी त्यांच्या देवालाही वस्त्रालंकार देण्याची इच्छा दर्शविली. तेव्हा ते म्हणाले, " माझा देव तर शाळिग्राम. त्याच्या शरीरावर अलंकार धारण करायला जागाच कुठं आहे ? "

रात्री पूजा झाल्यावर गोपालभट्ट एका ढोलीमध्ये शाळिग्राम ठेवून देत. त्या दिवशी तो शाळिग्राम ठेवता ठेवता त्यांना वाटले, ' अहा हा, माझ्या देवाला जर हात, पाय, नाक, डोळे, तोंड असते तर इतरांमारखं नाना अलंकारांनी कसं छान सजवता आलं असतं."

भक्ताची इच्छा परमेश्वर कधी अपूर्ण ठेवीतच नाही म्हणे, सकाळी ढोली उघडून गोपालभट्टांनी पाहिले तर ढोलीमध्ये पूर्ण मावेल एवढी एक काळ्या दगडाची मूर्ती ! आनंदाने अधीर झालेल्या गोपालभट्टाने लगेच त्या दात्याला बोलावले, "आपल्या वस्त्रालंकारांनी सजण्यासाठीच जणू काही माझ्या हृदयाचा देव साकार झाला आहे."

व्रजरमण म्हणाले, "या गोष्टीचा पुरावा म्हणून मूर्तीच्या मागच्या बाजला अजूनसुद्धा शाळिग्रामाचे काही अंश दृष्टीस पडतात. जन्माष्टमीला अभिषेकाच्या वेळी सर्वसाधारण जनतेला ते पाहायला मिळतात. "

घंटा वाजू लागली, आता दरवाजा उघडणार, मी उठून समोर जाऊन उभी राहिले, घंटेचा आवाज कानी पडताच जो जिथे होता तिथून धावत येऊ लागला. जादू केल्याप्रमाणे सर्व जागा स्त्री-पुरुषांनी भरून गेली. उंच व्हरांड्यावर देवघर

ओंजळीने फुले, बेलपत्री वाहात होते, तोंडाने स्तवन म्हणत होते. आणि जितका पाहाता येईल तितका समोरचा देव टक लावून पाहून घेत होते. लवकरच तो दृष्टि-आड होणार म्हणून.

पोट पाठीला लागलेले, असे दोन वृद्ध एका मागे एक धावत धावत तिथे आले. त्यांना फक्त दर्शन घ्यायचे होते. त्यांच्या डोळयांत, चेहेऱ्यावर किती उत्सुकता दिसत होती. ते पुढे होणार कुठून ? याच्या त्याच्या मधून मान पुढे करीत होते बिचारे. वेळ फार उरला नव्हता. एक दुसऱ्याला पुढे करीत होता, " अहाहा, तू घे पाहून. " मी बाजूला झाले आणि त्यांना जागा करून दिली. किती समाधानाची हास्यरेषा उमटली. त्यांच्या गालफडे बसलेल्या दातपडक्या चेहेऱ्यांवर. देवदर्शनाच्या आनंदाने त्यांचे दोन्ही डोळे कसे चमकत होते. दर्शनासाठी तहानलेला जीव शांत झाला होता. पांढरे तुरळक केस असलेली डोकी इकडे तिकडे करून ते देवाला पाहात होते. जणू काही त्यांना ती मूर्ती अगदी अशीच पाहायची होती.

आक्का म्हणाल्या, " हे काय केलंस ? मंदिराचा दरवाजा बंद झाला. फुलं वाहिली नाहीस ? "

मंदिर उघडल्याबरोबर आक्कांनी माझ्या हातात फुले, बेलपत्री दिली होती; परंतु – कुणाचे लक्ष नाही असे पाहून हातांतली फुले, पाने जिन्याजवळ ठेवूनच मी बाहेर आले होते.

एक वयोवृद्ध विधवा स्वतःहूनच पुढे आली आणि म्हणाली, " हं बाळे, दूर देशातून आलीस, गिरिधारीला पाहणार नाही, असं कसं होईल ? गिरिधारी पाहून जा ? "

आक्का म्हणाल्या, " आपण जाणार ? "

" मी आता तिथूनच येते आहे; पुन्हा जाणार नाही. परंतु रस्ता हाच आहे. सरळ जाऊन उजव्या बाजूला वळा. दोन पावलं गेलात की ते मंदिर दिसेल. "

मंदिरात जाऊन पाहिले – गोकुलानंद राधाविनोद – मग गिरिधारी कुठंय ?

एक उडिया पुजारी म्हणाला, " आहे, आहे. पाच पावल्या टाका. "

पाच पावल्या मोजून घेऊन पुजाऱ्याने मूर्तीच्या समोरचा पडदा ओढला आणि तो एका अंधाऱ्या कोपऱ्यात गेला. थोडया वेळाने हातात एक पितळी पेटी घेऊन तो दाराजवळ आला.

कुतूहलामुळे आम्ही सर्व त्याच्यावर झुकून पाहू लागलो. याच्यामधून काय निघणार होते बाहेर कोण जाणे ! कसे असेल दिसायला ?

मागे पुढे पाहात पुजाऱ्याने सावकाश ती पेटी उघडली आणि दगडाच्या मोहरे-सारखा एक चौकोनी काळा दगड हातात घेऊन तो म्हणाला, " बघा. "

ह्या त्या गिरिगोवर्धनाच्या मूर्तीचा शिलाखंड, जो हातात घेऊन, डोळ्यांना व छातीला लावून महाप्रभू जप करीत असत; नाकाजवळ धरून वास घेत असत. गळ्यात गुंजांची माळ घालून पुरीधामला गंभीरा घाटावर त्यांनी याप्रमाणे तीन वर्षे जप केला होता.

अंगठा व तर्जनी या दोन बोटांच्या मध्ये हा शिलाखंड सारखा धरून धरून त्याच्यावर एका बाजूला अंगठ्याचा छाप स्पष्ट उठला होता. जणू ओल्या मातीत कुणी अंगठा उठवला होता.

पुजाऱ्याने स्वत:चा अंगठा त्या छापावर ठेवला व तो म्हणाला, " पाहा, याच-प्रमाणं हे असे छाप इथं पडले. "

नंतर महाप्रभूंनी त्यांची गुंजांची जपमाळ आणि ही शिला रघुनाथदास गोस्वामीला स्वत: हातांनी दान केली.

रघुनाथांचा आनंद गगनात मावेना ते विचार करीत, प्रभू –

**शिला दिया विला मोरे गिरिगोवर्धन ।**
**गुंजामाला दिया दिला राधिका-चरण ।।**

महाप्रभू म्हणाले होते, " या शिलेला साक्षात व्रजेंद्रनंदन समजून त्याची सांगो-पांग पूजा करीत जा. एक घट जल आणि तुलसीमंजरी अशी सात्त्विक सेवा शुद्धभावे करीत जा. दोन बाजूला दोन पत्री आणि मध्ये कोमल मंजरी, अशा आठ-मंजरी वाहून श्रद्धा व्यक्त करीत जा. "

शेवटच्या दिवसापर्यंत ही शिला व माला रघुनाथांनी धारण केली होती. तेव्हा-पासून गोकुलानंदमंदिरात ही शिला पूजेसाठी ठेवलेली होती.

आक्का म्हणाल्या, " जपमाळ म्हणजे जणू काही बँकेत जमा केलेले पैसेच. पाहा, सर्व जाळलं पण माळ जाळली नाही. ती योग्य व्यक्तीला देऊन टाकली. बँकेतली शिल्लक घेऊन ती व्यक्ती जप करायला लागली. रामकृष्णदेवांनी ती माळ श्री

मांच्या चरणी अर्पण केली होती. विचार करून पाहा त्या किती शक्तिशालिनी होत्या ते. "

निकुंजवन पाहून झाले. आता बाकी राहिले निधूवन. एक वन पाहिले रात्रीच्या अंधारात, दुसरे पाहिले दिवसाच्या प्रकाशात.

निकुंजवनाप्रमाणे उंच भिंतींनी घेरलेले, निधूवन रस्त्याच्या पलीकडे होते. एक गुजराथी गृहस्थ आपल्या पत्नीबरोबर उभे राहून, पिशवीतून पेरू काढून माकडांना खायला देत होते. शशीमहाराजांचा जागरूकपणा मला आठवला. माझ्या खांद्यावरची पिशवी मी व्रजरमणच्या हातात दिली. पिशवीत खायचे सामान आहे असे समजून माकडांनी आम्हांला पकडले तर. व्रजरमण वैष्णव माकडांना ते कळते.

मुक्तालतांनी आच्छादलेले हे वन, ही लता म्हणजे सर्वसाधारणपणे आपण पाहतो तशी नव्हती. खालचा भाग जाड, झाडाच्या बुंध्यासारखा. फांद्यासुद्धा चांगल्या जाड जाड; परंतु सर्व फांद्याच एकमेकींत गुंतून त्यांना झोळ पडला होता. एक-मेकींच्या खांद्यांवर हात ठेवून नाचता नाचता गोल फिरून बायका पुढे झुकाव्यात तशा या वेली वाटत होत्या. एकेका झाडाचे एक एक झुडूप झाले होते. सगळे वनच अशा झुडपांनी दाट भरले होते. पायी चालण्याची वाट अगदी स्वच्छ होती, जणू काही कुणी तरी केर काढला होता. कुठही एखादी वाळकी काटकी किंवा पान पड-लेले नव्हते. हिरव्यागार झुडपाखाली पांढरे अरुंद रस्ते जणू लपंडाव खेळत होते. सर्व मिळून कसे सुंदर, कौशल्यपूर्ण वाटत होते.

व्रजरमण म्हणाले, " किती आश्चर्याची गोष्ट आहे ! वृक्ष लता होऊन व्रजधूली-मध्ये लोटांगण घालताहेत. "

अंगात बंडी, डोक्याला गुलाबी पगडी असा एक पंड्या गावातील निरनिराळ्या वयाच्या यात्रेकरू स्त्रियांच्या मध्ये उभा राहून हात हलवून हलवून सांगत होता, " याच त्या मुक्तालता. श्रावण महिन्यात लाल लाल मोती चकाकतात. ते पाहून यात्रेकरूंना जीवनाचं सार्थक झाल्यासारखं वाटतं. "

पंड्याचे बोलणे ऐकून डोळे मोठमोठे करून त्या स्त्रिया आश्चर्याने चोहोबाजूंच्या झुडपांकडे पाहू लागल्या. हिरव्या रंगाची गोल गोल फळे श्रावण महिन्यात पिकत असतील.

एकामागून एका झुडपाखालून चाललो होतो. भावनावश होऊन व्रजरमण

म्हणाले, " असं ऐकलंय की, वृंदावनच्या वृक्षवल्लरी उर्ध्वमुखी नसतात. ह्या म्हण-ण्याची सत्यता इथं पाहायला मिळते."

साधू महापुरुष म्हणतात, " वृंदावनाची धुली मिळावी म्हणून झाडंझुडपं आतुर झालेली असतात." उद्धवसुद्धा म्हणाला होता. " या व्रजधामी गवत व झुडपांच्या रूपात जन्म यावा. कारण, कृष्णप्रेमानं वेडया झालेल्या व्रजगोपींची चरणधूली या धुळीमध्ये मिसळलेली आहे."

बरोबरच्या लोकांना घेऊन तो पंड्या आमच्या पुढेपुढे जात होता. पुरातन झाडांच्या ज्या फांद्या वाकून खाली जमिनीला लागल्या होत्या, त्यातलीच एक दोन्ही हातांनी धरून तो पंड्या यात्रेकरू स्त्रियांना म्हणाला, " या झाडाच्या फांद्या ज्या दिसताहेत त्या फांद्या नव्हेत."

मी थांबले आणि कान टवकारले. पंड्या म्हणाला, " कृष्ण इथं क्रीडा करायला आला. देवता म्हणाल्या, 'आम्ही पण पाहायला जाणार.' कृष्ण म्हणाला, 'या वेशात तर जाता येणार नाही, लोक तुम्हांला ओळखतील.' देवता म्हणाल्या, 'ज्यामुळं लोक ओळखू शकणार नाहीत अशा वेशातच जाऊ.' तेव्हा या फांद्या होऊन त्या देवता इथं आल्या. पानं जमिनीवर पडणारच हे सर्वांना माहीतच असते. परंतु फांद्या कधी जमिनीला लागतात का ? पण इथं तर फांद्यासुद्धा जमिनीवर लोळण घेताहेत. अशा तऱ्हेनं व्रजधामी देवतांना कृष्णाची पदधूली मिळाली. इथं नमस्कार करा. कितीतरी देवतांना तो प्रणाम पोचेल."

या निधूवनातच स्वामी हरिदासना बांकेबिहारी पावले होते. स्वामी हरिदास इथे भजन करायचे; एक दिवस त्यांनी स्वप्नात पाहिले, कृष्ण त्यांना सांगत होता, "मी याच जागी जमिनीत आहे. मला तू बाहेर काढ." दुसऱ्या दिवशी ती जागा खणून माती बाजूला करताच कृष्ण प्रकट झाला. म्हणून त्या दिवशी बांकेबिहारीला पाहा-ताना वैष्णव लोक गायले होते –

**" जय जय राधा बंकबिहारी, राधा बंकबिहारी राधे**
**हरिदास स्वामी के प्राणधन हे ।"**

हे हरिदास स्वामी म्हणजेच अकबराच्या दरबारातील मुख्य गायक तानसेन यांचे गुरू.

एकदा अकबराने तानसेनला विचारले, " तुमचे गुरू कोण ? ज्याचा शिष्य इतका उत्तम गायक, त्याचा गुरू कसा असेल ? "

त्या गुरूंना पाहाण्यासाठी गुणग्राही सम्राट उत्सुक झाला. तानसेन अकबराला घेऊन वृंदावनाला आला, हरिदासांनी उभयतांना आदराने बसायला दिले.

तंबोरा घेऊन तानसेन एक गाणे म्हणाले, गाणे संपत आले तेव्हा त्या तंबोऱ्यावरचीच तान घेऊन गुरूंनी तेच गाणे बिहारीजींसमोर गाइले. ते ऐकून अकबर मुग्ध झाला.

योग्य शिष्याचा योग्य गुरू ! आनंदाने उल्हसित होऊन सम्राट परत गेला. दरबारात त्याने तानसेनकडून तेच गाणे ऐकले, तो म्हणाला, " हेच गाणं तुमच्या गुरूच्या गळ्यातून ऐकलं होतं, त्यात एक निराळाच रस होता. तो गोडवा तुमच्या गळ्यात कुठं आहे ? "

तानसेनने उत्तर दिले. " जहांपनाह, मी गाणं म्हणतो दिल्लीश्वरला खूष करण्यासाठी आणि माझे गुरू गातात जगदीश्वराला आनंद देण्यासाठी ! "

निधूवनातच स्वामी हरिदासांची समाधी आहे. एक लहानशी मातीची कुटी आहे. त्यांचा स्वतःचा तंबोरा भिंतीवर अडकवलेला असून तिथं जवळच एक वेडीवाकडी काठी पण ठेवलेली आहे. हिंडता फिरताना ती त्यांच्या हातात असायची.

कुठुनसा भुरूभुरू सुगंध आला. एक भक्त मातीची समाधी, जमीन व भिंत लिंपीत होता. – घमेलेभर भिजवलेल्या मातीत द्रवरूप चंदन मिसळलेला होता.

गुरू हरिदास स्वामी एकनिष्ठ, सौम्य भाव असलेले असे सेवक होते. ते स्वतःला राधेची सखी समजायचे. त्यांच्या या समजुतीतील गांभीर्याचा मी मनात विचार करीत होते.

एक गोष्ट ऐकली होती. एक दिवस हरिदास यमुनेत स्नान करून तीरावर भजन करायला बसले. त्या वेळी त्यांचा एक पंजाबी शिष्य त्यांना शोधीत शोधीत तिथे आला. गुरू ध्यानस्थ बसले होते. शिष्याला आणखी थांबणे सहन होईना; फार प्रयत्न करून त्याने उंची अत्तराची एक बाटली मिळवून ती बरोबर आणली होती. तीच बाटली त्याने गुरूंनी मांडीवर ठेवलेल्या त्यांच्या तळहातावर ठेवली, तो मनाशी विचार करीत करीतच आला होता की गुरूंना हे अत्तर मिळाल्याने किती आनंद होईल. हेच अत्तर ते बिहारीजींना लावतील. परंतु गुरूंच्या हातावर अत्तराची बाटली पडताच त्यांनी त्याचे झाकण काढले आणि सगळी बाटली वाळूत ओतून टाकली.

भक्ताला वाईट वाटले. हे काय झाले ? विलासी प्रसाधन आणले म्हणून गुरूंनी

ते असे फेकून दिले का ? सवसामान्य वस्तू समजून त्यांनी त्याची उपेक्षा केली का? हे मिळवण्यासाठी मला काय मोल द्यावे लागले होते हे त्यांना कळले नाही का ?

ध्यान संपल्यावर हरिदास उठून उभे राहिले; समोर शिष्याला पाहून त्यांनी सहास्य मुद्रेने त्याला कुशल विचारले.

शिष्याचा चेहेरा म्लान होता.

हरिदासांनी विचारले, " तू इतका विषण्ण का दिसतोस ? "

भयभीत होऊन शिष्याने अत्तराची सर्व हकीकत सांगितली.

ती ऐकून हरिदास हो हो करून हसायला लागले. " एवढंच ! मला निराळंच वाटलं होतं. मी पाहिलं, यमुनेच्या तीरी बिहारीजींचा होळीचा खेळ सुरू झाला आहे – एका बाजूला मित्रांबरोबर बिहारीलाल आणि दुसऱ्या बाजूला सखीवृंदांनी घेरलेली राधा. मी होतो राधेच्या बाजूला. बिहारीलाल जेव्हा पिचकारी घेऊन राधेकडे आले, तेव्हा हाताशी काही न मिळाल्यामुळं, काय करावं असा मी विचार करू लागलो. तेवढ्यात एका सखीनं माझ्या हातात एक अत्तराची बाटली दिली. मी घाईघाईनं बूच काढून ती बाटली बिहारीलालच्या डोक्यावर उपडी केली. बिहारीजी आपादमस्तक अत्तराने माखले गेले. हातात पिचकारी घेऊन ते मागं झाले. खेळामध्ये राधेचा जय झाला. आनंदानं अधीर होऊन आम्ही टाळ्या वाजवू लागलो. "

" आता समजलं की तूच अत्तर दिलं होतंस. परंतु ते फार योग्य वेळी दिलं होतंस. तुला वाईट वाटण्याचं कारण नाही. बिहारीजींच्या अंगालाच सर्व अत्तर लावलं गेलंय; तुझे परिश्रम व पैसा यांचं सार्थक झालंय. "

तरी शिष्याचा चेहेरा खुलेना. त्याला वाटले, गुरू त्याची समजूत घालताहेत.

हरिदास म्हणाले, " जा, लवकर मंदिरात जा आणि बिहारजींचं दर्शन घेऊन ये. म्हणजे मग तुला सर्व काही समजेल. "

शिष्याने धावत जाऊन मंदिरात पाहिले. त्यानेच आणलेल्या अत्तराने बिहारजींचे सर्वांग भिजले होते.

मनामध्ये कली जागा झाला. या ज्या कथा, आख्यायिका ऐकतो त्या सर्व खऱ्याच का ?

जगदानंद स्वामींविषयी शशीमहाराज म्हणाले होते, " ज्ञान आणि भक्तीचा एकत्र समन्वय कुणात असेल तर तो त्यांच्यात ! मनात शंका आली तर ते मोकळे-

पणानं विचारून घेतील." स्वामीजी वृद्ध होते. तुकतुकित काया, चेहेऱ्यावरचा भाव वैष्णवसुलभ, आणि डोळ्यात ज्ञानाचे तेज. जगदानंद स्वामी म्हणाले, " भक्तीनं ज्या गोष्टी शक्य होतात त्यांच्या जवळपासदेखील ज्ञानमार्गानं कुणाला पोचता येत नाही. आम्ही तर काय तुच्छच, परंतु किती श्रेष्ठ, गुणी, ज्ञानी माणसंदेखील विचार करकरून एखाद्या ठिकाणी पोचून हैराण झाली आहेत; कशाचा काही थांगपत्ता लागत नाही. हा विषय विचार करण्याच्या पलीकडचा आहे. त्याची अनुभूति अंतः-करणामध्येच जागी होते. मनात अणुमात्र शंका राहात नाही."

" परमेश्वराला जो ज्या भावनेनं बघतो त्याच भावनेने त्याला तो सापडतो. एक घटना सांगतो. एकाला परमेश्वर लहान मुलगा म्हणून हवा होता. तेव्हा लहान मूल होऊनच परमेश्वर आला. खाटेवर बालगोपाळ झापलेला दिसला. त्याच वेळी खाटेखाली एक मांजर ओरडू लागलं. मांजराच्या ओरडण्यानं मूल ओरडू लागताच भक्त हसू लागला. तो म्हणाला, "तुम्ही त्रिभुवनेश्वर आणि मांजराच्या ओरड-ण्यानं घाबरता हे काय ?" पण पाहिलं तर जागेवर मूल नव्हतंच. मूल म्हणून इच्छा केली आणि त्यानं त्रिभुवनेश्वर पाहिला. त्याच्या मनात ही एवढी एकच शंका होती. तीही नाहीशी झाली."

दुपारी सर्वजण विश्रांती घेत होते. त्याच वेळेला खांद्यावर पिशवी अडकवून मी बाहेर पडले. यमुनेच्या काठी गरम झालेली वाळू. मी उड्या मारीत मारीत चालले होते. तळव्यांना फोड येत होते.

त्यातच मध्यान्हीचा सूर्य डोक्यावर आला असताना गोवऱ्या पेटवून गरम वाळू-वर किती तरी 'पंचतपाय' साधू बसले होते. महाकठीण तपस्या ही. अगोदरच अशी ही गरम हवा आणि त्यात आणखी विस्तव पेटवून तासन्‌तास जप करीत एका जागी बसायचे !

घाईघाईने पायाखालची वाळू हाताने एक हातभर खोल बाजूला करून मी तिथेच बसले. खालची वाळू तितकीशी गरम नव्हती. सहन करवत होती.

मांडीवर वही पेन्सिल घेऊन मी त्यांचे रेखाचित्र रेखाटू लागले.

साधनेचे साधे सोपे मार्ग पुष्कळ आहेत, तरी हे साधुलोक हौसेने हे असले खडतर मार्ग निवडून का काढतात ते त्यांचे त्यांनाच माहीत.

एका लहानशा घोंगडीने तोंड, छाती झाकून घेऊन त्याच्या आडच त्यांचा जप चालला होता. जपाचा हात कुणाला दाखवायचा नसतो बहुतेक. घोंगडीच्या आत

दरदरून घाम सुटून पाठीवर, पोटावर घामाच्या धारा लागल्या होत्या. तोच घाम अंगावर सुकून त्याचे डाग पडत होते.

त्यांच्या तपस्येचे नियम प्रयागदास यांच्याकडून ऐकले होते. त्यांनी सांगितले होते, " आम्ही सर्व सोडून रानावनात, जाऊन राहतो. आजारबिजार हा देहधारींना असणारच. बाकी आम्हांला शब्दागणिक थंडी वाजून न्युमोनिआ होऊन कसं चालेल ? म्हणून सर्वांत आधी शरीराला सर्व काही सहन करायला लावून त्याची तयारी करावी लागते."

" पावसाळयात चार महिने शतधारांखाली स्नान करतो; दुपारी दोनपासून संध्याकाळी सहापर्यंत एकशेआठ घडे पाणी डोक्यावर ओततो. पुष्कळदा घडा, कळशीही मिळणं शक्य होत नाही. तेव्हा ओढयात किंवा गंगेच्या पाण्यात आकंठ डुंबून राहिलं तरी चालतं."

" उन्हाळयात पाचशे गोवऱ्यांच्या दोन ओळी समोर, तीन ओळी मागं अशा पेटवतो. डोक्याच्या वर उंच अशा ज्वाळा भडकतात. चार महिने त्याच्या आत बसून जप करतो. जंगलात हिंडून शेण गोळा करून स्वतःच गोवऱ्या थापतो."

" थंडीच्या दिवसात चार महिने वाळूवरच झोपतो. उघडया अंगांनी, जेमतेम एक लंगोट नेसून, दगडावर झोपून राहतो. एका मागून एक कित्येक वर्षं असंच चालू राहतं. शरीर चांगलं दणकट होतं. एकेका साधूचं शरीर पाहाल तर लोखंडासारखं कणखर, अगदी दगडाच्या मूर्तीसारखं दिसेल. बोट चेपता येणार नाही तुम्हांला. अंगाला राख लावणं हासुद्धा एक आत्मरक्षणाचाच उपाय असतो."

पाठीला कुबडा असलेला हा एक नागा-- यमुनेच्या तीरावर, घाटावर याला पुष्कळ वेळा पाहिले होते. पंचतप करायला तो माझ्यापासून वीस एक हात दूर बसला होता. त्याला टाळून मी त्याच्या जवळच्या साधूंचे स्केच करीत होते. मी पाहिले, त्याने जोरात श्वास घेतला आणि तो सरळ ताठ बसला. काय आश्चर्य, त्याच्या पाठीचे कुबड कुठल्या कुठे गेले ! हा माझ्या डोळयांचा तर भ्रम नाही ना ?

आक्का म्हणाल्या होत्या, " पंचतपाची धूली फार पवित्र असते. लहान मुलांच्या आजारात कपाळाला चिमूटभर लावली तरी मुलं बरी होतात. थोडी मिळवता आली असती तर-- "

जवळ एक आसन रिकामे होते. काल इथे पंचतपाला बसलेले एकाला पाहिले होते. गेले की काय निघून ?

मी उठले आणि त्या जागेवरचे भस्म, वाळू, जव, गहू सर्व एक मूठभर घेऊन

माझ्या पिशवीत टाकले. हळूहळू पावले टाकीत टाकीत नागा संप्रदायी साधूंच्या दलात मी मिसळून गेले.

लोक म्हणतात नागा क्रोधिष्ट असतात, भयंकर असतात म्हणून दूर अंतरावरून भीतभीतच मी फिरत होते आणि फार दक्ष राहून स्केच करीत होते. ते पाहून एक एक करीत ते सर्व माझ्याभोवती येऊन उभे राहिले. त्यांना मजा वाटत होती. एक म्हणायचा, " माझं चित्र काढा ", दुसरा म्हणायचा, " माझं काढा ". सर्वजण फार खूष होते. त्यांच्या बिऱ्हाडी जाऊन मी जम बसवला. लहान मुलांसारखे अतिशय उत्सुकतेने माझ्या वहीवर वाकून मी काढीत असलेली चित्रे ते पाहात राहिले. त्यांच्या या बालिश वागण्याचे मला हसू येत होते आणि माझ्या हसण्याचे त्यांना हसू येत होते. वय, स्थळ, काळ सर्व गोष्टींचा क्षणात विसर पडला. बाजूच्या दोन साधूंमध्ये बोलणे चालले होते, मला ऐकू आले–– एक दुसऱ्याला म्हणत होता, " मला वाटतं ही बाई बहुतेक आमच्या नेपाळचीच असणार; दिसायला कशी सुंदर गोंडस आहे."

अचानक, यात्रेकरू व तिथले रहिवाशी मिळून एकदम ओरडायला लागले, " पिसाळलेला हत्ती ", " पिसाळलेला हत्ती ". एक माहूत यमुनेत हत्तीला आंघोळ घालीत होता. पाणी मिळताच हत्तीला फार आनंद झाला, तो इकडे तिकडे धावू लागला, सोंडेने पाण्याचे फवारे उडवू लागला आणि ते पाहून भीतीने लोक धावपळ करू लागले, ओरडू लागले–– " असाल तिथून पळा, मागच्या वेळी पिसाळलेल्या हत्तीनं दोघांना मारलं होतं. " लोकांच्या धावाधावीमुळे सारा गोंधळ माजला.

मला उशीर झालेला पाहून आक्कांना काळजी वाटत होती. मला त्या म्हणाल्या, " चल, लवकर तयार हो. आनंदमयी मा इथं आहेत. बघून येऊ. "

मी म्हणाले, " त्या अगोदर मौनीसाधू बघायला चला ना, जवळच तर आहे. "

आजच सकाळी त्यांच्याविषयी ऐकले होते. इथल्याच एका स्वामींनी सांगितले होते, " गेली दहा-बारा वर्षं पाहतोय, एकाच जागी, एकाच तऱ्हेनं यमुनातटाकी एका बोरीखाली ते बसलेले आहेत. काय खातात, पितात काही महीत नाही. इतके दिवस तर बोलतही नसत, आता अगदी मोजकं बोलतात आणि तेसुद्धा आम्हा काहीजणीं-बरोबर फक्त ! एकदा मोठा पूर आला होता; काही दिवसांसाठी आम्ही सर्व शह-रात गेलो आणि या साधूनं मात्र, त्या वेळीसुद्धा ही जागा सोडली नाही. बोरीवर चढून तिथंच बसून राहिला. पूरग्रस्तांना खाद्यपदार्थ वाटण्यासाठी नौकांमधून लोक आले तेसुद्धा आठदहा दिवसांनंतर. त्या लोकांनी त्या साधूला तशा अवस्थेत झाडा-

वर बसलेले पाहिले. बरोबर थोडी बिस्किटे होती तीच त्यांनी त्याला दिली. साधूने ती घेतली पण खाल्ली की नाही ते माहीत नाही. ''

यमुनेच्या किनाऱ्यावरील चढणीच्या रस्त्याने चाललो होतो. इथेसुद्धा साधूंची गर्दी. यामध्ये ओळखून शोधून कसा काढायचा ? पुढे जावे तर वाटते मागे राहिले, मागे जावे तर वाटते समोर गेले. '' सेवाश्रमाच्या जवळ '' असे म्हणताना त्यांच्या मनात किती लांब अंतराचा रस्ता होता त्याचे मोजमाप घेतले नव्हते ना !

आक्का म्हणाल्या, '' रस्ता शेवटी कुठं तरी संपणारच ना ? चल तर मग पुढं जाऊनच पाहू. ''

पुढे जाता जाता साधूसंन्याश्यांची गर्दी मागे टाकून मोकळ्या जागेत आलो. रस्त्याच्याकडेला एकदोन घरेही दिसली. कदाचित ती इथल्या शेतकऱ्यांची असतील. तीही सोडून पुढे गेलो. निर्जन अशा वालुकामय जागेत हेच एक बोराचे झाड !

जवळ जाऊन पाहिले, आपादमस्तक पोत्याने झाकून बसलेला कुणीतरी एक माणूस समोर उभ्या असलेल्या वृद्ध गुजराथी दंपतीला रागारागाने बोलत होता, '' काय पाहिजे ? इथं उभे राहून मजा बघता काय ? मी काही दुकान मांडून बसलो नाही. जे दुकान मांडून बसले आहेत त्यांच्याकडं जा. मला त्रास दिलात तर भलं होणार नाही. मी रागावलो तर कुणाचा टिकाव लागणार नाही. इथं सारखं उभं राहून माझं नुकसान केलंत तर मलाही नुकसान करता येतं. समजलात ?''

त्याची बडबड ऐकून ते गालातल्या गालात हसत होते. ते साधूला ओळखत होते असं वाटतं. हेच तर मग ते मौनीसाधू. सध्या मौन सोडलेलं होतं वाटतं. परंतु ते दिसायला कसे आहेत ?

त्यांच्यासमोरच वाळूवर बसलो. बोरीवर खारी, साळुंक्या, पोपट उड्या मारीत होते. चांगली पिकलेली बोरे पटापट खाली टाकत होते. काही सबंध तर काही अर्धवट खाल्लेली.

सर्व बाजूंनी स्वत:ला झाकून घेऊन अवघडल्यासारखे असे एखाद्या गाठोड्यासारखे मौनीसाधू बसले होते. जवळच दह्याच्या मातीच्या भांड्यासारख्या फुटक्या भांड्याचा एक ढीग पडला होता. कदाचित त्यामध्ये कुणी त्यांना जेवण आणून देत असेल, एक मोडका पाण्याचा खुजा पण होता. या वाटेने जाताना मूठभर डाळ-तांदूळ पोत्यावर टाकून पदरी पुण्य वेचीत वेचीत यात्रेकरू जातात. काही खारी निश्चिंतपणे कुटकुट करून डाळतांदूळ खात साधूच्या अंगावरून पळाल्या.

पोत्याला पडलेल्या भोकातून मौनी साधूचा फक्त उजवा डोळा दिसत होता. त्या

एका डोळ्याने आम्हांला पाहून साधूने तोंडावरचे आवरण बाजूला केले. दाढीमिशा, केस, जटा यांनी चेहरा झाकून गेला होता. त्यातूनही जेवढा दिसत होता त्यावरून नाक चिंचोळे, डोळे मोठमोठे व रंग एके काळी गोरा असावा असा बोध झाला. नक्कीच तो चांगला देखणा असावा. वय असे कितीसे असणार? मध्यम का त्यापेक्षाही कमी ? बोलण्यात बंगाली-हिंदी भाषेची खिचडी होती. पण असे वाटते की ते बंगालीच असावेत. आपल्या प्रांताची माणसे पाहिली म्हणून तर त्यांचे हृदय द्रवले नाही ना ?

एखाद्या आप्तेष्टाप्रमाणे ते प्रश्न विचारीत होते. कुठे आहात, काय करता, किती दिवस राहणार अशा सर्व किरकोळ गोष्टीच ते बोलत होते. वृंदावनाला प्रदक्षिणा घालण्याची ही वाट. सकाळसंध्याकाळ अनेक यात्री या वाटेने प्रवास करतात. आम्हांला पाहून पुष्कळजण तिथे बसले. गर्दी व्हायला लागलेली पाहून साधूंना पुन्हा राग आला व त्यांनी बोलणे बंद केले.

दादा उठून उभे राहिले व म्हणाले, " निघतो आम्ही."

साधूंनी मान हलवली, " बसा आणखी थोडा वेळ, प्रसाद देतो. "

एक पंजाबी बाई किती वेळापासून धरणे धरून बसली होती--तिची एकुलती एक मुलगी आजारी होती. तिला औषध हवे होते. पुन्हा पुन्हा औषध मागून उत्तर न मिळाल्याने ती निघून गेली तेव्हा साधूंनी पुन्हा तोंड उघडले, " औषधानं नशीब बदलतं का ? मी सांगितलं गुरूवर विश्वास ठेवा, मंत्र जपा, पण ते काही नाही. फक्त येऊन म्हणते, औषध द्या. "

व्रजरमणनं भगवत् तत्त्वासंबंधी एक गूढ प्रश्न विचारला.

पुष्कळ वेळ साधू गप्प राहिले. नंतर म्हणाले, " आज किती वर्षं असा पडून आहे. वारा, ऊन, पाऊस सर्व या शरीरावरून गेलं आहे. फक्त एक दगडालाच शक्य आहे हे सहन करणं, स्वतःच्या शरीराचा तसा दगडच करून टाकला आहे. काही समजण्याची शक्ती ठेवली नाही. तुम्ही जो प्रश्न विचारला त्या गूढ विषयासंबंधी बोलायचं म्हणजे माझ्या डोक्याला फार त्रास होईल. अजूनही तितकी शक्ती परत आलो नाही देहात."

असे सरळ बोलणे ऐकून फार बरे वाटले. साधूंनी पोत्यातून डावा हात बाहेर काढला ते म्हणाले, " हा घ्या प्रसाद. "

प्रसाद म्हणजे लाडवाचा थोडासा चुरा. हात पुढे करून घेतला, पण तोंडात काही घालवेना, या पोत्याच्या आत कोणत्या घाणीत कसा ठेवलेला होता तो लाडू कोण जाणे ?

प्रसाद वितरण होते असे पाहून दुसरे यात्रीही आले व त्यांनी हात पसरले.

साधू चिडले, " पुन्हा पुन्हा हात बाहेर काढायला मला अडचण होते. जो प्रसाद दिलाय तो वाटून घ्या." एवढे बोलून त्यांनी पुन्हा तोंड झाकून घेतले.

माझ्या हातातला प्रसाद मी घाईघाईने दुसऱ्या यात्रेकरूंना देऊन टाकला.

छातीजवळचा पोत्याचा भाग ज्या तऱ्हेने हलत होता त्यावरून मी समजले की साधूच्या हातात जपमाळ फिरत होती. प्रसाद देतानासुद्धा म्हणूनच उजवा हात बाहेर आला नव्हता.

व्रजरमण म्हणाले, " बन्सीदास बाबाजींची गोष्ट मला माहीत आहे तेसुद्धा काही जेवत नसत. गंगेच्या घाटावर बसून फक्त तंबाखू खायचे. जे कुणी काही देत ते समोरच पडून राहायचे, कुजून जायचे. काही काही लोक खाण्यासारखे पदार्थ पुन्हा उचलूनही न्यायचे."

काही पावले पुढे गेल्यावर आक्कांनी दोन बोरे काढली. मला एक दिले व दुसरे स्वत: तोंडात टाकले. त्या म्हणाल्या, " खारींनी झाडाजवळच टाकली होती. उचलून मी हातात ठेवली."

मी विचार करीत चालले होते––सर्व काही सोडून या लोकांची ही जी साधना चालते, त्याचा मानवांना काही फायदा होतो का ?

आक्का म्हणाल्या, " आध्यात्मिक शक्तीवर विश्वास असला तर फायदा नक्की होतोच की, कुणी पैसा देऊन सेवा करतात, कुणी शक्ती देऊन करतात, कुणी साधनेनं करतात. शिपायांच्या बंडानंतर सेवानिवृत्त सैनिक योगी बनून देशाच्या स्वातंत्र्यासाठी साधना करायला हिमालयावर निघून गेले, नंतर ते मोठे नावारूपाला आलेले साधू झाले. सत्यानंदजी, महानंदजी, विशुद्धानंद गिरी, हृषीकेश कांतिलाल, बालानंदांचे गुरू ब्रह्मानंद स्वामी, आणखीसुद्धा किती तरी जण ! यांपैकी काही ॲनार्किस्ट होते, काही बंडातील शिपाई होते. ते असे तसे तर लोक नव्हते. त्यांनी योगशक्तीचा उपयोग केला होता. आम्हांला फक्त बाहेरचीच सेवा दिसते ! हल्लीच्या मोठमोठ्या राजनैतिक नेत्यांपेक्षा यांनी देशाला दिलेले दान मुळीसुद्धा कमी नाही."

वृंदावनाच्या आणखी एका भागात उडिया बाबाचा मठ होता. आनंदमयी मा तिथे होत्या. चालता चालता मी थांबले. जे काही थोडे टांगे होते ते केवळ मथुरा-वृंदावनासाठी जात-येत होते. शहरातून जायला–यायला त्यांना फार त्रास व्हायचा. आणि टांगे जाणार तरी कसे ? बहुतेक सर्व गल्ल्या बोळच तर होते. गाडीघोड्यांना

तिथे जाता येतच नाही. तरीसुद्धा थोडे तरी पुढे घेऊन जावे म्हणून त्यांची खुशामत केली. फार कटकट केल्यावर एक जण तयार झाला. जरा आरामात बसतो न बसतो तोच ब्रह्मचारीमंदिरासमोर टांगेवाल्याने आम्हांला उतरवले. तो आणखी पुढे जायला तयार नव्हता.

ग्वाल्हेरच्या राजाने हे मंदिर बांधले आणि ब्रह्मचारी बाबाला अर्पण केले. निम्बार्क संप्रदायी लोकांचे हे प्रचंड मंदिर होते. या संप्रदायाचे आचार्य देव महर्षी नारदाचे शिष्य होते.

अशी गोष्ट सांगतात की, एकदा काही जैन साधू दिवस सरता सरता आश्रमात आले. जैन लोक सूर्यास्तानंतर जेवत नाहीत आणि त्या वेळी तर सूर्य अगदी अस्तास जायला आला होता, निंबोणीच्या पलीकडे दिसत होता, अतिथींना उपाशी रहावे लागेल हे पाहून आचार्यदेवांनी सुदर्शन चक्राला आव्हान करून त्या अस्तमान जाणाऱ्या सूर्याला निंबोणीवर अडकवून ठेवले. अतिथींचे जेवणखाण झाल्यावर सूर्य-देवाची सुटका झाली तेव्हा मध्यरात्र उलटून गेली होती. सर्वजण आश्चर्याने थक्क झाले. निंबोणीच्या झाडावर सूर्याला अडकवून ठेवले होते म्हणून तेव्हापासून या वृक्षाला निम्बार्क किंवा निम्बादित्य असे नाव पडले.

नाटचमंदिरात रासलीला चालली होती. दोलोत्सवात आता मीलन झाले होते. आता विरह उरला नव्हता. बासरी तोंडात धरून, गळचात गळा घालून राधाकृष्ण या युगुलदर्शनाची ओढ दर्शकांच्या डोळचांना लागली होती. त्याच डोळचांमध्ये काही क्षणांपुरते भगवान बंदिवान होतात.

पुजारी म्हणाले, " पूर्वी इथेच रासलीला होत असे. पण आता बन्सीवटावर होते. एकदा मध्यरात्रीनंतर रासलीला संपल्यावर सर्वांनी अगदी प्रत्यक्ष पाहिले. कुणीतरी सभेतून उठून धावत मंदिरात शिरले. अगदी एक क्षणभरच दिसला तो. सर्व लोकांना कुतूहल वाटू लागले, ' हे काय, याच वाटेनं तर गेला.' —पावलांचया खुणा पाहात पाहात लोक आत आले; नाटचमंदिरातील जाड गालिचा अगदी देवमंदिराच्या जवळ संपला होता. तिथे पांढऱ्या दगडाच्या जमिनीवर धावत जाणाऱ्या दोन पाव-लांचे ठसे स्पष्ट दिसत होते.

आजसुद्धा ते ठसे तसेच दिसतात. फुले व बेलपत्रींनी सध्या ते झाकलेले होते. हाताने फुले बाजूला सारून आम्ही पाहिले. खरे असू शकेल का ? कदाचित पांढऱ्या दगडावर नैसर्गिकच रेघाही असतील. पांढऱ्या रंगावर इतका काळ गेल्यामुळे काळ-सर रंग चढला होता.

व्रजरमण गुडघे टेकून बसले व आपल्या मऊसर हातांनी चरणचिन्ह स्पर्श करून ते हात त्यांनी स्वतःच्या अंगावरून फिरवले. चरणधूलीचा करुणा लाभ झाल्यामुळे व्रजरमण आनंदाने वेडे झाले होते.

भक्ताच्या हातचा हा मृदू स्पर्श, हे एकच सत्य मी मनात जतन करून ठेवले.

शोधीत शोधीत आनंदमयी मांच्या आश्रमात आलो. दरवाज्यातून आम्ही आत शिरताच काही बायका त्याच दरवाज्याने बाहेर गेल्या. त्या बाहेर गेल्यावर मी आक्कांना म्हटले, " चला, आत जाऊ या."

आक्का म्हणाल्या, " आता आत जाऊन काय करणार ? आनंदमयी मा तर बाहेर निघून गेल्या. "

" आनंदमयी मा ! त्यांच्यामध्ये ? कोणत्या ? त्या ज्या पांढरी साडी नेसलेल्या लावण्यवती होत्या त्याच ?"

आक्कांनी मान हलवली व त्या म्हणाल्या, " पुष्कळ फोटो पाहिले आहेत, त्यामुळंच ओळखता आलं. "

काय आश्चर्य ! कपडया-लत्त्यात काही विशेष फरक नाही. परंतु शेकडो माण-सांच्या गर्दीतही चेहेरा मात्र लक्ष वेधून घेतो. मी म्हणाले, " आक्का, चला. इतक्या बायकांना घेऊन त्या कुठं गेल्या ते तरी पाहू या. "

मनात यायचाच आवकाश आम्ही त्यांच्या मागं धावलो. हरिबाबांचा आश्रम जवळच होता. अरुंद जिना चढून दुसऱ्या मजल्यावर एका खोलीच्या समोरील गच्ची-वर आम्ही सर्व जमलो. एवढयाशा जागेत माणसे तरी किती बसणार ? काही माणसे जिन्यावर उभी राहिलो. काही जण खाली उभे राहून वर मान करून पाहत राहिले. गर्दीमध्ये पुढची जागा पटकावण्याची चलाखी अवगत असेल त्याचीच सोय लागते.

समोरच्या खोलीतून ऋषितुल्य हरिबाबा बाहेर आले. अंगात भगवी कफनी, काय ते त्यांचे रूप ! जणू काही प्रकाशाचा एक स्रोतच पडला तिथे. आनंदमयी माने तब-कात भगवे वस्त्र, फळे, फुले घालून सजवून आणले होते. आज हरिबाबांचा जन्म-दिवस होता. हरिबाबांनी हसतमुखाने वस्त्रे, फळेफुले ग्रहण केली आणि त्यांनी जम-लेल्या गर्दीकडे पाहिले. ते म्हणाले, " इथं सर्वांना जागा पुरणार नाही. खाली जाऊन थांबा. मी लगेच आलो. कीर्तन होणार आहे आज."

बऱ्याच लोकांकडून हरिबाबांच्या कीर्तनाविषयी ऐकले होते. " तिकडे जाताच आहा, शक्य झालं तर हरीबाबांचं कीर्तन ऐकून या. ऐकण्यासारखं असतं. " आमचे

नशीब उदयाला आले होते. सर्व कसे योगायोगाने चांगले जुळून आले होते.

हरिबाबा खाली उतरून आले. ढोल, झांजा घेऊन दुसरे लोक अगोदरच तयार होते. हात जोडून, डोळे बंद करून, हरिबाबा मध्ये उभे राहिले आणि दीर्घ श्वास घेऊन त्यांनी सुरुवात केली ' राऽऽऽ ' या ' रा ' पासून आणखी एका दमात ' धा ' पूर्ण करीपर्यंत पुरी दहा मिनिटे लागली. एक एक वेळा असेच दीर्घस्वरात ' रा–धा ' हे नाव ते पूर्ण करीत व वरचा स्वर लावीत. चढत चढत अगदी वरच्या स्वरापर्यंत पोचल्यावर ते सावकाशपणे हळू हळू अगदी खालच्या स्वराला आले. आता उच्च-स्वर कमी करून त्यांनी द्रुततालात हरिनाम सुरू केले. साथीदार ढोल झांजा वाजवू लागले. हरिबाबांनी घंटा उचलल्या. हळूहळू स्वर पुन्हा चढू लागला. तालाची लय द्रुत झाली. त्याच तालावर गोल फिरत हरिबाबा घंटा वाजवू लागले. खरोखर अगदी बघण्यासारखा होता तो नाच आणि त्यांचा ढंग. सर्व शक्ती ओतून ते गात होते आणि त्याच जोषात हलत डुलत घंटा वाजवीत होते. ही वेड्यासारखी देहभान विसरून लागलेली तल्लीनता होती. नाचात, गाण्यात तुमुल तांडव भरले होते. आणि तरीदेखील सर्व कसे स्थिर होते, जणू काही काळजीपूर्वक गुंफलेला परिपूर्ण असा एकपदरी हारच !

रस्त्यात आल्यावर आक्का म्हणाल्या, " एक गोष्ट तुझ्या लक्षात आली का, की पहिल्याने 'राधा' नामाचा उच्चार करताच हरिबाबांच्या डोक्यावरचे केस कसे ताठ उभे झाले. नामस्मरणाचा काय हा अद्भुत प्रभाव ! "

निम्बार्क आश्रमाच्या बाजूने चाललो होतो. पाने गळून गेलेल्या फांद्यांमधून चंद्रमा दिसत होता. रस्त्याच्या मध्येच एक उत्तर हिंदुस्थानी पुरुष डफ हातात घेऊन तो बोटाने वाजवीत होता आणि दोन बायका गाणे म्हणत होत्या, " यमुनेच्या तीरावर बासरी वाजवून कृष्ण राधेला बोलावतो, पण सासू, नणंदांचा कडक पहारा होता. राधा रडून रडून व्याकुळ झाली, " मैं कैसे जाऊंगी ? "

दुसरी जागा असती तर लोक 'वेडी' म्हणाले असते, इथे कोण कोणाला म्हणणार ?

दुपारच्या कडक उन्हात डोके, तोंड भाजून निघत होते. वाऱ्याच्या वावटळीमुळे नाकडोळे धुळीने झाकले जात होते. तरी बाहेर पडलो. घरात मन लागेना. एका-

साठी पथकातील सगळ्यांनाच बाहेर पडावे लागते. पण जायचे कुठे ? सर्व देवळे बंद होती. परमेश्वराला एक वेळ विश्रांतीची गरज नाही, परंतु पुजारी ? देवाचा दरवाजा उघडा असला म्हणजे पुजाऱ्याला विश्रांती कशी मिळणार ?

इकडे तिकडे फिरलो, उघड्या फाटकामधून एक मोठा प्रासाद दिसत होता. काही-तरी असणारच. आम्ही आत गेलो. प्रचंड बंगला. मात्र तो खरा बंगला नव्हताच. तो तर असतो श्रीमंतांचा, देवादिकांचे असते मंदिर. उन्हाळ्याच्या दिवसांत रंगनाथजी रोज संध्याकाळी हवा खायला इथे येतात. दोन्ही बाजूंना नाना तऱ्हेच्या फुलाफळांचे बगीचे होते. मस्तपैकी एक नाट्यमंदिर होते, तळी होती आणि कितीतरी गोष्टी होत्या. चांगला पक्का बांधलेला रस्ता वर जातजात नाट्यमंदिरापर्यंत गेला होता. गरगर करीत रंगनाथजींची गाडी सरळ तिथवर आत जाते.

किती दिवसांसाठी ही राजशाही व्यवस्था ? रंगनाथजींच्या मंदिराभोवतालच्या बागेत थोडा वेळ बसून विश्रांती घेऊन आम्ही पुन्हा दुसऱ्याच्या शोधात निघालो. आक्का म्हणाल्या, " कात्यायनीचं देऊळ इथं जवळच कुठंतरी आहे असं ऐकलंय. ते एका बंगाली माणसानं बांधलंय. पुष्कळ लोक त्याला पीठस्थान म्हणतात. सती पार्वतीचे केस पडले होते इथं, आता त्याचा जीर्णोद्धार केला आहे. शोधून काढा बरं. " असे म्हणून डोळे बारीक करून त्याच वर मान करून फिरून फिरून पाहू लागल्या.

दादा म्हणाले, "हेच काय; हेच असणार बहुतेक. हे जे कडुनिंबाच्या झाडांतून बाहेर आलं आहे. " असे म्हणून घट बसवलेला मंदिराचा कळस त्यांनी बोटाने दाखवला.

पिकलेल्या पानांनी भरलेली कडुनिंबाची झाडे ओळींनी उभी होती, झाडाखाली पडलेली वाळकी पाने व्रजबालके झाडूंनी एके ठिकाणी गोळा करीत होती. मुले हाकलून देत होती तरी दोन गाई शांतपणे तो पाचोळा खात होत्या.

आक्का म्हणाल्या, " हा इतका सगळा वाळूचा प्रदेश आहे म्हणून ! नाहीतर कडुनिंबाचा पालासुद्धा गाई खातात असं ऐकलं नव्हतं कधी. "

त्या व्रजबालकांकडून कात्यायनी मंदिराचा पत्ता विचारून घेतला. नवीन मंदिर; कुणीही जवळपास नव्हते, अगदी शांत गांव. बंद दरवाजाच्या आत देवी कात्यायनी होती.

कागदी लिंबाच्या झुडुपापलीकडे एक लठ्ठसा गावढळ नोकर मोठमोठी भांडी, कढया घाशीत होता, आज दुपारी नक्की विशेष नैवेद्य झाला असणार ! म्हणूनच दिवसा सर्व निद्रावश झाले होते.

देवीचे दर्शन केव्हा होते ते पाहायचे. व्हरांड्याच्या गार जमिनीवर पाय पसरून

बसलो. राधादासी बरोबर होती. तिच्याबरोबर गप्पा सुरू केल्या.

राधादासी म्हणाली, "आधी माझं नाव होतं हरिदासी, या नित्यगोपाल महन्ताचं नावसुद्धा हरिदासच. ते म्हणाले, 'त्याच नावानं तुला कशी हाक मारू? आजपासून तू झालीस राधादासी. तेव्हापासून हेच माझं नाव पडलं. इथं आल्याला कितीतरी वर्षं झाली. मुर्शिदाबाद जिल्ह्यात माझं घर होतं. विधवा झाल्यानंतर गावातील लोकांबरोबर तीर्थयात्रा करायला वृन्दावनाला आले. पंड्यानं आम्हांला महन्तांच्या घरी नेलं. आम्ही सर्व दोन महिन्यांसाठी आलो होतो. महन्तांची आई म्हणाली, तू आता परत कशाला जातेस; इथंच राहा; माझी मुलंबाळं संभाळ. गावचे लोक गावी परत गेले; मी इथंच राहिले. महन्तांची आई वारली, आज त्यालासुद्धा पांचसहा वर्षं झाली."

मी म्हटले, "तुम्ही बंगाली ना, मग उत्तरहिंदुस्थानी लोकांसारखे कपडे का करता?"

ती म्हणाली, "या भागात महन्तांच्या गावचेच लोक जास्त राहातात. त्या सर्वांमध्ये मी वेगळा वेश करून राहणं, बरं दिसत नाही. शेजारी-पाजारी नावं ठेवतात. ह्या आताच सोन्याचा पत्रा बसवलेल्या दोन बांगड्या हातात घातल्या, एरवी त्यासुद्धा घालीत नाही. पुष्कळशा काचेच्या बांगड्याच घालते. तोच त्यांचा रिवाज आहे. काही दिवस झाले गावाहून माझी नणंद तीर्थयात्रा करण्यासाठी आली आहे. अर्थात ती राहाते दुसऱ्या जागी, म्हणून काचेच्या बांगड्या लगेच काढून या दोन घातल्या हातात."

"का?"

"अधूनमधून घाटावर नणंद भेटते – लाज वाटते." एवढे बोलून राधादासीने हसून मान खाली घातली.

इतक्यात पुजाऱ्याने येऊन मंदिराचे दार उघडले. आत अष्टभुजा सिंहवाहिनी असुरमर्दिनीची मूर्ती होती.

आक्का म्हणाल्या, "कात्यायनी म्हणजे महाशक्ती, गोपींना कृष्णाची आराधना करायला कुठून शक्ती मिळाली? कात्यायनीकडूनच! राधा व गोपींनी आधी कात्यायनीची आराधना करून शक्ती मिळवली आणि नंतर कृष्णाची आराधना केली तेव्हा त्यांना कृष्ण मिळाला. भागवतामध्ये गोपींचा मंत्र दिला आहे—

**"कात्यायनि महामाये महायोगिन्यधीश्वरि।**
**नन्दगोपसुतं देवि पतिं मे कुरु ते नमः॥"**

दर्शनाच्या आधी आणि नंतर असाच वेळ वाया जातो. नुसत्या दर्शनाला असा किती वेळ लागणार ? पुन्हा चालायला लागलो.

वाटेत चौसष्ट महन्तांचा समाज लागला. गुरुवर्ग, अष्ट प्रधान महन्त, द्वादश गोपाल, सहा चक्रवर्ती, अष्ट गोस्वामी, अष्ट वैद्य, आचार्य, प्रभू या सर्व चौसष्ट महन्तांची जिथे जिथे समाधी आहे त्या त्या जागेवरून धूळी आणून इथे एका जागी समाधि-समाज केला आहे.

भोवती पक्का रस्ता असलेल्या अंगणात लहान लहान स्मृतिफलक लावून त्यांवर नाम-धाम लिहिलेले आहे – जयदेव-पद्मावती, बिल्वमंगल चिन्तामणी, जगाई-माधाई, नरोत्तम ठाकूर, कर्णपूर, श्रीनिवास, रूप-सनातन, केशव-भारती वगैरे, आक्का नावे वाचायच्या आणि, " अहाहा, एकदा स्पर्श करते. " म्हणून हात पुढे करायच्या.

तिथं काही वैष्णव लोक बसले होते. ते बहुतेक पुजारी असावेत. ते म्हणाले, " छे, छे, बांधलेला पक्का रस्ता सोडून कच्च्या जमिनीवर पाय देऊ नका. तिथे पाय ठेवणे म्हणजे त्यांच्या अंगावर पायधूळ टाकण्यासारखे आहे. "

त्यांनी सांगण्याच्या अगोदरच भगवी वस्त्रे नेसलेले दोन वैष्णव-वैष्णवी कच्च्या जमिनीवर गेले होते. पुजाऱ्यांनी त्यांना बोलावून सांगितले, " अहो, ऐका जरा; तुम्ही तर वैष्णव दिसता. स्वतःहूनच उगीच भगवी वस्त्रं घेतली आहेत का, नियम माहीत नाहीत ते ? "

ते दोघे ओशाळले,

" हे नक्कीच आपापन्थी. "

दादांनी विचारले, " म्हणजे ? "

मी म्हटले, " राममय महाराजांची गोष्ट आठवत नाही ? त्यांनी सांगितलं होतं, ' साधू व्हायचं असेल तर कुणा एखाद्या सम्प्रदायाशी संल्लग्न व्हायला हवं. स्वतःच्या नावापुढं ते नाव जोडायचं असतं. कुणी विचारलं, तुझं नाव काय, तर केवळ स्वामी विशुद्धानंद असं सांगून चालत नाही. विशुद्धानद पुरी, किंवा गिरी, वन, भारती, यांपैकी काहीतरी जोडून नाव सांगावं लागतं. तसं नसलं तर ते तिरस्कार करून म्हणतात, – " बेटा आपापन्थी, " म्हणजे आपले आपणच साधू झालेले आहेत. आमच्या साधू लोकांचे कायदे नियम फार कडक. हेच आमचे केस, दाढी यांच्या बाबतीतही आहे. केस वाढवून दाढी काढली तर साधूसमाज नावे ठेवतो. महिन्यातून एकदा फक्त एका पौर्णिमेला दाढी व केस काढतो. दुसऱ्या जागी इतके सर्व

पाळीत नाहीत, परंतु इथं सर्व पाळल्याशिवाय चालत नाही."

हे काय ' हे आताच तर पाहून आलो ना ? चौरस्त्याच्या सुरुवातीलाच जरा अगोदरच पाहिले नव्हते का ' एक साधू सर्वांगाला आबिर लावून दुपारच्या उन्हात डोके खाली करून दोन्ही पाय वर आकाशाकडे करून जोडून तसाच स्थिर उभा राहिला होता ! दादा म्हणाले होते, " हे झालं शीर्षासन. " आणि आता इथं पाहाते तर डोक्यावर भार देऊन, समोर बगलेखालून पाय घालून वर टाळूवर दाबून धरले होते.

" हे आता आणखी काय ? "

' हे पाद-स्कंध आसन. '

समोर पसरून ठेवलेल्या पंच्यावर यात्रेकरू जाता-येता पैसा, दोन पैसे टाकीत होते. एका वृद्धेने एक दोन आण्यांचे नाणे तिथे ठेवले आणि सुटे पैसे तिथूनच उचलले.

जपमाळेच्या पिशवीत बोटे घालून " राधे गोपाल निताई गौर " असे गान गात एक वैष्णव चालला होता. इथे सर्वांच्याच तोंडी ' राधाश्याम ' नाव ! टांगेवाला घोडा चालवताना म्हणतो, ' राधे, राधे ', भाड्याचे पैसे मिळाल्यावर सलाम करतो–' जय राधे ', वाटसरू कुशल विचारताना म्हणतो, ' राधे-कृष्ण ', सामान दिल्यावर दुकानदार म्हणतो,–' राधाराणी ', भिक्षा दिली नाही तर भिकारी शिव्या देतो–' राधेश्याम श्रीहरी. '

निरनिराळ्या देवदेवतांच्या रंगित चित्रांच्या दुकानात येऊन आक्का उभ्या राहिल्या, गंगामातेचं एक चित्र त्यांनी हरिद्वारला विकत घेतलं होतं. त्यात सिनेमातला शंकर डोळे मिटून बसला होता; आणि उषाबालेप्रमाणे हसत हसत येऊन गंगा शंकराच्या डोक्यावर पडते असे दाखवले होते. याचसारखे राधाकृष्णांचे चांगल्यापैकी एखादं चित्र मिळाले तर ते घरी नेऊन फ्रेम करून त्यांना ठेवायचे होते. सकाळी झोपेतून उठताच सर्व देवदेवतांचे दर्शन घेऊनच दिवस सुरू करावा असा त्यांचा विचार होता. त्या म्हणतात, " नाही तर दिवसभरात दुसरा वेळ मिळतो का ?"

देवदेवतांच्या फोटोमध्येच अधूनमधून नेहरू, पटेल, गांधी, सुभाषचंद्र यांचे फोटो होते. मी विचारले, " हे इथं कशाला ?" दुकानदार जवळजवळ रागावलाच, " ओ सब नेता लोक हाय. "

वाटेत मणिबहादुराची गाठ पडली. आज सकाळीच त्यांना किती शोधले होते.

आम्ही ऐकले होते, की तेसुद्धा इथे आलेले आहेत, पण नेमके कुठे ते माहीत नव्हते. पंड्यांजवळ चौकशी करता करता जेव्हा एकदा त्यांचे घर सापडले, तेव्हा ते बाहेर गेले होते.

आक्का म्हणाल्या, " क्विट इंडिया करून काय होणार आहे ? दिसायला साहेबा-सारखे आहेत, अशी त्यांची खूण आज सांगितली तेव्हा कुठे पंड्यांच्या लक्षात आले आणि त्याने घर दाखवले. "

मणिबहादुरांच्या हातात मातीच्या भांड्यात पानांनी झाकलेली मलई होती. ते म्हणाले, " खीर नाही, संदेश नाही, यमुनेच्या वाळवंटातील गवत खाणाऱ्या गाईच्या दुधाची मलई, पृथ्वीवर यासारखा दुसरा पदार्थ मिळणार नाही. खाल्ली नाही कधी ? पाहा, खाऊन पाहा, वृंदावनाला आल्यावर पहिल्याने मलई खायला हवी. नुसत्या भक्तिरसानं चालत नाही. पार्थिव-रससुद्धा हवा. अर्जुन नसता तर एकट्या कृष्णानं काय केलं असतं ? गीता झालीच नसती—बरं तर आपण कुठं निघालात ?"

आम्ही सांगितलं, " फौजदारकुंजात, रामकृष्णदेव तिथं आले होते, असं ऐकलंय."

" चला, मीही येतो. तिथल्या महन्ताबरोबर माझी ओळख आहे, परंतु तिथं रामकृष्णदेव आले होते हे काही कुणी बोललं नाही." असे बोलून मणिबहादुरसुद्धा आमच्याबरोबर निघाले. ते म्हणाले, " पंड्यांना या खेपेला फार दुःख झालं आहे, यात्रेकरूंची फार गर्दी झाली नाही. ते म्हणतात, पूर्वबंगालमधूनच जास्त करून यात्री येतात. त्यांनीच धर्म जिवंत ठेवलाय, आपण म्हणजे वरून मुलामा चढवलेले—वरकरणी लोक ! "

रस्त्याने मणिबहादुरांबरोबर चालताना फार बरे वाटते. ते गप्पागोष्टीत रमवून ठेवतात. ते म्हणाले, " भर्तृहरीची गोष्ट माहीत आहे ना ? साधूनं त्याला फळ देऊन सांगितलं होतं तुझा जो कुणी परम प्रिय असेल त्याला हे दे. ते फळ एका हातातून दुसऱ्या हातात फिरू लागले—एकजण त्याच्या प्रिय माणसाला देई—तो पुन्हा त्याच्या प्रिय माणसाला देई—असंच चाललं होतं. एकाकडून दुसऱ्याकडं. कुणीही देणाऱ्यालाच ते फळ परत उलट देत नव्हता. प्रेम दिलंच जातं, ते परत मिळत नसतं. वैष्णव राधेच्या भावनेने साधना करतात. प्रेम करण्यात जो आत्मत्याग असतो तो स्त्रियांकडून ते शिकले आहेत."

मी विचारले, " आम्ही तर हरिद्वारला परत जाणार आहोत, आपण जाणार नाही ?"

ते म्हणाले, "छे बस्, हरिद्वारहून वृंदावनाला येऊन ज्ञानानं घाण धुऊन भक्ति-जलात बुडी मारली, ती काय पुन्हा तिथं जाऊन नष्ट करू ?" ते हसायला लागले व म्हणाले, "माझा मित्र बांकेबिहारी पंजाबी, वैष्णव झाला व त्यानं तेच नाव घेतलं, मीराबाईचं जीवनचरित्र व भर्तृहरीची गाणी अशी दोन प्रसिद्ध पुस्तकं त्यानं लिहिली आहेत. सहा वर्षं त्यानं मौन घेतलं होतं. अलीकडेच मौन सोडून तो भगवत् कीर्तनात दंग राहू लागला आहे. तो सांगतो, आनंदमयी मांजवळ जाऊ नका, दुरून नमस्कार करा. त्यांची शक्ती जास्त पण भक्ती कमी आहे. जास्त जवळ गेलात तर ती शक्ती तुमच्यामध्ये शिरेल.

फौजदार कुंजात पोचलो. दुसऱ्या मजल्यावरच्या ज्या खोलीत रामकृष्णदेव राहिले होते त्या खोलीला कुलूप होते. फटीतून पाहिले तर जमिनीवर बऱ्याचशा वळकट्या आणि ट्रंका पडलेल्या होत्या. कुणातरी यात्रेकरूंना जागा भाड्याने दिली असणार.

दादा महन्तना म्हणाले, "ते इथं होते हे विशेष कुणाला माहीतच नाही. परंतु त्यांचा एक फोटो इथं ठेवून बाहेर दारावर साइनबोर्ड टांगून ठेवा नि मग पाहा. यात्रेकरूंच्या भाड्यापेक्षा आपल्याला दक्षिणाच जास्त मिळेल."

महन्त म्हणाले, "चांगलं सांगितलंत, तसंच करीन. अलीकडंच काही दिवसांपूर्वी दोन मेमसाहेब शोधीत शोधीत इथं आल्या आणि दारावरच डोकं टेकून नमस्कार करून निघून गेल्या."

आक्का म्हणाल्या, "यालाच म्हणतात वकिलाची अक्कल."

तिथून मग पुढे सव्वामण शाळिग्राम मंदिरात गेलो. महमा इतका मोठा शाळिग्राम कुठे दिसत नाही. फक्त नेपाळ राज्यात गंडकी नदीमध्येच हा दगड मिळतो. साधूसंन्याशी तिथूनच घेऊन येतात. हा एक विशेष प्रकारचा दगड आहे. चंद्रादेवीच्या शापामुळे या दगडामध्ये वज्रकीट राहतात.

आता आलो इमली पारावर. अतिविशाल अतिशय प्राचीन असे हे चिंचेचे झाड. या वृक्षाखाली बसूनच महाप्रभू जप करीत. ते मथुरेला राहात, लोकांच्या गर्दीमुळे मोकळेपणाने त्यांना नामसंकीर्तन करता यायचे नाही, ते इथे निघून यायचे. मध्यान्ह होईपर्यंत नामगान करून नंतर ते अक्रूरघाटावर जाऊन भिक्षा मागत. जे काही थोडे दिवस ते इथं होते ते असेच काढीत होते. एक दिवस महाप्रभू बसून नामकीर्तन करीत होते. त्या वेळी एक तरुण राजपुत्र कृष्णदास यमुनेच्या तीरावरून

पायीच चालत जात होता. महाप्रभूंना पाहून तो एकदम थबकला. यांनाच तर काल रात्री स्वप्नात पाहून तो बाहेर पडला होता.

झाडावरून हात फिरवीत असताना माझ्या मनामध्ये तेच दृश्य येत होते. त्यांच्या दयेमुळे कितीतरी श्रीमंत व गरीब लोकांचा उद्धार झाला.

यानंतर राधादामोदराजवळ आलो. रूपचा गिरिगोवर्धन इथे आहे.

दररोज सकाळी चौदा मैलांची गोवर्धन गिरिराजाची प्रदक्षिणा करून मग रूप तोंडात पाणी घालीत. म्हातारे झाले तरी त्यांच्या या नियमात खंड पडला नाही. एक दिवस रात्री गोविंद त्याना म्हणाले, " रूप तू इतका त्रास का घेतोस ? माझी पदचिन्ह घे. त्यांना चार प्रदक्षिणा घातल्या म्हणजे तुझी गिरिगोवर्धनाची प्रदक्षिणा पुरी होईल." असे म्हणून त्यांनी एका दगडाची खूण सांगितली. दुसऱ्या दिवशी तिथे जाऊन रूप ते पदचिन्ह घेऊन आले.

कार्तिक महिन्यात पदचिन्हे सर्व जनतेला पहायला मिळतात. एरवी मुद्दाम भेट द्यावी लागते.

भेट दिल्यावर पुजाऱ्याने यमुनेच्या पाण्याने उपरणा पुसून पदचिन्हांसमवेत एक चौरंग आणून तिथे ठेवला.

काळ्या दगडावर प्रमाणापेक्षा मोठा उजव्या पायाचा छाप होता. बाजूला गोपद्म होती.

पुजारी म्हणाले, " हा आहे ढवळ्या गायीचा पाय. गायीला टेकून असं उभं राहून कृष्णानं बासरी वाजवली होती." असे म्हणून पुजाऱ्याने उजव्या पायावर भार देऊन तसे उभे राहून दाखवले.

चांगला खोल खड्डा पडला होता. टाचेच्या बाजूला दाब जास्त वाटत होता, तिथे ठसा स्पष्ट दिसत होता.

असे ऐकले होते की कृष्णाच्या मुरलीवादनाने पाषाणसुद्धा वितळला होता. तसे झाले असेल तर त्या वितळल्या दगडावर ठसा उमटला तर त्यात आश्चर्य कोणते ? तसे असेल तर पायाचे छाप पडलेला चिखलाचा भाग फॉसिल (Fossil) बनला. ते काही का असेना परम भक्त रूपना ज्यामध्ये ' कृष्णपदे ' लाभली, ज्या पद-चिन्हांना त्या भक्ताची पूजा लाभली ती चिन्हे कोरून काढलेली असली तरीसुद्धा त्यांच्या दर्शनाने-स्पर्शाने पुण्यच पदरी पडेल.

पुजारी आक्काकडे पाहात होते. ते म्हणाले, " आपणच धन्य, मी हतभागी. इतका जवळ असूनदेखील आजपावेतो त्याचा रसास्वाद मला मिळाला नाही. "

आक्कांनी विचारले, " काय, प्रदक्षिणा घालणार का ?"

" नक्कीच, इतक्या सोप्या रीतीनं मिळणारं गिरिगोवर्धन प्रदक्षिणेचं फळ सोडायचं असतं ?"

पुजारी म्हणाले, " त्या बाजूला असलेल्या कडुनिंबाच्या झाडाखालनं, व्हरांड्याला चिकटून मंदिर डाव्या बाजूला ठेवून प्रदक्षिणा घाला."

संध्याकाळचा अंधार पडला होता, टॉर्चच्या उजेडात रस्ता पाहून चालत होतो. मंदिराच्या एका बाजूच्या आवारात जीव गोसाई आणि इतर कित्येक भक्तांच्या समाधी होत्या. दुसऱ्या बाजूला रूपच्या भजनकुटीचे मंदिर होते. इथे वैष्णव ब्राह्मण येऊन रूपच्या भजनकुटीसमोर साष्टांग नमस्कार करतात.

चार वेळच्या चार प्रदक्षिणा घालून आम्ही अंगणात येऊन उभे राहिलो. झाडांच्या फांद्यांमधून शुभ तारा चमचम करताना दिसत होता.

आता आले नन्द-यशोदेचे मंदिर. व्रजस्त्रिया तांब्ये भरून, वाट्या भरून दूध आणून ओतीत होत्या, " गोपाल धेनू चरायला नेऊन परत आल्यावर घेईल ना हे दूध. "

कोपऱ्यामध्ये हजारो वेताच्या छड्या एकत्र ठेवलेल्या दिसल्या.

मी विचारले, " हे काय ?"

लाल कापडाच्या बांधणी केलेल्या लांब खातेवहीत पुजारी हिशोब लिहीत होते, मा. यशोदामंदिराचा खर्च असेल कदाचित. ते म्हणाले, " जगन्नाथहून परत आल्यावर यात्रेकरू एक एक छडी नंदयशोदेच्या स्वाधीन करून जातो. हा झाला पुरावा. त्याशिवाय तीर्थयात्रा पूर्ण होत नाही आणि बदरीकेदारहून परत येणारे यात्रेकरू एक एक लोखंडी बांगडी जमा करतात.|

मी पाहिले, यशोदेसमोर लाख लाख लोखंडाच्या बांगड्या पडल्या होत्या. दरवर्षी वैशाख महिन्यात या सर्व यमुनेमध्ये विसर्जित करतात.

आक्का म्हणाल्या, " विचार करून पाहा, दर वर्षी किती लोक जा-ये करतात ते ",

आता आणखी काय पाहायचे राहिले ! हो, शहांचे मंदिर. हे मंदिर पहायलाच तर लोक दूरदूरहून धावत येतात. एकदा डोळ्यांनी पाहण्यासारखे आहे. हे मंदिर पाहिले नाही तर मनाला हुरहूर लागते. आल्यापासून ' शहांचे मंदिर ', ' शहांचे मंदिर ' असा हलकल्लोळ ऐकला होता.

आक्का म्हणाल्या, " चला तर मग भराभर पाय उचलून सगळे बघून संपवू या. थोडक्यासाठी गालबोट लागायला नको. "

खालपासून वरपर्यंत संपूर्ण संगमरवरी दगडाचे हे मंदिर, दिल्ली फॅशनचा बागेतला फवारा, गच्चीवर जागोजाग संगमरवरी मूर्ती, शौकिन बड्या लोकांचा बंगला आणि पैसा ओतलेले मंदिर याचा विचित्र समागम इथे झाला होता.

एका बाजूला काही मुले हार्मोनियम वाजवून भजन गात होती. जिन्याच्या वरच्या बाजूला पांढऱ्या दगडांची उंच गच्ची होती, माहिती लिहिलेल्या मूर्ती त्यांत कोरलेल्या होत्या. देवदर्शन घ्यायला आलेले यात्रेकरू जाता-येतांना त्यावर पाय देऊन जातात. सर्वांची पदधूली अंगाला फासून कुंदलाल शहा बायकोमुलांसह तिथे पडून असायचे.

प्रचंड हॉल, चारी बाजूच्या भिंतींवरही नाना रंगढंगांचे हावभाव दर्शविणाऱ्या रंगित दगडी कोरीव मूर्ती. सगळीकडे फिरून त्या पाहिल्या, जमिनीवरचे नक्षीकाम पाहिले. झुंबरांची चमक पाहिली आणि दिव्यांचा झगझगाट पाहिला. सर्वांत शेवटी येऊन पाहिले, एका बाजूला, चारीकडून कठड्याच्या आत बंदिस्त राधाकृष्णांची लहानशी मूर्ती होती.

आश्चर्याने थक्क झाले. इतक्या सर्व ऐश्वर्यामध्ये मळके, फाटके कपडे घालून तिथे कोण उभा होता ?

हळूहळू मी पुढे गेले.

सोळा सतरा वर्षांचा तो एक मुलगा होता. हातात लहानसा टिनाचा आरसा घेऊन कागदावर चिकटवलेला राधाकृष्णांचा फोटो व राधाकृष्णांची मूर्ती यांच्यातील साम्य तो पडताळून पाहात होता.

मी विचारले, " जुळले का दोन्ही ? "

समाधानाने हसून वर पाहात त्याने मान हलवली – हो.

परत येताना वाटेत एका साधूची गाठ पडली. पाहाताच मी ओळखले. जवळ येऊन त्यांनी विचारले, " आणखी किती दिवस आहात इथं ? "

मी म्हटले, " आता परत जायची वेळ झालीच आहे. "

आक्का म्हणाल्या, " हे कोण ? किती जणांना तरी आपण पाहिलं. हेच येऊन बोलले, ओळखतेस वाटतं ? "

चालता चालता मी म्हटले, " हे माझे यमुनाकाठचे नागा मित्र, त्या एका दिवसाचीच ओळख. "

मातीच्या भिंतीवर उगवलेली काटेरी फुले आज सेवाश्रमची गल्ली प्रकाशित

करीत होती. वासंती रंगाची फुले, नाजूक झिरझिरित पाकळ्या, जणू काही नुकतीच कोषांतून बाहेर पडलेली, पंख थरथरणारी पिवळसर फुलपाखरेच !

मथुरेला आलो.

टप्, टप् पाऊस चालू होता. मुळीसुद्धा उसंत नव्हती.

यमुनेच्या तीरावर 'बंगाली घाट' होता. उंच अशा जिन्याच्या दोन बाजूंना खांबांवर, चारी बाजू उघड्या व गच्ची असलेल्या खोल्या, पाण्यावर बऱ्याचशा पुढे आलेल्या होत्या. त्यांच्यापैकीच एकात अगदी कडेला मी बसले होते. आज आणखी कुठे जायचे नव्हते. पुष्कळ दिवसांनंतर जणू विश्रांती मिळत होती, जणू थोडा वेळ स्वस्थता लाभली होती. गेले कित्येक दिवस फक्त चालत होते, पाहात होते. फार पाहिल्याचासुद्धा एक प्रकारचा थकवा असतो.

खालच्या पाण्याकडे पाहात कितीतरी गोष्टीचा विचार करीत होते.

अंधूक आकाशातील पावसाच्या धारांनी पडदा सोडून जणू काही मला सर्व गोष्टींपासून आड ठेवले होते. निश्चितपणे आता स्वतःला पाहू शकत होते. फार व्यस्त असताना क्वचित मिळणाऱ्या या फुरसतीचीच वाट मन पाहात असतं.

यमुनेच्या पाण्यात सर्व ठिकाणीच कासवे भरलेली ! एकेकाच्या अंगावर शेवाळे उगवले होते. कासवे दोन प्रकारची होतीसे वाटते. एकाचा रंग हिरवट पिवळा वाटला.

घाटाच्या तीरावर पंड्यांचे बस्तान होते. दारावर एक साइनबोर्ड लटकत होता "कानी लाडू, साडे आठ भाई" – 'Ladoo in ear $8\frac{1}{2}$ brothers."

चांगले गलेलठ्ठ व दणकट असे कितीतरी पंड्ये सावकाराच्या ऐटीत तक्क्याला टेकून बसले होते. शेजारीच वटकृष्ण पाल यांची धर्मशाळा होती. बंगाली तीर्थ यात्रिणींच्या एका पथकाला पंड्याने इथे आणून सोडले आणि घाटावर बसलेल्या न्हाव्यासमोर त्याने नगद पैसे टाकून गाल पुढे केला. जणू काही गायींच्या कळपाला कुरणात चरायला सोडून तो शांत चित्ताने आराम करायला बसला होता.

वडाच्या झाडाखाली यात्रिणी आपापली बोचकी सोडून पितळी तसराळ्यात डाळ, तांदूळ व एक बटाटा एकत्र शिजवून घेण्याची व्यवस्था करीत होत्या. त्यांनी

दगडांची चूल मांडली होती आणि चार पैशांच्या काटक्या पेटवून कुणी मिळून तर कुणी निरनिराळ्या अशा स्वयंपाकाला लागल्या होत्या. एक अल्पवयीन सुवासिनी सून कुमिल्ल्याहून आपल्या आतेसासूबरोबर आली होती. ती बोचक्याला टेकून बसून पान चघळीत होती. कारण, कचोरी, भजी आणि फुलोरी तिने पोटभरून खाल्ली होती. आजच्या पुरता तिच्या जेवणाचा प्रश्न नव्हता. जवळच त्याच वयाची एक रूक्ष विधवा स्त्री फाटक्या कपड्यांत बांधलेले आपले गाठोडे पुन:पुन्हा सोडीत होती आणि बांधीत होती. कसलेतरी असमाधान तिच्या मनात होते.

ही मंडळी गावाहून निघाल्याला दीड महिना झाला होता. पुष्कळ फिरल्या होत्या – फिरणार होत्या. गिरिगोवर्धनला जाणार होत्या. आजच्या या संध्याकाळी जी काही मिळेल तेवढीच विश्रांती मिळणार होती. उद्या पुन्हा सामानसुमान खांद्यावर घेऊन रस्ता धरतील. त्यांच्यामध्ये थरथर कापणाऱ्या कितीतरी म्हाताऱ्या होत्या. त्यांना एवढी शक्ती कशामुळे येते ? झोप नाही, खाणे नाही. तीनचार दिवसांनी स्वयपाक करायला मिळाला तर मिळाला. नाहीतर पोटलीतून कुरमुरे, पोहे काढून पाण्यात भिजवून तेच खाऊन दिवस काढतात. पैसा अडका जो काही बरोबर आणतात तो सर्व पंड्येच नाना निमित्तांनी आपल्या कनवटीला लावतात.

एक गंगाभागिरथी म्हातारी घाटावर भांडी घाशीत बसली होती. लोखंडी पळीने तिने एक घाव कासवाच्या मानेवर मारला. भांडे धुवायला गेलो तर कासव सारखी मान बाहेर काढीत होते. न मारून काय करणार ?

पलीकडे तीरावर चिता जळत होत्या – एक, दोन, तीन, चार. तिकडे दूर त्या काय आणखी दोन !

आक्का आल्या आणि काही न बोलताच शेजारी बसल्या.

एरवी आमच्या बोलण्याला खीळ पडत नाही. आज मात्र काहीच बोलत नव्हतो. शेजारी शेजारी दोघी बसलो होतो, दोघींच्या भावना जणू एक होऊन दूर जाऊन मिळाल्या होत्या. अस्पष्ट चितेच्या पलीकडे जिथे सीमारेषा एका धूसर रंगाच्या आवरणामध्ये मिसळून गेली होती तिथे !

हिरवट रंगाचे मध्यम आकाराचे एक कासव इतका वेळ तीन पायांनी पोहत होते. दुसऱ्या एका कासवाने खालून ढुशी मारून त्याला उताणे केले. खरोखरच पाठीमागचा उजवा पाय त्याला नव्हताच. लहानपणी कुणीतरी कापला असेल.

पंड्याला बरोबर घेऊन दादा आले. ते म्हणाले, "पाऊस थोडा थांबला आहेसे वाटते; चला मथुरानाथचे दर्शन घेऊन येऊ."

यमुनेच्या काठाकाठाने पक्का बांधलेला रस्ता होता. दुकाने, बाजारपेठ सर्व काही तिथे होते. हे घेऊ का ते घेऊ असे होऊन जायचे. हातांनी काढलेली देवदेवतांची चित्रे किती तरी होती. डोक्यावर दूध घेऊन जाणारी गवळण, पाठ खाजवणारे हरिण, पिसारा फुलवून त्याची शोभा दाखवणारा मोर अशी नराणीने काढलेली नानाविध चित्रे फक्त दोन आणे, चार आणे, आठ आणे एवढ्याच किंमतीला होती.

दुधाने भरलेले जाड साईचे पक्वान्न वाटल्यास, शेराच्या हिशोबाने घ्यावे, वाटल्यास पावाच्या हिशोबाने घ्यावे. किती म्हणून स्वस्त !

पातेली, चमचे, कालथा, वाट्या, शेगडी अशा सर्व भांड्यांनी भरलेली पितळी बालदी तिथे मिळत होती. अशी एक बालदी बरोबर असली म्हणजे बाहेर पडल्यावर स्वयंपाकाच्या सरंजामाची काळजी राहत नाही. किती सोयीचे !

बर्फाच्या लादीवर मांडून ठेवलेली विड्याची पाने तेव्हाच्या तेव्हा दुकानदार लावून द्यायचा. त्या थंड विड्याचा स्वादच निराळा होता.

पंड्या ओरडत होता, "पुन्हा पाऊस येणार आहे, लवकर चला."

पंड्याचे काम फक्त मंदिर दाखवायचे होते. तो एकदोन पावले जायचा न जायचा तोच थांबायचा, त्याला आवडत नव्हते.

मथुरानाथच्या मंदिराचे दार बंद होते, लवकरच उघडणार होते. म्हणून एकमेकांना धक्के देऊन सभामंडपात जाऊन उभे राहिलो.

जरा वेळाने दार उघडले.

मंदिराची दारे उघडताच चोहोबाजूंनी कमले तरी दडपण आल्यासारखे वाटले. आक्काचीच काळजी वाटत होती. त्या म्हणजे अगदी बारीक. उजव्या हाताने त्यांच्या कमरेला विळखा घालून धरून ठेवल्याबरोबर त्यांचे जमिनीपासून पाय सुटले व त्या अधांतरी उभ्या राहिल्या. पाय ठेवायला जागा नव्हती. दुसऱ्या कुणाच्या तरी पायांनी ती जागा बळकावली होती. त्यानंतर एका क्षणात जे काय घडले ते विचारू नका – आम्ही सर्व मिळून झोके घेत होतो. एकदा धरधर करीत पुढे जात होतो आणि लगेच दुसऱ्याच क्षणी एका धक्क्याने खाली जिन्याजवळ गडगडत जात होतो, याप्रमाणे गडगडून पडलेल्या अवस्थेतच कुणीतरी सर्वांना उचलून डावीकडे ढकलले, डावीकडून ईशान्येकडे, ईशान्येकडून एक झोका घेऊन नैर्ऋत्येकडे, तिथून क्षणात वायव्येकडे आणि वायव्येकडून आग्नेयीकडे. असे आम्ही फेकले जात होतो, धरणीकंपामध्ये जसे काही सर्व हादरत होते. अंग सैल सोडून दिले होते, ही एक फारच

गंमत होती. मी, आक्का आणि दोन्ही हातांनी मला मिठी मारून धरून ठेवणारी दाक्षिणात्य सून या आम्हा सर्वांची झोकांड्या खाताखाता मुरकुंडी वळली. तीर्थयात्रेला निघाल्यापासून गर्दीचे पुष्कळ निरनिराळे अनुभव घेतले होते; पण हा आत्ताचा प्रकार अगदी नवीन होता, हसता हसता शेवटी एकदा बाहेर ढकलले गेलो. घाईघाईने रुंद असा एक खांब मी दोन्ही हातांनी गच्च पकडला आणि आक्कांनी मला धरले हसून संपल्यावर डोळ्याचे पाणी पुसून श्वास घेऊन आम्ही शांत झालो.

आक्का म्हणाल्या, " राजदर्शनच ते ! असे होणार नाही तर काय ? गुराखी बेटा झाला राजा, त्याची ऐटच निराळी. "

" पण आक्का, माझं मथुरानाथचं दर्शन कुठं झालंय. "

" हे आताच झालं नाही का ? इथं आलात, समोर उभे राहिलात-- आणखी काय पाहिजे ? झालं दर्शन !" असे म्हणून आक्का बाहेर पडण्याचा रस्ता शोधू लागल्या.

मथुरा शहरापासून जरासे दूर केशवदेवांचे प्राचीन मंदिर आहे. औरंगजेबाने ह्या मंदिराची मशीद केली होती नंतर त्याच्या शेजारीच छोट्या मंदिरात केशवदेवाची स्थापना झाली.

शेजारीच कंसाचे कारागृह आहे. श्रीकृष्णाचे जन्मस्थान. बाजूनी कठडा असलेले साधे खोपटे; माता-पिता बंदिवान असल्याचा हा जाज्वल्य पुरावा. दरवाजावर, भिंतीवर शेणाचे असंख्य ठिपके होते, पर्वणीच्या पूजेला शेंदराचे बोट लावतात हे मला माहीत होते. परंतु शेणाचे बोट लावलेले कधी पाहिले नव्हते. पंड्या म्हणाला, " अपुत्रवती येथे नवस करतात अन पुत्रवती होतात. नंतर मुलाला कडेवर घेऊन येऊन इथं पूजा करतात व शेणाचा टिळा भिंतीवर लावतात. पाहा ना, इथं पूजा करून कितीजणी पुत्रवती झाल्या आहेत ते ! मोजून संपायचे नाहीत हे ठिपके. "

कारागृहाच्या शेजारीच पुत्रकुंड. आक्कांनी हाक मारली, " ऐका, ऐका, लवकर या. हा घ्या हातोहात पुरावा. अनिल तर कशावरच विश्वास ठेवीत नाही, एके काळी कृष्ण कुणी होता हे तो मानायलाच तयार नसतो. किती थट्टा केली त्यानं माझी त्या दिवशी ! आता परत गेल्यावर त्याला सांगता येईल की ज्या म्हणून कुंडात कृष्णाची बाळंती धुवायची ते पुत्रकुंड या वेळी पाहून आलो म्हणून. काय, पंड्या असंच म्हणा-लात ना ?"

उत्साहाने पंड्याने मान डोलवली, " हो, हो, कृष्णाच्या घाण झालेल्या गोधड्या

इथं धूत असत. लहान मूलच ते, मिनिटा मिनिटाला खराब करायचा."

ध्रुवघाटावर आलो. वसुदेव कृष्णाला कडेवर घेऊन यमुना पार करीत होते तेव्हा रामकृष्णदेवांनी मथुरेला येऊन याच घाटावर बसून पाहिले.

यमुनेच्या इतर घाटांच्या मानाने हा घाट पुष्कळच एकाकी आणि शांत होता. एकदा इथे आल्यावर चटकन उठावेसे वाटत नाही.

हा विश्रामघाट. असुरांचा वध केल्यावर कृष्णबलरामांनी इथं विश्राम केला होता.

यमुना घाटावर रोज संध्याकाळी आरती होते. गंगेची आरती पाहिली, आता आलोच आहोत तर यमुनेचीही पहावी असे मनात आले.

उशीर होईल असे वाटले म्हणून आम्ही धावत धावत घाटावर आलो. इतक्या लोकांच्या गर्दीत उभे राहून जास्त काय दिसणार ? लोकांना घेऊन नौका सारख्या यमुनेच्या मध्यावर जात होत्या. पंड्या म्हणाला, " तिथून ते लोक आता आरती पाहाणार."

तर मग आपणही जाऊ या ना !

लोकांचे पाहून काही मंडळींना घेऊन आम्ही नौकेत बसलो. नौका निघाली.

आता यमुनाघाटाचे, मथुरानगरीचे रूप नीट दिसू लागले. उंचनीच राजप्रासाद, घरे, मंदिरांचे कळस, स्नानाचे घाट सर्व काही दिसत होते. काहींवर अस्तास जाणाऱ्या सूर्याची आभा पसरली होती. तर काहींवर संध्याकाळचा दाट अंधकार पसरला होता. सर्व मिळून कशी स्वप्ननगरी वाटत होती.

यमुनेच्या घाटावर उंच अशी एक वेदी होती. निळ्या रंगाचे बनारसी सोवळे नेसून एक गौरवर्णीय देखणा तरुण पुजारी त्या वेदीवर उभा होता. रुंद छाती, बारीक कंबर, कसा अगदी सुडौल बांधा होता.

आरतीचे काशाचे वजनदार प्रदीप खालून दोघांनी त्याच्या हातात दिले. तुपात भिजवलेल्या वातींच्या ज्योती वाऱ्याने जोरात हलू लागल्या. पुजारी प्रथम सावकाश सुरुवात करून नंतर लवकर लवकर आरती ओवाळीत होता. शून्यामध्ये संध्याकाळच्या अंधारात आरतीचा प्रकाश ठळकपणे दिसत होता. बाकी सर्व अंधारात झाकले होते.

किती अपरूप हे रूप !

आक्का म्हणाल्या, " चला लवकर लवकर. तीरावर जाऊ या. आरतीला स्पर्श केला पाहिजे."

मला वाटले, आरतीला स्पर्श करायचा तर आरती त्या पुजाऱ्याच्या हातात असतानाच तो केला पाहिजे.

ढकलत ढकलत आक्कांना घेऊन तिथे पोचले. आरती हातात घेऊन पुजारी नुकतेच वेदीच्या खाली उतरून उभे होते. हात लांब करून आरतीच्या ज्योतीला स्पर्श केला तेवढ्यात तो आरतीचा मोठा प्रदीप त्यांनी दोन्ही हातांनी धरून मोठ्या प्रयत्नाने जपून खाली वेदीवर ठेवला. सर्व लोक त्यावर तुटून पडले. पुजारी मंदिराकडे निघाले. त्यांच्या अंगाला दरदरून घाम सुटला होता.

सौंदर्य काय नुसते मनाला आनंद देण्यासाठी असते ? छे ! तसे नाही. सौंदर्याने मनात गांभीर्यही किती उत्पन्न होते !

आग्रा हॉटेलात परत आलो. बंगाली घाटावर त्याच यात्रिणी आपापल्या गाठोड्यावर डोके टेकून डुलक्या घेत होत्या. " कानी लाडू माईआठ भाई "च्या बैठकखान्यासमोर ठेवलेल्या पाटचावर भांग वाटणे चालले होते. गुंडासारखा दिसणारा एक पंड्या, काशाचा तांब्या समोर ठेवून राम-हनुमानाच्या गाण्याच्या शेवटी 'होऽऽ' अशी आरोळी ठोकून, सगळा परिसर दुमदुमून टाकून, जोरजोराने भांग घोटीत होता. कुसिल्ल्याची ती स्त्री त्याच्या समोर उभी राहून हलतडुलत, लाडालाडात बोलत होती.

वटवृक्षाखाली एका कोपऱ्यात अधूक प्रकाशात एकटी बसून तीच ती रूक्ष विधवा आपले गाठोडे उचकटून एकचित्ताने काहीतरी पहात होती. गुलाबी रंगाचा सॅटिनचा बाबासूट होता तो. कदाचित आजच दुपारी, घरी सोडून आलेल्या तिच्या दोन वर्षांच्या भाच्यासाठी तिने घेतला असेल.

टांग्यात बसून गिरिगोवर्धनला निघालो होतो. चांगला दूरचा रस्ता होता. दोन्ही बाजूंना सोनेरी गव्हाची शेते होती. मधूनमधून त्यांवर हिरवेगार पोपट झेपावत होते, उडत होते. अंजिरांच्या झाडांच्या ढोलीत हे पोपट राहात. एक पोपट लाल चोच बाहेर काढून बसला होता–– आई असणार बहुतेक. ओल्या जमिनीच्या मधून मोठमोठ्या झाडांच्या सावलीने झाकळलेला असा डांबरी रस्ता गेला होता.

आक्का म्हणाल्या, " पाहा, परमेश्वराची किती कृपा. पाऊस नाही, वादळ नाही. किती आरामात चाललो आहोत आपण. "

आक्कांच्या परमेश्वरी कृपेवरच्या विश्वाला सीमा नव्हती. उठता बसता त्याच्या कृपेचा मी त्यांच्या तोंडून ऐकत होते. आता पाऊस नाही तर म्हणतात, " काय त्याची कृपा ! " पाऊस पडल्यावर त्या पुन्हा म्हणतील, " पाऊस आला बरं झालं, चालताना त्यामुळं उन्हाचा त्रास होत नाही ही तरी काय त्याची कमी कृपा झाली? "

काही पंडचे गाडीचे चाक धरून बरोबर धावत येत होते. एक म्हणायचा, " मी अमूक. गिरिगोवर्धनला मला पंड्या म्हणून घ्या. " दुसरा म्हणायचा, " माझं नाव सर्वांनाच माहीत आहे. माझ्यासारखा दुसरा पंड्या मिळणार नाही. " एक म्हणायचा, " मी आहे साडेचार भाऊ. सर्वजण एकमुखानं म्हणतात, पंड्या असावा तर असा. "

मी म्हटले, ' साडेचार भाऊ ' हे आणखी काय ? बंगाली घाटावरसुद्धा ' साडेआठ भाऊ ' असे लिहिलेले पाहिले. "

आता एकदा त्याच्याशी बोलून चुकले तेव्हा त्याला घेतल्याशिवाय जाणार कुठे? मोठ्या उत्साहाने इतर सर्वांना कोपराने बाजूला करून त्याने गाडीमध्ये तोंड खुपसले. तो म्हणाला, " साडेचार भाऊ म्हणजे-- आम्हा पाच भावांपैकी चौघांची लग्न झाली आहेत. एक भाऊ अजून लग्नाचा आहे. जोपर्यंत लग्न झालं नाही तोपर्यंत कुणी ' पुरा ' होत नाही, तो ' अर्धा 'च राहातो. "

भटक्या बेदिया लोकांसारखे बायको, गाय, संसार सगळे बरोबर घेऊन लोकांचे घोळके चालले होते, बैलगाडीवर लांब बांबूवर झोपडीसारखे काही बांधलेले होते आणि आत लहान लहान खाटली होती. हे लोक वाटेत मध्ये थांबतात, स्वयंपाकपाणी करतात आणि झाडाच्या सावलीत खाटली टाकून त्यांवर मुलांना झोपवतात. रात्री त्याच बैलगाड्यांखाली खाटावर ते स्वतःही झोपतात. चौऱ्यांशी कोस प्रदक्षिणेला हे सर्व यात्री निघाले होते. गाडीत सर्व सामानसुमान भरून ते पायीच चालतात, पावसापाण्यात महिनाभर ते असेच चालतात.

आमचा म्हातारा टांगेवाला फार भक्तिवान होता. तो म्हणाला, " लीलास्थळ कुठं होतं कुणास ठाऊक ? खऱ्या जागा तीनच-- यमुना, गिरिगोवर्धन आणि व्रजरज. एवढंच काय ते बाकी आहे या चौऱ्यांयशी कोसांत. "

वाटेत लागलं आडिम्गाव. दह्याचा हंडा डोक्यावर घेतलेल्या राधेला नावेतून नदी पार करून देण्यासाठी कृष्ण इथे फेरीवाला म्हणजे ' दानी ' झाला होता.

अरिष्टासुराचा वधही इथेच केला होता. म्हणून गावाचे नाव हेच पडले.

गिरिगोवर्धनला पोचल्यावर टांग्यातून उतरून शहरात शिरलो. पंड्यांनी आम्हांला एका तळ्याजवळ आणून उभे केले. तो म्हणाला, " एक गंगा पाहून आलात आता ही दुसरी पाहा. ही 'मानसगंगा'. इथे कृष्णाने वासरूरूपी असुराचा वध केला होता. तेव्हा राधा म्हणाली होती, असेना का असुर, पण तो वासरूरूपी होता ना ? त्याला मारल्यामुळं तुमच्या हातून गोहत्येचं पाप झालंय. आधी गंगेत स्नान करून प्रायश्चित्त घ्या मग मला स्पर्श करा."

कृष्ण म्हणाला, " माझ्या पादोदकापासून गंगेचा जन्म झाला आहे. त्याच गंगेत मी स्नान कसं करू ? तरीसुद्धा मी तुझ्या शब्दासाठी करतो." असे म्हणून कृष्णाने आपल्या मनातून ही मानसगंगा निर्माण केली. तो म्हणाला, " ही झाली श्रेष्ठ गंगा."

राधेने विचारले, " त्याला पुरावा कोणता ? दुसऱ्या देवतांनीसुद्धा मानली तरच ना ?"

कृष्णाने लगेच देवदेवतांना आवहन केले. सर्व देव मानसगंगेत धावत आले. एक एक करून सर्व देव येत होते. आणि राधा त्यांना विचारीत होती—

" तुम्ही कोण ?"

" मी ब्रह्मा."

" तुम्ही कोण ?"

" मी शिव."

" तुम्ही ?"

'मी मनसा', 'मी लक्ष्मी', 'मी वराह', 'हिरण्यकशिपू', 'सरस्वती', 'यमुना', 'इंद्र' – अशी ओळख सर्व देत होते. तेव्हा कुठे राधेचा विश्वास बसला, ती म्हणाली, " आता तुम्ही यात स्नान करू शकता."

या मानसगंगेत स्नान केल्याने तीर्थयात्रा केल्याचे पुण्य मिळते. कार्तिक महिन्यातील अमावास्येला अकरा मण तुपाचे दिवे इथे लावतात. रामधनुष्याइतक्या जाड दुधाच्या धारा मानसगंगेवरून वाहातात. कधी इकडून तिकडे तर कधी तिकडून इकडे, जशी त्या परमेश्वराची इच्छा असेल तसे. इतके दूध कुठून येते ते काही सांगता येत नाही. इतक्या दुधामुळे पाणी पांढरे होऊन जाते.

मी म्हटले, " आक्का, चौसष्ट तीर्थस्थानांचे पुण्य मिळेल, मारा एक बुडी. "

ते पाणी पाहून आक्कांसारख्या भक्तिमतीलासुद्धा पाण्यात उतरण्याची इच्छा होईना. हिरव्या शेवाळाने पाणी भरलेले होते. आजीच्या भाषेत सांगायचे म्हणजे पाण्यात भांग पसरली होती.

सोय, गैरसोय सर्व पाहून शास्त्राधार देऊन अगदी ब्राह्मण पंडितासारखे बोलायचे हे पंड्यांना चांगले माहीत असते. तो म्हणाला, " स्नान केले नाही तरी चालेल. पाण्याला नुसता स्पर्श करून कपाळाला हात लावा. "

आक्कांना घेऊन पंड्या पायऱ्या उतरून खाली गेला. मीसुद्धा गेले. पंड्याने एक ओंजळभर पाणी आक्कांच्या हातात दिले आणि तो म्हणाला, " घ्या आणि मंत्र म्हणा. " असे बोलून त्याने अर्धाअधिक मंत्र जोर जोरात म्हटला आणि बाकीचा पूर्ण न करताच खट्दिशी आक्कांचे जोडलेले हात धरून विचारले, " दक्षिणा किती देणार ते आधी सांगा. "

बोटांच्या फटीतून इकडून तिकडून गंगाजल टप् टप् खाली झरत होते. गंगाजलानेच लोक गंगातर्पण करतात. आक्कांनी लगेच मोठ्या दक्षिणेचे आश्वासन दिले. खूष होऊन पंड्याने हात सोडून दिले व तो म्हणाला, " अच्छा, आता म्हणा तर – नमो मानसगंगायै, आता हातातले गंगाजल गंगेला अर्पण करा. "

कोरडी ओंजळ उघडून मानसगंगेला मानसगंगेचेच तर्पण करून आक्का तरातरा वर चढून आल्या आणि म्हणाल्या, " कसं अडवून धरतात पाहा ! उगीच नाही आपली भक्ती नाहीशी होत ! "

गिरिगोवर्धनाच्या मंदिरात गेल्यावरसुद्धा या पंड्याच्या तडाख्यात सापडून पूजा करावी लागते. याचे एकमेकांत ठरलेलेच असते वाटते; एकजण आत घेऊन जातो आणि दुसऱ्याच्या स्वाधीन करतो. त्याला टाळून बाहेर येणे कठीण असते.

दादांना कटकट आवडत नाही. ते म्हणाले, " जास्त बोलण्यात काय अर्थ आहे ? इतका त्रास घेऊन इथं आलो, आणखी थोडा त्रास सहन करा. ते म्हणतील त्याला राजी व्हा. "

यात्री पाहून त्याप्रमाणे पूजेची व्यवस्था होते. पंड्या म्हणाला, " गिरिगोवर्धनला फूल, चंदन, नैवेद्य, वस्त्र व पंचरत्नं द्यावी लागतील. "

ऐकून मी चमकलेच. पंचरत्नं ! किती रुपयांसाठी आम्हांला ते ओढून धरतील हे काही मला कळत नव्हते.

मी विचारले, " पंचरत्नं कोणती कोणती ? "

" हीच – सोनं, रुपं, तांबं, हिरा, माणिक आमच्या जवळ आहेतच, विकत घ्यायला कुठं जायला नको. "

" किमत ? "

" माणशी सव्वा रुपया लागेल. "

ऐकून मी सुटकेचा नि:श्वास सोडला. पंड्या पूजासामग्री घेऊन आला. आक्का आणि मी आधी पूजेसाठी बसलो. गिरिगोवर्धन म्हणजे एक शिला; पुष्कळशी शिवासारखीच. परंतु ही जणू काही जमीन दुभंगून वर आलेली, चपटी, सारवून पुसून स्वच्छ केलेली. त्याच्यावरच दाण्दिशी आपटून सुका नारळ अर्पण केला. शिळ्या जास्वंदीच्या फुलांनी पाणी शिंपडून आम्ही म्हटले, " या गंधपुष्पांनी तुमची पूजा केली. काकडी, केळी यांचा राजभोग दिला. तेलकट रेशमी कपड्याच्या तुकड्याच्या अर्पणाने वस्त्रदान झाले. आणि पंचरत्ने ? एक सँडपेपरची कागदाची छोटीशी पुडी हातात देऊन पंड्या म्हणाला, " हां, हां, उघडू नका, उघडू नका, पडून जातील. हरवतील. " असे म्हणून घाईघाईने मंत्र म्हणून त्याने हातातली पुडी काढून घेतली. सर्व उपचारांनी आमची पूजा झाली.

आता दादा आणि व्रजरमण शेजारी शेजारी बसले. गिरिगोवर्धनला वाहिलेलं तेच फूल पंड्याने उचलून आणले. दक्षिणा दिल्यावर सर्व शुद्ध होते. तोच तो एक रेशमी कापडाचा तुकडा हजार जण हातात घेऊन म्हणतात, " हे नारायणा, तुला हे नववस्त्र अर्पण करतो. "

सर्व पंड्यांना वाटेला लावून मन हलके करून निघावे असे वाटत होते. दक्षिणा मिळाल्यावर जो तो आपल्या वाटेने निघून गेला. परंतु 'साडेचार भाऊ' वाला काही केल्या पाठ सोडीना. मागे वळून वळून दादा त्याला विचारीत होते, " तुला बरोबर यायला कुणी बोलावलंय ? "

पानतंबाखू खाऊन तपकिरी झालेले दात काढून हसून त्याने मुठी आवळल्या, "पंड्याला कोण बोलवतं बाबू ? पंड्या आपणहूनच येतो. "

इथेसुद्धा भक्तांनी स्थापन केलेली नाना देवदेवतांची मंदिरे आहेत. ही जागा निर्जन म्हणून इथेसुद्धा येऊन रूप-सनातन आणि अद्वैत महाप्रभू भजन-साधना करीत असत.

**" वामे अद्वैत प्रभु, दक्षिणेस निताई,**
**मध्यासने बसले चैतन्य गोसाई ! "**

मानसगंगेची प्रदक्षिणा सव्वा कोसाची आहे. किनाऱ्यापासून अरुंद अशी चालण्याची वाट असून दोन दोन पावलांवर मंदिरे आहेत. सर्व हिंडून पाहिली. इथे मणिपूरचेच यात्रेकरू व पुजारी जास्त होते. त्यांना पाहून आक्का फार खूष होत. आपणहून त्यांच्याजवळ जाऊन प्रांतिक भाषेत त्या त्यांच्याशी ओळख करून घेत. तेही हसत आणि आक्कापण हसत. जणू काही सर्वजण माहेरची आप्तस्वकीय मंडळीच होती आणि पुष्कळ वर्षांनंतर परक्या देशात त्यांची गाठ पडली होती. कुणी हळूच 'संदेश'चा प्रसाद आणून द्यायचा, कुणी प्रेमाने बसायला आसन द्यायचा, कुणी बोलावून घेऊन जायचा. नंतर एखादा सांगायचा, "अस्सल गोष्ट बघून जा – जीभ. पुष्कळांना माहीतच नाही, ही आहे गिरिराजाची जीभ."

पिवळ्या दगडावर एवढा मोठा जिभेचा ठसा, रघुनाथ स्वामींनी स्थापन केली ही शिला. रोज पूजा होते.

चालता चालता दादा आक्कांना म्हणाले, "तराशच्या जमीनदाराचे मंदिर इथंच कुठं तरी आहे ना ?" ते बोलतात न बोलतात तोच त्याच्याच समोर येऊन आम्ही पोचलो.

अंगणातल्या विहिरीतून एक चिडचिडी म्हातारी पाणी काढीत होती. तिची एकसारखी वटवट चालली होती, "आता होत नाही रे बाबा – राजाचा जावई त्याची मर्जीच निराळी. कुणाला चालता येतं त्याच्या मर्जीप्रमाणं ? हात गेले, रथ गेला तरी सुटका नाही."

बादलीतले पाणी छोट्या पितळी कळशीत ओतून, कंबर वाकवून म्हातरीने ती कळशी कमरेवर घेतली.

इतक्या वेळानंतर तिचे आमच्याकडे लक्ष गेले.

मी विचारले, "राजाचा जावई कोण ?"

म्हातारी वाकत वाकत जवळ आली, इकडे तिकडे पाहून हलक्या आवाजात म्हणाली, "राजाचा जावईच झाला की, राजकन्या विडा द्यायला गेली – तिलाच घेतलं नाही का ?" एवढे बोलून कपाळाला आठ्या घालून नाना हावभाव करीत तिने बाकीची घटना खुणा करून सांगितली.

रस्त्यावर आल्यावर दु:खित मनाने मी आक्कांना विचारले, "राजकन्या विडा-द्यायला गेली, राजकन्येलाच त्यांनी ठेवून घेतलं, या कसल्या कुटाळ गोष्टी देवळामध्ये ?"

आक्का हसायला लागल्या. त्या म्हणाल्या, "तुला माहीत नाही वाटतं ? राधाविनोदचं म्हणूनच तर 'जावई देव' नाव आहे. तोराशचा जमीनदार मोठा जमीनदार होता. सर्व लोक त्याला राजाच म्हणत. त्याची अविवाहित मुलगी राधाविनोदची पूजा करायची; त्याला स्नान घालायची, सजवायची, जेवाखायला द्यायची यातच ती दंग असायची. एक दिवस प्रसादानंतर विडा तयार करून तो राधाविनोदला द्यायला मुलगी आत गेली; राधाविनोदनं विड्यासकट मुलीलाही ओढून घेतलं. तेव्हापासून मुलीला कुणीही पाहिलं नाही. तेव्हापासूनच राधाविनोद जावयाच्या कौतुकानंच इथं आहेत. कुमारी मुलीचं ज्यानं पाणिग्रहण केलं तो जावईच झाला, जावईषष्ठीला इथं मोठ्या धूमधडाक्याचा उत्सव होतो. खरं मंदिर आहे वृन्दावनाला. इथं आहे त्यांचा प्रतिनिधी."

श्यामकुंड—राधाकुंडावर येऊन पोचलो. एकमेकांला लागून ही दोन कुंडे आहेत. मध्ये पक्क्या बांधलेल्या निमूळत्या रस्त्याने अलग अलग केलेली.

ही जागा जंगलांनी घेरलेली आहे. चैतन्य महाप्रभू लीलास्थलीचा उद्धार करायला इथे आले होते. शोधीत शोधीत ते इथे आले आणि पाहिले शेजारी शेजारी दोन भाताची शेते आहेत. ओंजळ भरून शेतातले पाणी त्यांनी डोक्यावर घेतले. तिथली माती घेऊन कपाळी टिळा लावला.

महाप्रभू म्हणाले, "हे भाताचं शेत झालं श्यामकुंड आणि हे राधाकुंड."

नंतर भक्तजनांनी दोन कुंडे बांधून काढून शोभा आणली आहे. या कुंडांचा महिमा अपार आहे.

कुंडाच्या कडेकडेने तुंगविद्याकुंज, सुदेवीकुंज, चंपकलता, रसमंजरी, कस्तुरीमंजरी असेच किती तरी कुंज आणि मंजरी आहेत. राधाकृष्ण सखींबरोबर कुंडात जलक्रीडा करीत, कुठे एखाद्या कुंजात झोके घेत, कुठे शृंगार करीत, कुठे विश्राम करीत. वैष्णव भोगारती म्हणतात —

**"मध्यान्हकाली राधा करण्या सूर्यपूजा**
**राधाकुंडी आली कौतूहले मोठ्या,**
**संगे सखीगण येती भेटण्या श्रीकृष्णा**
**राधाकुंडी केल्या नानारंगी जलक्रीडा.**
**तृप्त होउनी जलक्रीडेने कुंडतीरी येई**
**वेशभूषा सयत्ने राधाराणी करी**

**श्रीकृष्ण बसता तेव्हा करण्या भोजन**
**वाढी राधा, होउनी आनंदित मन. "**

आक्का म्हणाल्या, " क्रीडा फक्त रसास्वादासाठीच. "

यात्रेकरू आधी श्यामकुंडाचे पाणी डोक्याला लावतात आणि नंतर येऊन राधा-कुंडात उतरतात. पाण्यामध्ये नीट डुबून पुन्हा पुन्हा स्नान करतात. राधाकुंडाचेच महत्त्व जसे काही सर्वांत जास्त आहे.

श्यामकुंड पाहून राधा रुसली, ती म्हणाली, " मी तुमच्या कुंडात स्नान करणार नाही. स्वतःच्याच कुंडात स्नान करीन. " असे म्हणून हातातल्या काकणांनी ती माती उकरायला लागली. श्यामकुंडाचे पाणी खळखळत वाहात आले आणि राधा-कुंड भरून गेले. कृष्ण हसून म्हणाला, " माझ्या कुंडापेक्षा तुझं कुंड मला जास्त प्रिय आहे. माझ्या कुंडात स्नान केलं तर लोक सर्व पापापासून मुक्त होतील; परंतु तुझ्या कुंडात स्नान केलं तर त्यांना माझं प्रेम मिळेल. "

पक्क्या बांधलेल्या रस्त्याच्या बाजूंनी टोपल्या टोपल्या तिलकमृत्तिका घेऊन लोक विकायला बसले होते. राधाकुंडाची तिलकमाती पिवळ्या रंगाची आणि श्याम-कुंडाची काळी, एक पैशाला दोन्ही. ही माती कुणाकुणाला द्यावी लागेल ते बोटावर मोजून आक्का विकत घेत होत्या.

मणिबहादुराची भेट झाली. राधाकुंडात स्नान करण्यासाठी तेही आज रेवादिदीला घेऊन वृंदावनाहून आले होते. भेट होताच उभय पक्ष खूष झाले. मणिबहादूर म्हणाले, "आता भीती नाही, दोन कुंडांच्या मध्ये ज्याअर्थी भेट झाली आहे त्याअर्थी, स्वर्गात गेल्यावरदेखील नक्की भेट होईलच, "

इतक्या वेळानंतर आता कुठे मला वाटले की आपण खूप चाललो आहोत. भूकही लागली असावी. समोरच पुरीभाजीचे दुकान होते. दुकानाभोवती यात्रेकरूंनी गर्दी केली होती, कढई भरलेल्या तुपात पुऱ्या तळूनदेखील दुकानदारांना त्या पुऱ्या पडत नव्हत्या. आणखी तूप ओतीत होते. राख काढून निखारे फुलवीत होते. तिघे चौघे मिळून पुऱ्यांची चवडच्या चवड एकदम कढईत सोडीत होते.

थोड्या गरम पुऱ्या, पेढे विकत घेऊन खाल्ले आणि झाडाखालच्या टांग्यात येऊन बसले. थंड सावलीत डोळे मिटायला लागले.

काही मुलामुलींचा घोळका चारी बाजूंनी ओरडत होता –

**" ए माईया, आड काडेके, पाड काडेके,**
**आना, आना, आना ".**

समजले मी, त्या सर्वांना ' आणा ', ' आणा ' पाहिजे होता. परंतु हे तर कितीतरी जण होते. वळून पहाताच सर्वांनी हात पसरून सूर धरला –

**" श्यामकुंडा राधाकुंडा गिरिगोबरदना –**
**मादूर मावूर बांशी बाजे एई छे वृंदावना ".**

आक्का येऊन टांग्यात बसल्या. मी विचारले, " काय म्हणतात ते ? काय गाणं आहे ? "

आक्का म्हणाल्या, " अग हे तर तेच गाणे आहे. थंडीच्या दिवसांत मणिपुरी मुली आपल्याकडे भिक्षा मागायला येतात आणि गातात तेच ते –

**" श्यामकुंड, राधाकुंड गिरिगोवर्धन,**
**मधुर मधुर बंसी वाजे तेच वृंदावन ".**

संध्याकाळी दुसऱ्या एका रस्त्याने निघालो, रस्त्याच्या डाव्या बाजूला एक मैल दूरपर्यंत दगडांचे ढीग होते. या दगडाच्या रंगाचे एक वैशिष्ट्यच आहे. असा रंग कुठेही पाहण्यात आला नव्हता. पुष्कळसा पाटीच्या रंगासारखा, मनात आले एक दगड उचलून घ्यावा. आईच्या देवघरात देव्हाऱ्याजवळ छान दिसेल.

टांगेवाला म्हणाला, " असे काम करू नका आई, इथल्या गोवर्धनाचा दगड कुणाला धार्जिणा होत नाही. मागे एका गुजराथी माणसाने दगडाचा एक तुकडा नेला होता. काय सत्यानाश झाला त्याचा ! मुलगा मेला, मुलगी मेली, आई-बायको सर्व मेली, व्यापार उद्योगात नुकसान झालं, पैसा अडका सर्व गेला. सरते-शेवटी कसाबसा धावपळ करीत आला आणि दगड परत करून गेला तेव्हा कुठं त्याचे प्राण वाचले. "

व्रजरमण म्हणाले, " विजयकृष्ण गोस्वामीसुद्धा कुणाला तरी म्हणाले होते–– " अरे मूर्खा, तू करतोस तरी काय ? लवकर जा आणि हा दगड परत करून ये. "

आक्का म्हणाल्या, " राहू दे, घेऊ नकोस, मुलाबाळांनी तुझं घर भरलेलं आहे. शेवटी कशानं काय होतं कुणास ठाऊक ? "

आम्ही चाललो होतो त्या साऱ्या रस्ताभर मी पाहिले––लहानपणी भावला-भावलीच्या खेळात खापरांची जशी घरे आम्ही करीत होतो तशी वाळलेल्या गवतावर दगड रचून जणू काही अजस्र घरकुले केली होती. सर्व घरे भक्तगण परत जाताना आपल्या नावांनी रचून जातात. मनात नवस असतो " हे माझं घर तुझ्याजवळ करून ठेवलंय, मेल्यावर तुझ्या पाठीशी जागा मिळू दे."

"ही कोण ? रेवती वाटतं ?" एकदम टांगा थांबवून आक्का उतरल्या, मणिपुरी यात्रेकरूंमध्ये एकवीसबावीस वर्षांची मुलगी दिसली होती. कमरेला कमरपट्टा, अंगावर ओढणी, आक्कांनी जाऊन तिला मिठीच मारली. "तू इथं ?" त्यांनी विचारले.

"हो, प्रदक्षिणेसाठी आले होते." ओढणीचा पदर त्या मुलीने दातात धरला होता. काचेसारखे स्वच्छ दोन डोळे पाण्यांनी भरून आले. ती टक लावून आक्कांकडे पाहात राहिली. कुणीही काही बोलत नव्हते.

जणू काही दोन दगडी मूर्तीच समोरासमोर उभ्या होत्या. वेळ हळूहळू निघून गेला.

रेवतीच्या खांद्यावरचा हात काढून आक्का परत आल्या. पदराने डोळे पुसून त्या टांग्यात बसल्या. टांग्याच्या चाकांनी उडवलेल्या धुरळ्यामुळे रेवती दिसेनाशी झाली. लांब सुस्कारा टाकून आक्का म्हणाल्या, " विधवा झाल्यावर तान्ह्या मुलीला घेऊन शिलचरला आली होती ती, बिचारीचा तो. एक आधारसुद्धा पाच महिन्यांपूर्वी गेला."

आग्र्याला न जाता कोणत्या वाटेने जयपूरला जाता येते ? आग्र्यावरून जाणारा मार्गच सरळ, सोपा होता. पुष्कळ शोधाशोधीनंतर असे ठरले की मथुरेहून दोनएक तासांचा आगगाडीचा प्रवास करून, एका छोट्या स्टेशनवर गाडी बदलून मग जायचे. अर्थात त्यात चढण्याउतरण्याचा त्रास होता. शिवाय लेट झालेल्या गाडीची वाट पहाणेही आले. असू दे, त्यालाही तयार झालो.

एवढासा रस्ता, दुपारी निघून टुकूटुकू करीत रात्री साडेआठला 'अछनेरा स्टेशनवर येऊन थांबलो.

प्लॅटफॉर्मवर दिवे मिणमिण जळत होते. वेळ काढायचा कसा ? एका दिव्याच्या खांबाखाली सामानसुमान गोळा करून एकत्र ठेवले आणि चार पैशांचे चटपट चणे विकत घेऊन अंधारात एका कोपऱ्यात मी लपून बसले. दादांनी पाहिले तर ते रागावतील. रस्त्यावर, घाटावर हे असे विकत घेऊन खाणे ह्यांना मुळीसुद्धा आवडत नाही.

मान लांब करून या कोपऱ्यात, त्या कोपऱ्यात शोधीत शोधीत एकजण समोर येऊन उभा राहिला. तो म्हणाला, "बहेनजी, मथुरा स्टेशनवर तुम्हीच ना वहीच्या पानावर चित्रं काढली होती ?"

मी म्हणाले, "हो."

तो म्हणाला, "मी याला असं सांगत होतो की, बंगाली लोक जादूगार असतात," असे म्हणून त्याने बरोबरच्या मित्राला पुढे केले.

मथुरा स्टेशनवर बराच वेळ थांबावे लागले होते. ट्रेन लेट होती. घागरा घातलेल्या, ओढणी ओढलेल्या जोधपुरी मुली तिथे बसल्या होत्या; मी त्यांचे स्केच करीत होते. एक मुलगी उठून आली, तिने विचारले, "माझ्या मुलाचं, मनोहरचं एक चित्र काढून द्याल ?" मी सांगितले, "काढीन, पण वहीचं पान फाडून तुम्हांला देता येणार नाही."

तिनं थोडा वेळ विचार केला. आणि म्हणाली, "बरं, मला नाही दिलंत तरी चालेल. चित्र तर निघेल." असे बोलून कडेवरच्या मुलाला पायावर बसवून, गोष्टी बोलत ती त्याला खेळवू लागली, आणि मी चित्र काढायला लागले, माझं चित्र काढून झालं. ते पाहून ती काय खूष झाली ! पुन्हा पुन्हा मुलाकडे पाहू लागली. मातृत्वाचा अभिमान तिच्या चेहेऱ्यावर ओसंडत होता. आठ दहा वर्षांची एक मुलगीसुद्धा तिला होती, तिलाही आणून समोर बसवून ती म्हणाली "हिचं पण काढा."

गोरी गोरीपान, सुंदर मुलगी; लाजेने कां-कू करीत होती. तिचेही स्केच केले, तेवढ्यात आमच्याभोवती गर्दी जमली, आई हसत होती, मुलगी हसत होती, वडील हसत होते; जे पाहात होते ते सर्वजणही आनंदाने हसत होते. धक्काधक्की करून आणखीही बऱ्याच लेकीसुना समोर येऊन उभ्या राहिल्या, 'माझं काढा', 'आधी माझं काढा.' काकुळतीने त्या सांगत होत्या.

फस्फस् करीत गाडी स्टेशनात येऊन धडकली, वही बंद करून मी उठले.

तो पुरुष म्हणाला, " बेहनजी, ती चित्रं याला एकदा दाखवाल ? दाखवल्याशिवाय याला माझं सांगणं समजत नाही. "

अगदी सामान्य माणूस, अंगात फाटका खाकी शर्ट. परंतु मन किती साधे, सरळ नुसत्या एका " बहेनजी " या त्याच्या हाकेनेच मन द्रवले.

तोंडात चण्याची फक्की घालून पिशवीतली वही काढून त्याला दिली, उजेडाखाली जाऊन दोन्ही मित्र वहीची पाने उलटीत होते आणि एकमेकांकडे पाहात होते.

होल्डॉलला टेकून बसल्या बसल्या मला बहुतेक झोप लागली असावी. दादांच्या हाकेने मी जागी झाले, आगगाडी येण्याची घंटा झाली होती.

प्लॅटफॉर्मला मालगाडी लागलेली होती. आमची गाडी पलीकडे थांबली, फर्स्ट-क्लास सेकंड क्लासमधील प्रवाश्यांनी दरवाजा उघडून ठेवला होता. खिडकीतून डोकी काढून ते पाहात होते––आम्ही काहीजण आगगाडीच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत हमालांना घेऊन धावाधाव करीत होतो. ज्या डब्याजवळ जाऊन उभे राहावे तिथले लोक दुसरीकडे जायला सांगून म्हणत, " तिकडे पुष्कळ जागा रिकामी आहे. " तिकडे जाताच ते खिडकी बंद करून घेत व म्हणत, सहाजण आहोत डब्यात, डबा पूर्ण भरलेला आहे. दुसरीकडे व्यवस्था करा. " लोक लोंबकळत लोंबकळत चालले होते. थर्डमध्ये सुईच्या अग्रालासुद्धा जागा नव्हती, गाडी निघायची वेळ होत आली होती. धावत जाऊन स्टेशनमास्तर, तिकिट कलेक्टर, जो मिळेल त्याला गाठून सांगत होतो––इतकी मोठी गाडी, कसंही करून कुठंही आम्हांला जागा द्या. पण ते आपले निर्विकार होते. आगगाडी आणि मालगाडी यांच्या रिकाम्या पट्टीत पुन्हा एकदा धावपळ केली. अखेर आगगाडी निघून गेली, मालगाडी निघून गेली; मी पाहिले रिकाम्या रेल्वेलाईनवर आम्ही चौघे प्राणी उभे होतो.

रागाने दुःखाने मी तणतणत होते. कोट अंगात घालून उभ्या असलेल्या लोकांना उद्देशून मी बडबडत होते. मी दादांना म्हणाले, " जयपूर, उदयपूर, चितोड कुठंही जाणार नाही. आत्ताच दिल्लीला परत जाऊ या. दिल्लीहून हरिद्वारला आणि तिथून सरळ घरी. काय म्हणता आक्का ? "

आक्का म्हणाल्या, " त्रास झाला, मन खट्टू झालं. प्रवासातल्या या कटकटीत तुझ्या दादांना आणखी त्रास द्यायचा म्हणजे काय झालं. मुलांनी ऐकलं तर काय म्हणतील ? जायचं सोडून द्या झालं, माझंसुद्धा आता मन लागत नाही. "

दादा म्हणजे अगदी थंड माणूस, एवढ्यातच त्यांचा राग, दुःख सर्व मावळून गेले होते, ते म्हणाले, " आताच नक्की ठरवू नका, सबंध रात्रीचा वेळ अजून हातात आहे उद्या सकाळी विचार करून काय ते ठरवता येईल. "

" नाही, नाही, उद्या सकाळपर्यंत कसला विचार करायचा ? काही झालं तरी जायचं नाही. अगदी दगडावरची रेघ, जयपूरचं तिकिट बदलून दिल्लीचं करून टाका. "

मी त्यांना शांत बसू देईना.

दादा म्हणाले, " तिकीट घेतलं मथुरेला, हे कशाला रिफंड देतील ? तोच पुन्हा पत्रव्यवहार, नाना कटकटी; याच काही रुपयांसाठी कदाचित पुन्हा यायलाही सांगतील. "

मी म्हणाले, " नाहीतर अक्कलखाती जमा होतील. पण आता आधी दिल्लीचं तिकीट काढा, नंतर बाकीच्या गोष्टी. "

शेवटचं म्हणून आणखी एकदा दादांनी आक्कांना समजावण्याचा प्रयत्न केला ! " आज नाही झालं, उद्या जाऊ या. जयपूरनं काय घोडं मारलंय ?"

आक्कांनी डोके हालवून तसेच " नाही, नाही " म्हटले. निरुपायाने दादांना उठून जाऊन दिल्लीला परत जाण्यासाठी तिकीट आणावेच लागले.

माझा राग थोडा थंडावला. मी वेटिंगरूममध्ये गेले. जयपूरला गेले नाही, चांगली खोड मोडली ! कुणाची ते मात्र कळत नाही. शांत चित्ताने निःश्वास टाकला आणि जमिनीवर होल्डॉल पसरून अंगावर कांबळे पांघरून मी झोपले.

डोळा लागेना.

सबंध रात्रभर मनाला हुरहूर वाटत होती. वहीची पाने फाडून मनोहरच्या आईला स्केच दिले असते तर ?

इतक्या दिवसांच्या अनुभवानंतर स्त्रियांचे मन दादांना ओळखता येत होते असे वाटते. दुसऱ्या दिवशी सकाळी वेटिंगरूमच्या बाथरूममध्ये स्नान करून, थंड झाल्या-वर धोब्याकडची साडी नेसले, ब्लाऊझ घातला, काचेच्या ग्लासमधून दोन ग्लास चहा प्यायले आणि दुकानातील पुरी खाणार इतक्यात दादा म्हणाले, " मी नक्की असं काही म्हणत नाही, माझं मत तुमच्यासारखंच आहे, तरी एका गोष्टीचा जरा

विचार करून पाहा–इतकं दूर येऊन परत जाणं बरं होईल का ? खरा गोपीनाथ, गोविंद पाहायचा म्हणून इतका अट्टहास केला ! जायलाच पाहिजे असं म्हणत नाही मी, तरी जरा विचार करून पाहा. दिल्लीचं तिकीट तर काय काढलेलंच आहे. "

भाजीतला बटाटा पुरीवर दाबता दाबता मी आक्कांकडे पाहिले, त्याही माझ्याकडेच पाहात होत्या.

मी दोन डोळ्यांनी आक्कांना खुणावले–"काय आक्का, काय म्हणता ?"

आक्कांनी नजर खाली केली आणि एक एक पेढा सर्वांच्या हातात दिला.

मी म्हणाले, "तर मग जयपूर पाहून जाऊ या. वाटेत खूप त्रास होणार हे समजूनच बाहेर पडलो ना ? एवढ्याशा गोष्टीनं विचलित होऊन कसं चालेल ? परत जाऊन कोणत्या तोंडानं सांगणार ?"

आक्का म्हणाल्या, "तेही बरोबर आहे आणि हेही बरोबर आहे. गोपीनाथनं इतक्या दूरपर्यंत आपल्याला खेचून आणलं ते काय असं मधूनच पाठवण्यासाठी ? मला वाटतं ही त्याची इच्छा नाही. "

"तर मग आत्ताच तिकीट काढा. आता जी आगगाडी येईल तिनंच जयपूरला जाऊ या. "

दादा म्हणाले, "दिल्लीच्या तिकिटाचं काय होणार ?"

"आणखी एकदा अक्कलखाती जमा." असे म्हणून घाईनं हात, तोंड पुसून टोपली, ट्रंक बंद करून तयार झाले.

आगगाडीत बसल्यावर आम्हा दोघींना हसू फुटले– हु–हु–हु–हु–हि–हि–हि–हि हा–हा हा, हा. आक्कांना आणि मला लोळायची पाळी आली. बिचारे दादा ! त्यांच्या तोंडाकडे जितके पाहात होते तितके जास्तच मला हसू येत होते. काल आम्हांला इतका राग का व कुणावर आला होता ते विचार करूनही उमगत नव्हते. आगगाडीत चढता आले नाही त्यात दोष कुणाचा ? छोट्या स्टेशनवरचा मार्ग हौसेने कुणी ठरवला होता ? निष्कारण दादांवर आग पाखडली ! हसतमुखाने त्यांनी सगळे सहन केले, या वयात पुन्हा पुन्हा तिकिटे काढायला धावले, तिकिटे काढली, बदलली, या इतक्या रात्री सारे केले.

दादा म्हणाले, "काय करणार ? तेव्हा तुमची जी अवस्था झाली होती त्या वेळी 'नाही' म्हणालो असतो तर तुम्ही मला फाडून खाल्लं असतं. दुसऱ्या दिवशीच सगळा राग शांत होणार हे नेहमीचं माहीत आहेच ना ! इतक्या दिवसांपासून इतकं सर्व पाहात आलो. कशानं काय होतं हेसुद्धा समजत नाही का ?"

डब्यामध्ये दुसऱ्या काही पंजाबी महिला होत्या. त्यांपैकी दोघी जयपूरला उतरणार होत्या. एक जरा वयस्क होती आणि एकजण चारएक वर्षांच्या मुलाची आई, सासरी निघाली होती. सलज्ज असा एक भाव तिच्या चेहेऱ्यावर होता. समोरासमोर बसून आईच्या आणि मुलाच्या गोष्टी चालल्या होत्या— वडील त्यांना न्यायला येणार का ? का काकांना स्टेशनवर पाठवणार ? त्यांना कदाचित ऑफिसचे काम असेल.

सर्वांच्या बरोबर ओळख झाली. गप्पागोष्टीत वेळ जात होता. जयपूरला येऊन गाडी थांबली. ती वयस्क महिला दोन स्टेशने अगोदरपासूनच प्रसाधनाला लागली होती. नीटनेटकेपणाने तिने केस बांधले, तांब्याभर पाणी घेऊन, खिडकीतून तोंड बाहेर काढून तोंड धुतले, हात स्वच्छ केले, पाय उचलून त्यावर पाणी ओतले, बाथ-रूममध्ये जाऊन पांढरा रेशमी सलवार खमीस घालून ती बाहेर आली. नंतर आरसा बाहेर काढून तोंडाला पावडर फासली. इथे आगगाडी बराच वेळ थांबते म्हणूनच ती निश्चिंत होतीसे वाटते.

आगगाडीतून उतरून सर्व सामान एकत्र करून आम्ही एका बाजूला उभे राहिलो. कित्येक पंडचे येऊन भिडले होते. नवीन जागा, ओळखीच्या लोकांना मुद्दामच अगो-दर कळवलं नव्हतं. कोणत्या वाटेनं जायचं आणि कुठं राहायचं ? दादा म्हणाले, " एका पंड्याला बरोबर घेतलेलं बरं, काय म्हणता ?"

पण कुणाला घ्यायचे ? आमची पंड्याची निवड चालली होती. समोरून ती वयस्क शौकीन महिला नटून थटून, नमस्कार करून निघून गेली. वा: छान दिसत होती की ! आता तर जास्तच सुंदर वाटली.

बारीक, उंच पंड्यालाच पसंत करून आम्ही टांग्यात जाऊन बसलो. उन्हाची झळ डोळ्यांना लागत होती. काळा चष्मा शोधण्यासाठी खांद्यावरच्या पिशवीत हात घातला तर पिशवी रिकामी ! नेहमीची सवय. चालताना, फिरताना काळा चष्मा पिशवीतून बरोबरच ठेवलेला असायचा. फार दिवसांचा सोबती. तोच चष्मा नव्हता. पेन नव्हते, एक ढीगभर फ्रेंच क्रेयोन पेन्सिल्स त्याही नव्हत्या. मोठ्या कष्टाने त्या परदेशातून गोळा केल्या होत्या, काय झाल्या सर्व ? आगगाडीत चढल्यावरसुद्धा मी ज्या उलाढाल्या केल्या तेव्हा तिथेच पडल्या की काय ? आगगाडी अजून प्लॅटफॉर्म-वरच उभी होती. घाईने धावत गेले आणि डब्यात शिरले. खिडकीजवळची गादी सरकवून पाहिली, बाकाखाली वाकून पाहिले, बाकावर हात फिरवून पाहिले. नाही. कुठेही नाही. आणखी एक प्रौढ सोबतीण डब्यात होती. कोपऱ्यात बसली होती. ती आणखी दूर जाणार होती. ती म्हणाली, " ते सर्व तुमचं होतं का ? मी पाहिलं,

तुम्ही जेव्हा उतरलात, तेव्हा त्या लठ्ठ बाईनं ते सर्व हातातल्या बॅगेमध्ये घातलं."

तीच ती वयस्क सुंदर महिला !

मन फार कष्टी झाले. डोळे, तोंड बंद करून परत आले.

कोच बॉक्समधून पंड्या विचारीत होता, "बाबू, धर्मशाळेत जाणार का हॉटेलात उतरणार ? माझ्या माहितीचं चांगलं हॉटेल आहे."

रात्र होत आली होती. आता कुठंतरी जाऊन एकदा उतरलो म्हणजे झालं. दादा म्हणाले, "तुझ्या माहितीच्या हॉटेलातच चल."

रस्त्याच्या बाजूला एका बड्या देशी हॉटेलसमोर टांगा थांबला. बाहेरूनच इमारतीचे रूप पाहून मी खूष झाले. जिना चढून दुसऱ्या मजल्यावर गेलो. मध्ये मोठे अंगण आणि चारी बाजूंना व्हरांडा होता. प्रत्येक व्हरांड्याला लागून चार खोल्या होत्या. पलंग, कार्पेट, पडदे, सोफा वगैरे सर्व सामानासुमानांनी खोली व्यवस्थित आणि सुसज्ज होती.

मारवाडी प्रवाश्यांनी ते हॉटेल गजबजलेले होते. फक्त तीन खोल्या रिकाम्या होत्या. तीनपैकी ज्याच्यात शिरावे तेथून बाथरूमची दुर्गंधी येत होती. नाकाला पदर लावून व्हरांड्यात फिरत राहिले—सगळीकडे तीच घाण. तिथून ताबडतोब बाहेर आले, अशा जागी दिवसरात्र रहाणे कठीणच होते.

पंड्या म्हणाला, "तर मग दुसरी एक धर्मशाळा आहे अगदी नवीन तयार होत आहे."

मी म्हटले, "बरंय, चल तिकडे."

मोठा रस्ता सोडून गल्ल्याबोळांतून टांगा चालला होता, पण धर्मशाळा काही दिसत नव्हती.

पंड्या मागेपुढे करायला लागला—"इथंच कुठंतरी असणार; माझ्या मेव्हण्याची भाचरं त्या दिवशी म्हणत होती."

शोधता शोधता अंधार झाला. विटांनी बांधलेल्या एका धर्मशाळेत शेवटी एकदाचे त्याने आणून सोडले. खालच्या मजल्यावरचे बांधकाम सर्व झाले होते. त्यातल्याच एका खोलीत आजच एका कुटुंबातील प्रवासी उतरले होते. लोखंडी शेगडीवर भाजी-पोळी करून गृहिणी नवऱ्याला व दिराला समोर बसवून वाढीत होती. बुंदी ठेवलेली कल्हईची थाळी खाली ठेवताना, आम्हांला पाहून तिने एका हाताने घुंघट खाली ओढला.

कबुतरांच्या खुराड्यासारख्या या सगळ्या खोल्या होत्या. ना खिडक्या ना काही. फक्त एक दरवाजा आत बाहेर करण्यासाठी होता. त्या पाहाताच आक्का तरातरा रस्त्यावर निघून गेल्या. त्या म्हणाल्या, "अशा पंड्याच्या तावडीत सापडलो आहोत, तो असाच रात्रभर फिरवील. मी म्हणते जयपूर शहरात काय आणखी हॉटेल्स् नाहीत ? चला एखाद्या हॉटेलमध्ये," असे म्हणून त्यांनी पंड्याला चांगले धमकावले.

धमकावणी मिळाल्यावर पंड्या सरळ आला. पिचक्या आवाजात तो ओरडत होता, "सीधा चलो, 'उजवीकडे वळ' 'डावीकडे आत ने." आणि टांगेवाल्याच्या मागे तगादा लावला होता.

ज्या रस्त्याने आलो होतो त्याच रस्त्याने मागे जाऊन शहरात आणखी एका हॉटेलासमोर येऊन थांबलो.

"मी इथला राहाणारा माणूस, माझ्या माहितीचं याच्याशिवाय दुसरं चांगलं हॉटेल नाही," असे म्हणून निस्पृहपणे पंड्या उभा राहिला.

चांगले असू दे नाहीतर वाईट असू दे, इथेच रात्र काढायची असे ठरवूनच आम्ही खाली उतरलो.

अगदी निराळे, विचित्र हॉटेल होते. रस्त्यावरून सरळ दुसऱ्या मजल्यापर्यंत गेलेला अरुंद, अंधारी जिना. तेलानं चबचबलेली दोन्ही बाजूंची भिंत अंगाला लागत होती. एकजण चढायचा मग दुसरा उतरायचा. विरुद्ध दिशांनी दोघांची मध्येच गाठ पडली तर एकाला मागे फिरून उतरून यावे लागायचे. वरचा माणूस ओरडत असायचा, "कुणी चढू नका. मी खाली उतरतोय." आमच्या जुन्या घराची मला आठवण झाली. लांबलचक झोपण्याच्या खोलीच्या एका बाजूला लागून न्हाणीघर होते. 'हाफ डोअर'ने वेगळे केलेले होते. सुट्टी लागल्यावर नातेवाइकांची गर्दी झाली म्हणजे एक नियम केलेला असायचा—जो न्हाणीघरात आंघोळीला जाईल त्याने गाणी गात राहायचे. नाहीतर दुसरा कुणी चुकून आत शिरायचा. भाचा म्हणाला होता, "मला गाता येत नाही. मी काय करणार ?" आणि धावत जाऊन त्याने मुलाच्या हातातला माऊथ ऑर्गन आणला.

हॉटेलच्या दुसऱ्या मजल्यावर अरुंद कॉरिडॉर होता. दोन बाजूंना त्याच मापाच्या दोन लहान खोल्या होत्या. जिन्याच्या बाजूला एकमेव नळ होता. भिंतीला भोक पाडून रबराच्या नळीतून न्हाणीघरात पाणी सोडले होते. तिथे बादली भरली म्हणजे ती टयूब जाते तिसऱ्या मजल्यावर, स्वयंपाकघरातील भांडीकुंडी पाण्याने भरून नंतर गच्चीवर धुण्याभांड्यांसाठी ठेवलेल्या पाण्याच्या पिंपात टयूब सोडतात. तेव-

ढग्यात खालचे लोक ओरडतात, " नळ सोडा, दात घासून उभा आहे, तोंड धुवायचं आहे. " स्नानाच्या खोलीतून दरवाजा उघडून एखादा डोकावतो, त्याला दोन तांब्ये पाणी आणखी हवे असते. स्वयंपाकी आरडाओरड करतो, "अशी नोकरी सोडून देईन. डाळ धुता धुताच पाणी संपून जातं. शिजत लावायची कशी ? आणि जेवण वेळेवर देता आलं नाही तर उलट तिरळा मॅनेजर स्वतःच शिवीगाळ करील. " दर क्षणाला आरडाओरड, गोंधळ, ज्याला जमेल तो साधून आपापल्या हिमतीने पाणी घेतो.

'ते असू दे,' 'ते असू दे' 'हेच चांगलं' असे म्हणत जमिनीवर अंथरलेल्या फाटक्या सतरंजीवर स्वतःचा बिछाना पसरून अंग टाकले. उपासमारीने गांजलेल्या ढेकणांनी रात्रभरांत जमेल तितके बंगाली रक्त शोषून घेतले.

जयपूर शहर सुंदर असे लोक म्हणतात. लाल दगडाचे प्रासाद रस्त्याच्या दोन्ही कडांनी आहेत. माप घेऊन चौकोन काढलेले आहेत. सर्व कसे स्वच्छ आहे. एकंदरित सुंदरच वाटते की !

पण मला जर कुणी इथे राहायला सांगितले असते तर शहराच्या बाहेर जिथे सकाळचे सोनेरी ऊन डोंगरावरून जाते, त्याच्याच खाली आनंदाने घर बांधले असते. जिकडे पाहावे तिकडे मनरूपी बालक जणू काही मोकळ्या अंगणात धावत होते. कधीतरी गव्हाच्या शेताच्या आडोशाला लपत होते तर कधी झाडाच्या बुंध्याला टेकून पाय पसरून बसत होते, कधी दोन डोंगरांमधल्या हिरवळीच्या पदरात तोंड खुपसून झोपत होते. हा सलोखा शहरी वातावरणात कुठे शोधून मिळणार ?

टांग्यात स्वार होऊन फिरत फिरत मानसिंहाच्या किल्ल्याजवळ येऊन पोचलो. सबंध राज्यातील दोन्ही बाजूंच्या डोंगरांच्या ओळी इथे येऊन मधली चालण्याची वाट सोडून मध्यभागी येऊन मिळाल्या आहेत. जणू काही आकाशाने झाकलेली एक प्रचंड देवडीच ! त्याच्याच फटीतून दूरचे विस्तीर्ण नगर हिरव्यागार दिगंतराच्या कडेखांद्यांवर दिसत होते.

पर्वतावरील त्या किल्ल्यावर बसून मानसिंह ही अपूर्व शोभा पाहात असत. दूर आकाशात उधळलेल्या धुळीच्या ढगातून येणाऱ्या शत्रूंना ते इथूनच पाहात.

बागबगीचा, तलाव, फवारे यांनी तो किल्ला घेरलेला होता. दगडी बांधलेला

रस्ता वळून वर पर्वतावरील प्रासादप्रांगणापर्यंत गेला होता. याच रस्त्याने हत्ती-वरून मानसिंह वरखाली जा ये करीत असे. राजा प्रतापादित्याचा पराभव करून यशोरच्या हातातून यशोरेश्वरीला हिसकावून घेऊन त्याने याच वाटेने किल्ल्याच्या अंतःपुरात आणले होते. आणि यशोरच्या रूपवान, तरुण राजकुमारीलासुद्धा आणले होते.

पंड्याने सांगितले, पूर्वी इथे देवीसमोर नरबली देत असत. नरबली देण्याचे बंद झाल्यावर देवीला राग आला. तेव्हापासून रागाने देवीची मान वाकडी झालेली आहे.

पांढऱ्या दगडाचा जिना, पांढऱ्या दगडाचे खांब, पांढऱ्या दगडाच्या गल्ल्या, भिंती सर्व पार करून पांढऱ्या दगडी अंगणात येऊन उभा राहिलो. चोहोबाजू पांढऱ्या रंगाने धबधबित वाटत होत्या. जणू काही जुईमोगऱ्यांनी केलेला महालच! त्याच्या मध्यभागी लाल रेशमी वस्त्र नेसलेली माता यशोरेश्वरी बसली होती. जणू काळ्या रंगाची नवविवाहित नवरीच! सलज्ज ग्रीवा! काळ्या टोकदार नाकावर हिऱ्याची चमकी चमचम करीत होती. फारच सुंदर मूर्ती आहे! आणि यालाच पंड्या म्हणतो ना की देवीने रागाने मान वाकडी केली म्हणून. हा काय रागाचा अभिनय?

लाल पीतांबर नेसलेले दोन पुजारी भाऊ समोर येऊन उभे राहिले. देवीच्या पूजेसाठी मानसिंहाने बंगाली पुजारी कुटुंबही बरोबर आणले होते.

ते दोघे पुजारी भाऊ देखणे वाटले; बंगाली प्रवासी पाहून खुशीने हसून त्यांनी पंड्याजवळ माहिती विचारली. आता यांना बंगाली भाषा बोलता येत नव्हती. वंशानुक्रमाने या प्रांताच्या मुलींशी विवाह केल्यामुळे ते आमूलाग्र बदलून गेले आहेत. तरी, हल्ली दोन मुलांना कलकत्त्याला शिकायला पाठवले आहे. एका मुलाची बायको बिहारची केली. बंगालमध्ये पुन्हा क्रियाकर्म करायला त्यांनी सुरुवात केली आहे.

या राजापूर्वी जो राजा होता, तो गोविंदाचा उपासक होता. शक्तीची अवहेलना झाली होती. वर्तमान राजा शक्तीचा उपासक होता. तो राजा झाल्यावरच त्याने मंदिराचे पुनरुज्जीवन केले व जयपुरी दगडावर नक्षीकाम करून मंदिराला शोभा आणली. हिरव्या दगडाच्या टवटवित केळी, दोन बाजूंना बसवलेल्या होत्या. प्रवेश-द्वाराच्या पितळी दारावर प्रार्थना कोरली होती –

**' शिलादेवि हो दृढ अचल, शंकर अचल समान।**
**ध्यान मान ' श्रीमान ' का रे मन दो दल जान।**

**यह ' किशोर ' बिनती सुनो, हे जगजननी आप ।**
**जयपूर पति का तपन सम, हो तप तेज प्रताप. ॥**

धुडुम, धुडुम आवाजात बलीची घंटा वाजली. मंदिरातून आम्ही बाहेर पडलो.

आता मानसिंहाचा प्रासाद हिंडून फिरून पाहात होतो. मानसिंहाला बारा राण्या होत्या. खाली एका मजल्यावर एका अंगणाभोवती राण्यांचे बारा महाल होते. उंच बांधलेल्या भितींच्या आत अति सुरक्षित असे. एकेका राणीच्या दोन दोन खोल्या. स्वयंपाक घर आणि समोर उघडा व्हरांडा. एकामागून एकसारखे भाग पाडलेले. जणू राण्यांच्या बंदिशाळाच त्या. प्रत्येक महालाला वर जायला आणि वरून खाली यायला एक जिना होता. अगदी सामान्य अशा भिंती होत्या. अंगणाच्या मध्यभागी गच्ची बांधलेली होती. ही गच्ची म्हणजे त्या अकरा राण्यांची कॉमन रूमच; सारख्याच सुखदु:खात त्या दिवस काढीत, एकाच आशेने त्या इथे बसून राहात.

बारा राण्यांपैकी पाळीने एकेक राणी वर्षातून एकदा राजाबरोबर वर रहायची, त्या एका महिन्यासाठी राणीचे जे स्नानगृह होते ते पाहायला आत गेलो. राजाची अंकविलासिनी गुलाब पाण्याच्या फवाऱ्यात डुंबून स्नान करायची. समोरच्या व्हरांड्यात बसून ती केस वाळवायची. काचघरात लोळत पडून वर्षाऋतूची शोभा पाहायची. दरबार संपवून अंत:पुरात येताना दाराजवळ शृंगार मंदिरातून राजाच्या शिरावर फुले टाकायची. भुयारातून जेवणाच्या खोलीत जायची. निरनिराळ्या तीर्थस्थानांची भिंतींवर काढलेली, चित्रे पाहून सर्व तीर्थस्थानांच्या दर्शनाचा लाभ मिळवून दोघे राजाराणी शेजारीशेजारी जेवायला बसायचे. त्यानंतर शीशमहालात एक राणी लक्ष राणी होऊन राजाच्या मांडीवर विश्राम करायची.

एका महिन्याच्या पट्टराणीच्या विलासाच्या दु:खाने मन सहानुभूतीने भरून आले.

आक्का आणि मी रोज एकाच तऱ्हेच्या साड्या नेसतो, लाल काठाच्या टसरच्या रेशमी साड्या. सर्वांना वाटते आम्ही दोघी मायलेकी, नाहीतर बहिणी-बहिणी. नणंदभावजया असे कुणीच म्हणत नव्हते.

एकमेकींचा हात धरून बाहेर येत होतो – तोच आक्का खो खो करून हसायला लागल्या. मी थांबले आणि मान फिरवून पाहिले – मानसिंहाच्या बारा राण्यांच्या

प्रभावान चलबिचल झालेल्या पंड्याने दादांना पकडून ठेवले होते. तो म्हणत होता, " एवढयानं होणार नाही बाबू. आपल्या दोन राण्यांच्या नावांनी डबल दक्षिणा द्यायला हवी. "

शहरामध्ये राजगृहात गोविंदजीचे देवालय होते. गोपीनाथसुद्धा शहरामध्येच होते, परंतु वेगळ्या जागेत होते आणि मदनमोहन करोलीला होते.

विवाहानंतर राजकन्या पतिगृही जाणार होती. तिने हट्ट धरला होता, मदन-मोहनसुद्धा बरोबर हवा म्हणून !

राजा म्हणाला, "मदनमोहन मला पण हवा. तू गोविंदाला तरी ने किंवा गोपी-नाथाला घेऊन जा. "

राजकन्येचे मन मात्र या मदनमोहनवरच होते.

राजा म्हणाला, " तर मग डोळे बांधून हातानं ज्याला स्पर्श करशील तोच तुला मिळेल. "

आंधळी कोशिंबीर खेळाप्रमाणे गोविंद, गोपीनाथ व मदनमोहन यांच्या जागांची अदलाबदल केली. राजकन्या हात लांब करून चाचपडत आली आणि तिने धरला मदनमोहनचा हात. तोच हात हातात घेऊन ती पितृगृहातून श्वशुरगृही निघाली. तेव्हापासून केरोलीलाच जावयाच्या घरी त्यांच्या ताब्यात मदनमोहन आहेत. त्यांना पाहाता आले नाही. परंतु गोविंदाचे मुखमंडल पाहिले, गोपीनाथचे वक्षस्थळ पाहिले. अर्ध्या माणसाच्या उंची इतक्या काळ्या दगडाच्या दोन सुडौल मूर्ती होत्या त्या !

राजभोग, राजसुखात आहेत त्या. सुगंधी पुष्पचंदनांनी सजतात, अत्तर गुलाब पाण्याच्या फवाऱ्यांनी स्नान करतात, नाना वस्त्रालंकारांनी रोज नवनवीन रूप धारण करतात.

दाराजवळ वाकून डोके टेकून नमस्कार केला. पाहीन पाहीन अशी इच्छा होती. पाहून समाधान झाले.

आक्का म्हणाल्या, " गोविंदाची संध्यारती होणार आहे ती बघूनच जाऊ. "

दाराच्या बाजूला टेकून आक्का बसल्या. मीही त्यांच्या मागे बसले. आरती पाहायला कितीतरी स्त्री-पुरुष तिथे जमले. समोर दोघेजण मणिपुरी ढोल वाजवून कीर्तन गाऊ लागले. गाण्याच्या सुराबरोबर सर्व शरीर हलवून नृत्य केल्यासारखे ते हातपाय उचलीत होते – जणू काही हवेतच पावले टाकून ते चालत होते.

दोन मारवाडी स्त्रिया केव्हापासून दोन्ही हातांनी मंदिराच्या पांढऱ्या दगडाचा उंबरठाच चेपीत होत्या. जणू काही गोविंदाची पदसेवा केल्याची धन्यता त्यांना वाटत होती.

कोपऱ्यामध्ये हजार लाकडी मण्यांची मोठ्ठी जपमाळ जमिनीवर पसरवून एक वृद्ध जप करीत होता.

शहरातील अग्रगण्य समजल्या जाणाऱ्या काही व्यक्ती जरीच्या शाली पांघरून हात जोडून उभ्या होत्या. आरतीच्या शेवटी आशीर्वादाची तुळस व चंदन घेऊन ते निघून गेले.

पुरोहिताने सर्वांच्या अंगांवर शांतिजल शिपडले. प्रत्येकाच्या हातात त्याने प्रसाद दिला.

नंतर दोन्हीकडचे भारी पडदे ओढून त्यांनी गोविंदजीला दृष्टिआड केले.

आम्ही उठलो.

मंदिरातून बाहेर येऊन अर्धवट उजेड, अर्धवट अंधार अशा दाट कडुनिंबाच्या झाडांखालून जात होतो. भावनावश आक्कांनी पुढे येऊन दोन्ही मुठींत धरलेला रेशमी पदर माझ्या डोक्याला लावला आणि त्या म्हणाल्या, '' हे काय मिळालं मला ! हेसुद्धा शक्य आहे का ? '' असे म्हणून पदर धरलेल्या मुठी त्यांनी छातीशी घट्ट धरल्या.

त्यांना काय मिळाले ते मला माहीत होते. पडदा ओढताना पुजाऱ्याच्या मनात काय आले कोण जाणे ? गोविंदाच्या गळ्यात एक जुईचा गोंडा डुलत होता. तो तोडून त्याने एकदम झपदिशी, डोळे मिटून बसलेल्या आक्कांच्या पदरात फेकला. आणि प्रसाद म्हणून त्याच्याच बरोबर अत्तराचा एक फाया पण फेकला होता.

दिल्लीहून पुन्हा हरिद्वारला परत आलो. या वेळी आता कोणताही वाद नव्हता. पंचांग वगैरे पाहून पूर्णकुंभ स्नानाचा दिवस, क्षण, योग सर्व अचूक पाहून ठेवलेले होते.

या इतक्या दिवसांत हरिद्वार. कोणखलचे सबंध रूपच बदलून गेले होते. चारी बाजूंना झगझगाट, आरडाओरड, प्रवासी साधू लोकांची धक्काधक्की, आनंद-उत्साहाच्या लाटा उठत होत्या. जणू काही लग्नघरची, मुख्य उत्सवाच्या आधीची गडबडीची रात्र होती.

झाडाझाडांवर कोवळी पालवी दिसत होती. आंब्याच्या पानांमधून नवीन मोहोर दिसत होता. रस्त्यांच्या बाजूंची पानांनी भरलेली झुडपे लाल फुलांनी झाकली गेली होती.

दुसऱ्या दिवशी पहाट झाली नाही तोच हरिद्वारला निघून आलो.

**" पद्मिनीनायके मेषे कुम्भराशिगते गुरौ,**
**गंगाद्वारे भवेद् योगः कुम्भनाम तदोत्तमः "**

आज तोच पुण्यस्नानाचा कुम्भयोग. सूर्य मेषराशीमध्ये व बृहस्पती कुम्भराशी-मध्ये प्रवेश करतात.

अगोदर जाऊन गंगास्नान करून ' हरकी पौडी 'वर बसलो. मनात इच्छा होती— त्या दिवसासारखे—शिवरात्रीसारखे, समोर बसून साधूंचे स्नान पाहावे. त्या दिवशी-सुद्धा इथे बसूनच पाहिले होते. परंतु आता जायला किती त्रास झाला होता. आज युक्ती योजून अगोदरच येऊन बसलो. आता आम्ही कुणाला सापडणार ? आम्ही चांगली वजनदार माणसे होतो. मणिबहादुर आता परत आले होते. बहुतेक रेवा-दीच्या दमदाटीमुळे असेल; मावशीमुद्धा बरोबर होत्याच आणि रेवादीचे दोन

बहीणभाऊही बरोबर आहेतच. सेवाश्रमाच्या यात्रेकरूंच्या दोन पथकांनींही आमची सोबत घेतली होती. सगळे मिळून गर्दी करून बसलो होतो. आता आम्हांला कसली काळजी ? चारसहा तास आणखी घालवायला आणखी काय लागते ? त्यानंतर तर साधूंचे स्नान सुरूही होईल. क्षणाक्षणाला डोळ्यांसमोर दृश्य बदलत जाईल, तन्मयतेने संध्याकाळ होईतो पहात बसू. परंतु कशी भूक लागल्यासारखी वाटते आहे. थोडे काही खाण्याचे, निदान काही फळे बरोबर घेतली असती तर बरे झाले असते !

दोन पंजाबी स्त्रिया शेजारीच बसून पुरीभाजी खात होत्या.

आक्का म्हणाल्या, "पाहू नकोस तिकडं. असं पाहून पाहूनच भूक लागायला लागते."

मी उठून उभी राहिले आणि म्हणाले, "तर मग माझी जागा राखून ठेवा, मी जरा फिरून येते."

घाटावर तिळमात्र जागा नव्हती. आजच्या या दिवशी इथे स्नान करावे म्हणून किती लोकांची मनापासून इच्छा असते, काय परम श्रद्धा असते ! पाण्यात उतरून एक बुडी मारल्याने का असे पुण्य मिळते ? हंसदेव म्हणाले होते, "विश्वास असला म्हणजे सर्व काही होतं." राव, रंक आज सर्वजण एकमेकांबरोबर एका घाटावर उतरतात, पंड्याच्या एकाच फाटक्या चटईवर बसतात, एकाच टोपलीत ठेवलेले आपापले वाळलेले कपडे झटकून घेऊन स्नानानंतर अंगात घालतात.

घडा-घडा दूध आणून लोक गंगेला अर्पण करीत होते. वृद्ध आईला पाठीवर घेऊन शक्तिवान मुलगा तर्पण करवतो, स्नानानंतर ओंजळ भरून पाणी आणून आई आपल्या तीन महिन्यांच्या कोवळ्या मुलाच्या डोक्याला लावते. आजच्या शुभ मुहूर्तावर सर्वांचे शुभ होवो. शुभ कामनांनी मन भरून आले, मनात प्रिय जनांची स्मृती जागृत झाली. एक प्रिय चेहरा डोळ्यांसमोर तरंगू लागला.

स्वतःच्या जागेवर परत आले.

आक्का म्हणाल्या, "तू पाहिलं नाहीस का, उभयता पतिपत्नींनी समोरासमोर छातीपर्यंत पाण्यात उभं राहून बरोबरच ओंजळीनं पाणी अर्पण केलं. पाणी अर्पण करून झाल्यावर आलिंगनबद्ध होऊन दोघांनी एकमेकांजवळ आंतरीची कृतज्ञता व्यक्त केली व नंतर ते दोघे काठावर चढून आले. त्यांच्या तोंडांवर किती उदात्त हसू होते किती गोड !"

" हटो, हटो ", " उठो, उठो " या आवाजांनी चारी बाजूंनी घाई सुरू झाली. गर्दी मोडून सर्वजण एकमेकांच्या अंगांवर धडपडत पडू लागले. कुणालाही तिथे बसू देईनात. कोण सांगत होते उठायला ? पण उठायचे तरी का ? मागच्या वेळी तर सर्व इथेच बसलो होतो.

मागची वेळ आणि आजची वेळ यांत पुष्कळ फरक होता. या घाटावर, त्या घाटावर एकासुद्धा प्राण्याला थांबायला मिळणार नव्हते. साधूंची यायची वेळ झाली होती. घाटावर जागा मोकळी करायला हवी होती. पोलीस, सार्जंट यांची गडबड सुरू झाली.

परंतु जाणार कुठे ?

एका दिशेने गर्दी ढकलत चालली होती. त्याच धक्क्याने चालता चालता येऊन पाहिले तर पूल ओलांडून गंगेच्या दुसऱ्या तीरावर आलो होतो. आलो म्हणजे आलोच होतो. पुन्हा परत फिरायची काही सोय नव्हती. तिकडे जायचा रस्ताच बंद झाला होता.

निरुपाय होऊन आम्ही त्या बाजूला नुसते पाहात राहिलो. हे असे आधीच माहीत असते तर अगदी ' हरकी पौडी 'वर न का होईना, निदान जवळपासची एखादी दुसरी जागा तरी निवडली असती.

गंगेच्या या पारावर सगळीकडे मस्तपैकी जत्रा भरली होती. बाजार, दुकाने, सर्कस, मोफत चिकित्सालय, सेवा-विभाग, प्रदर्शन, पोलिस स्टेशन, लाऊडस्पीकरवर गांधीजींची भाषणे, कितीतरी गोष्टी होत्या. कोणखलला गंगा पार करून साधूंची मिरवणूक याच रस्त्याने ब्रह्मकुंडाकडे जाणार होती.

लक्षावधी लोकांचा कोलाहल, वाद्यांच्या व शिंग फुंकल्याच्या आवाजाने दाबला जात होता. दोन मैल लांब रस्त्याने साधू येऊन पोचले होते. ठासून भरलेली ती मिरवणूक. जणू काही रणयात्राच. हत्ती, घोडे, उंट, मोटर, अंबारीवरील पताका, माळा, छत्र, चामरे असलेले सिंहासन– ही सारीच एक प्रचंड गोष्ट होती; एक कल्पनातीत दृश्य होते. इतक्या संन्याश्यांचा एकत्र समावेश– हे सर्व या हरिद्वारमध्ये पसरलेले असे होते तरी कुठे ?

नागा— नुसते नागाच किती तरी होते, संपतच नव्हते. काळ्या काळ्या अंगावर पिवळ्या झेंडूच्या माळा, पाठीवर जटा सोडलेल्या ,एकामागे एक चालले होते. काय छान वाटत होते पाहायला. भगवी वस्त्रे परिधान केलेले संन्यासी, स्त्रीसंन्यासी, महन्त, मंडलेश्वर, देवतांच्या मूर्ती– मिरवणुकीची शोभा किती अपूर्व होती. मिरवणूक

चालली होती, चाललीच होती, संपतच नव्हती. कोरड्या वाळूच्या चरावर उभे राहून आम्ही लाखो नरनारी त्यांना अधीरतेने, उत्सुकतेने पाहात होतो.

माझ्या एकदम लक्षात आले– आम्ही जिथे उभे होतो ती निळा प्रवाह सुकून तयार झालेल्या नाल्याची जागा होती. लाकडी फळ्या साखळ्यांनी बांधून गंगेचे मुख इथे बंद करून टाकले होते. मी टक लावून पाहात होते आणि माझ्या मनात विचार आला, काही तरी अचानक घडून यातली एखादी लाकडाची फळी मोडली तर काय प्रसंग ओढवेल ? मी काय करीन ? हा जो समोर लाकडाचा ढिगारा पडला आहे, त्यावर मी धावत जाऊन चढेन; पण लाकूड तर आधीच तरंगत वाहून जाईल. मग ? मग या दगडावर ? उंहू, तेसुद्धा पाण्यात बुडतील. तर मग सर्वांच्या पुढं धावत जाईन, तिथं दूर, वाळू संपून हिरव्या गवताची रेषा दिसू लागते तिथं– मी स्वतःशीच खदखदून हसायला लागले. हाय– समजा, फळी निघालीच, तर पाण्याचा लोंढा क्षणार्धात सर्वांना वाहून घेऊन जाईल. वेळ मिळेलच कुठे ?

आक्का म्हणाल्या, "ती पाहा, ती पाहा. कुणाची तरी मोटर वाळूत अडकली वाटतं. कोण उतरलं बरं गाडीतून ? महानंदजीच ना ? अरे, एवढा म्हातारा माणूस कसा चालेल एवढी वाट !"

हा पूल, तो पूल करीत गंगेवरच्या कितीतरी पुलांच्या जवळ जाऊन धक्काधक्की करीत संध्याकाळपर्यंत या पारावर परत आलो.

तेव्हासुद्धा समोर साधूंचे स्नान चाललेच होते. एक पथक जायचे आणि दुसरे यायचे. पोलीस घामाघूम झाले होते. स्नान झाल्यावर साधूची पथके गंगेवर बांधलेल्या चबुतऱ्यांवरून परत जात होती. मध्ये लांबट अशी थोडी वाट सोडून यात्रेकरू साधुदर्शनाच्या इच्छेने गर्दी करून सकाळपासून बसले होते.

जरा ढकलाढकली करून एक जागा पकडून मी बाजूला उभी राहिले. कित्येक गुजराथी प्रौढ स्त्रिया, बहुतेक सकाळपासून बसल्या होत्या. काळवंडून त्या अगदी थकलेल्या दिसत होत्या. मोठ्या मोठ्या डोळ्यांची, दात पुढे आलेली महिला समोर वाकून डुलक्या घेत होती. साधूंचे पथक आल्याबरोबर तिच्या शेजारच्या सोबतिणीने तिला धक्का मारून जागे केले. तिने तावडतोब हाताच्या मुठीत धरून ठेवलेली कोमेजलेली फुले रस्त्यावर फेकली. साधू निघून गेल्यावर त्यांनी पाय दिलेली, कुस्करलेली फुले तिने गोळा करून पदरात बांधून ठेवली आणि ओटीतली एक मूठभर फुले घेऊन ती दुसऱ्या साधूंच्या पथकाची वाट पाहात बसली.

साधूंच्या स्नानानंतर पवित्र गंगेत स्नान करायची आक्कांना हौस होती. परंतु

आशामात्र नव्हती. आशा असती तरी ती पुरीसुद्धा झाली नसती, लहर होती म्हणूनच ती पूर्ण झाली. ढकलाढकलीच्या धक्क्याने कसे तरी करून ब्रह्मकुंडाच्या पायऱ्यांपर्यंत येऊन पोचलो– माझे मलाच आश्चर्य वाटले. मी आक्कांना सांगितले, " जशा आहात तशाच खाली उतरा. कपडे बदलण्याची धडपड करू नका. " अर्थात त्यांना सांगता सांगता मी पण पाण्यात झेप घेतली.

सबंध दिवसाची धूळ, उन्हाचा ताप, थकवा, तहान सर्व धुवून निघाले. थंडगार पाणी, किती सुमधुर, डोके पुन्हा पुन्हा बुडवून स्नान करीत होते. एक अर्धवट उमललेली कुंदकळी वाहात येऊन पदराला लागली, वर किनाऱ्यावर आले. शरीर आणि मन दोन्ही सुखावली होती.

समोरच्या उंच पर्वतावरील मनसादेवीच्या मंदिराच्या कळसाच्या मागे असलेल्या ढगांवर सूर्यास्ताची प्रभा फाकली होती.

गंगेच्या किनाऱ्यानेच सावकाश चालत परत निघालो. भोलागिरी आश्रमानंतर कच्च्या रस्त्याच्या मध्येच एक शुष्क नाला येऊन मिळाला होता. मी सावकाश पाय टाकीत होते. इतक्यात––" गेले, गेले, कोणाचे तरी कपडे गेले, " असे म्हणून आक्का वळल्या आणि पाण्यात शिरल्या.

खूप घेराचा बुट्टीदार घागरा प्रवाहाच्या मुखाशी वाहात आला होता.

उघडचा अंगाने तीन चार पुरुष गुडघाभर पाण्यात उभे होते. बोटांनी घागरा दाखवीत असतानाच आक्का एकदम चमकून उभ्या राहिल्या, मृत स्त्रीचा घागरा त्या लोकांनी अगोदरच पाण्यात सोडला होता. निर्विकार दृष्टीने आक्कांकडे पाहात त्यांनी एक पिशवीभर चिताभस्मसुद्धा गंगेत टाकले.

तंबूच्या आत बसल्या बसल्या समोर निरनिराळ्या मातींचे प्रकार व शेंदराच्या वाटचा मांडून मी जिन्यावर रांगोळी (अल्पना) काढीत होते. त्या दिवशी रामकृष्णदेवांचा जन्मोत्सव झाला, तेव्हा नाना फुलांचे हार आणि गुच्छ यांनी आसन सजवले होते. तरीसुद्धा पाहून सारखे वाटत होते, समोर थोडी जरी रांगोळी असती तरी सर्वांगसुंदर शोभा आली असती. मी पाहात होते आणि विचार करीत होते, आक्का आणि मी मिळून काढू शकत होतो की रांगोळी ! परंतु ही जागा तर स्त्रीविरहित.

पुरुषाचे कठीण हात स्त्रीसुलभ गोष्टी इतक्या नैपुण्याने,कौशल्याने करतात की स्त्रीच्या हाताची उणीव भरून काढतात. मनातल्या मनात मी हार मानली आणि संतापत राहिले. त्या दिवशी प्रसादाला तळलेले बटाटे केले होते. काय सुंदर झाले होते. एक नाही, दोन नाही, चांगले शंभर एक माणसांच्या पानांत ते वाढले होते. या कठीण हातांमध्ये इतका नाजूकपणा येतो कुठून ? रंगसंगती जुळवून केलेले फुलांचे हार दोन्ही वेळा देवाच्या गळ्यात रुळत असतात. कुठल्याही कामासाठी बायकांना हाक मारावी लागत नाही. माझा अभिमान जागा झाला. रांगोळीची कल्पना हो ना करता करता सांगितली. मोठी आश्चर्याची गोष्ट म्हणजे कुणी काही हरकत घेतली नाही. मोठ्या उत्साहाने आक्कांनी, भिजवलेले आतप तांदूळ वाटून आणले आणि त्या म्हणाल्या, " काढ लाल जमिनीवर पांढरी रांगोळी, मनाला येईल तशी काढ. मी काढलीपण होती. सहा-सात दिवस राहिली होती. कुणी पुसली नाही. आता परत जाताना आठवण झाली. शशीमहाराजांना स्थायी स्वरूपाचे असे काहीतरी करून ठेवावे असे वाटले म्हणून मिस्त्रीला बोलावून पाईन झाडाचे लाकूड आणि फणसाचे लाकून जोडून मस्तपैकी एक पाट तयार करून द्यायला सांगितले. थोडे आधीच तो पाट ते देऊन गेले होते.

आता फक्त दोन दिवस हाताशी होते. काम सपवायला हवेच होते. म्हणून मानेवर खडा ठेवून कामाला बसले. आज सकाळपासूनच आभाळ चांगलेच ढगाळून आले आहे. मला एकटीला सोडून कुणीच बाहेर जाणार नाही. नाहीतर मनाला रुखरूख वाटली असती.

काल गंगेच्या पलीकडच्या तीरावर ऋषिकुमारांकडे गेलो होतो. सुशिक्षित पंडित साधू ते. गुजरायी. पाटणा विश्वविद्यालयाचा पदवीधर मुलगा. सर्व संसार सोडून हिमालयावर तपस्या करायला निघून गेला. पण ती पूर्वीची गोष्ट ! आता राख फासून, जटा वाढवून, समोर धुनी पेटवून वाळूच्या चरात बसले आहेत. नुसते पाहून यांचा वेगळेपणा कोण सांगू शकला असता ? एक दिवस इथेच झाली होती ना ओळख ? प्रभादीला लागलेला तो दम; कुणाला तरी कळले होते आणि त्याने ऋषिकुमारांना बोलावून आणले होते, जंगलांतून झाडपाला, मुळी गोळा करून हे आजाऱ्यांना औषध पण देतात. ते म्हणतात, " हीसुद्धा लोकसेवाच ! "

ऋषिकुमारांचे बोलणे साधे, सरळ, बुद्धिगम्य होते. ते म्हणायचे, " ईश्वर म्हणजे काय ? शंकराचार्य, निताई, रामकृष्ण, विवेकानंद, रवीन्द्रनाथ या सर्वांच्या मनात

हा एकच प्रश्न उभा राहिला होता--मी कोण ? माया म्हणजे काय ? ब्रह्म कोण ? उपनिषदांत सांगितले आहे, सर्वम् खल्विदम् ब्रह्म, एकच ब्रह्म सर्वत्र व्यापून आहे. परंतु त्यांतल्या गोष्टी सांगायला जितक्या सोप्या तितका त्यांचा प्रत्यय येणे कठीण. कारण ईश्वराला जाणायचे असेल तर अगोदर स्वतःला ओळखले पाहिजे शंकराचार्यांनी संसारत्याग केला व ते गुरूच्या शोधार्थ निघाले. घरात होते, शंकराचार्यांनी दाराला धक्का दिला. गुरूंनी ओरडून विचारले, "कोण आहे ? तू कोण ?" शंकराचार्य म्हणाले, "मी कोण हे जर मला माहीत असतं तर तुमच्याजवळ कशाला आलो असतो ?" त्यांचं हे उत्तर ऐकून गुरू हसत बाहेर आले आणि त्यांनी शंकराचार्यांना आलिंगन देऊन त्यांना आत नेले.

आत्मज्ञानाचा लाभ झाला म्हणजे भगवत्ज्ञानाचाही लाभ होतो. भगवान आत्म्याचा आत्मा – परमात्मा ज्यांना भगवत्ज्ञानाचा लाभ होतो त्यांचे आचरण अपूर्व असते.

एक दिवस सबंध दिवसाच्या भिक्षेनंतर नामदेवांनी काही भाकरी तयार केल्या. देवाला नैवेध दाखवून मग ते प्रसाद घेणार होते. भाकरी भाजून झाल्यावर थोडेसे तूप आणायला म्हणून ते आत गेले. तेवढ्यात एक कुत्रा आला आणि त्याने भाकरी खाऊन टाकल्या. नामदेव तूप घेऊन परत आले आणि झालेला प्रकार पाहून हसू लागले, ते म्हणाले, "प्रभू, आज तुम्हांला इतकी भूक लागली होती की भाकरीला तूप लावीपर्यंतदेखील धीर धरता आला नाही ?"

ऋषिकुमार म्हणाले, "कलियुगात ईश्वरनाम हाच एकमात्र आधार आहे."

**"यह कलिकाल न धरम विवेकू ।**
**रामनाम अवलम्बन एकू ।। "**

"सर्वजण नामाचा जप करा. तुम्हांला माहीत नाही का की नामावरच 'नामी'ची अत्यंत प्रीती असते ? जिथं नाम चालते तिथे 'नामी' जाणारच, न जाऊन चालतच नाही."

"आता हेच पाहा ना, इथे हे इतके लोक आहेत; परंतु मी जेव्हा 'दत्तजी' म्हणून हाक मारीन तेव्हा तुम्हीच 'ओ' देणार ना ? अगदी याचप्रमाणं परमेश्वराला हाक मारली म्हणजे तोदेखील ओ देतो. रवीन्द्रनाथांच्या साधनेमध्येसुद्धा त्यांनी हेच सांगितलंय," बोलता बोलता ऋषिकुमारांच्या आवाजाला निश्चयाची

धार आली. ते म्हणाले, "या जगात जन्मास आल्यापासून कधी ना कधी सर्वांना भगवत्‌दर्शन होतेच. परंतु त्याला ते कळत नाही, हे ओळखता येण्यासाठीच या कलियुगातला साधा उपाय म्हणजे नामजप आणि साधुसंग होय. साधुदर्शनातसुद्धा पुण्य आहे आणि पुण्यफलही मिळतेच की !"

उदासी बाबांची गोष्ट ऐकली होती त्याची आठवण झाली. या इथे हरिद्वारलाच ते राहात. ते नानकपंथी वृद्ध साधू होते. मोठमोठे महात्मेसुद्धा विशेष आदराने त्यांच्याकडे पाहात; थोर साधू म्हणून ते गणले जात.

बहुरूप्याप्रमाणे एकेका दिवशी एकेक अद्‌भुत साज करून गंगेच्या बाजूने बांधलेल्या चबुत्र्यावरून उदासीबाबा फिरायचे. एखाद्या दिवशी बहुमूल्य रेशमी कफनी घालायचे. पायात बूट, मोजे, घुंगरू आणि डोक्याला मोरपिसे लावलेले दीड हात उंच पागोटे, एखाद्या दिवशी आपादमस्तक काळे कपडे घालून ते राहात; वयोवृद्ध साधूचा हा अपूर्व वेश पाहून लोक आकृष्ट होत व त्यांच्या मागे मागे धावत सुटत; त्यांना पण मजा वाटायची. लाज सोडल्याशिवाय राजपथावरून अशा वेशात हसतमुखाने कुणी चालू शकेल का ? एकाने त्यांना विचारले, "बाबा, तुम्ही असा विक्षिप्त वेश का करता ?" त्यांनी उत्तर दिले, "इतक्या गर्दीमध्ये खऱ्याखुऱ्या साधूचे दर्शन होत नाही सर्वांना. साधूला ओळखून काढणे फार कठीण जाते, म्हणून मी असा हिंडत राहतो, जेणेकरून सहजच सर्वांचे लक्ष जावे; आणि त्याबरोबरच त्यांना साधु-दर्शनाचा पुण्यलाभही व्हावा."

ऋषिकुमारांचे बोलणे ऐकता ऐकताच मी त्यांचे एक स्केच केले होते. त्यांना त्यावर सही करायला सांगितले, माझ्यापाशी पेन नव्हते, ऋषिकुमारांनी व्याघ्रचर्मा-खाली हात घालून एक पोटली काढली व त्यातून दौत व लेखणी बाहेर काढली. एकेकाळी फाउंटनपेन होते; आता मात्र शाईत बुडवून लिहावे लागत होते. लिहिताना निबाजवळ वाळू खरखरली.

समोरच एक चकचकित कुऱ्हाड पडली होती. बैरागी साधूला या वस्तूची काय जरुरी ? डोळ्यांना ते जरा विसंगतच वाटले. हातांनी ती कुऱ्हाड उचलून पहात असताना तेच मनात येत होते. ऋषिकुमार समजले आणि हसून म्हणाले, "जंगलात राहतो; शास्त्र जेव्हा कामास येत नाही तेव्हा शुभ कार्यासाठी शस्त्राचा उपयोग करावा लागतो."

पांढरा रंग कितीही लावला तरी मनासारखा जमेना. पाईन लाकडाच्या तेलात

मिसळलेल्या पांढऱ्या रंगाला चुनखडीची चमक आली होती. पांढऱ्या कमळाची पाकळीच नीट जमली नाही तर चित्र कसे चांगले दिसणार ? तंबूच्या समोरून माणिक चालला होता. त्याला बोलावून सांगितले, "हॉस्पिटलमध्ये औषधात घालायला झिंकऑक्साइड असतं, ते थोडं आण जा. डिंकात मिसळून, ते लाकडावर पकड घेतं का ते जरा पाहते."

कागदाच्या पुडीत माणिकने ते आणून दिले. तो म्हणाला, "त्यांनी सांगितलंय की हे पाण्यात मिसळणार नाही, तेलच हवं."

हातातल्या ब्रशवर थोडं झिंकऑक्साइड उचलून घेऊन पीठ मिसळून पाहिलं, वा, हा तर चांगला जमतो. छान काम होईल, खूष होऊन पाटावर पांढरा रंग लावला. ऋषिकुमारांचे बोलणे कानांत घुमू लागले, "तेरी भावना बडी विचित्र हाय. भगवान अंतरी आहेतच, मेघछाया सूर्याला पाहू देत नाहीत."

आमच्या तंबूच्या अगदी समोरच वसुमती मांचा छोटासा तंबू होता. समोर पाहिले की त्या सहज दिसतात. त्यांना याच नावांनी इथे सर्वजण हाका मारतात. जीर्ण असे एक धोतर गुंडाळलेले आणि अंगावर एक सुती चादर पांघरलेली, मांडीवर निखाऱ्याचे घमेले ओढून घेऊन सारा वेळ एकाच जागी, एकाच विचारात दंग होऊन त्या बसलेल्या असतात. पहाटे तीनला उठून पाहिले तरी अशाच; रात्री बारा वाजता पाहिले तरीसुद्धा हीच तऱ्हा. त्या कधी झोपतच नाहीत का ? जमिनीवर चटईवर एका बाजूला एक फाटके कांबळे अंथरलेले असते. याला बिछाना म्हणायचे एवढेच. दुसऱ्या कशाचीच गरज नव्हती. दिवस-रात्र, चोवीस तासांपैकी बावीस तास एकाच जागी बसून एकचित्ताने त्या जप-ध्यान करायच्या. दोनएक तास कधीतरी त्या बिछान्यात पडायच्या. केव्हा ते काही कुणाला कळायचे नाही.

आक्का म्हणाल्या होत्या, "एकदा विचार करून पाहा, असा प्रणाम कधी पाहिला नव्हता. वसुमती मा स्वतः कसे लोटांगण घालतात ते त्या दिवशी रात्री बाजूने जाता जाता तंबूच्या फटीतून डोकावून पाहिले मी."

शशीमहाराजांनी आक्कांना सांगितले, "ही पाहा वसुमती मांची अवस्था ! वसुमती वृत्तपत्राचे उपेंद्र मुखोपाध्याय यांची ही पत्नी. अगदी कोटयधीश. मुलगा सतीश मुखोपाध्याय. नातू रामचंद्र मुखोपाध्याय. सोन्यासारखा संसार, राजराणी, राजमाता दोन्ही एकाच वेळी. परंतु काय दुर्दैव ! पती वारला, एकुलत्या एक मुलाच्या घरचा नातू वारला, मुलगा वारला, सूनही वारली. सर्व हिरावून गेलेली म्हातारी

विधवा फक्त परमेश्वराच्या नामाच्या आधारावरच जिवंत राहिली. पति गेल्यापासून तिने जेवणच सोडून दिले. सबंध दिवसानंतर रात्री बाराएकच्या सुमारास एक वाटी दूध व दोन केळी फक्त खाते. हिला काय कमी होते ? ऐश्वर्य पायाशी लोळत पडलेले होते तरी ही रस्त्यावरची भिकारीण झाली. आता हाच संसार आहे. डोळ्यांसमोर हे एक उदाहरण आहे याच्यापासून काय शिकायचे ते पाहा. "

यशोरची दीदी, वसुमती मांना चांगली ओळखते. तिने सांगितले, " नातसुनेनं भारी किंमतीचं कांबळं विकत घेऊन आजीबाईंना दिलं. ते त्यांनी घरी दरवानाच्या स्वाधीन केलं आणि त्या इथं आल्या. आता पाहा ना, कसं फाटकं तुटकं पांघरूण घेऊन बाळंतिणीच्या खोलीतल्या सारखं विस्तव जवळ घेऊन बसल्या आहेत. "

' यशोरची दीदी ' याच नावाने आम्ही त्यांना हाक मारतो. काळा चेहेरा पण सदा हसतमुख. कपाळावरचा लाल कुमकुम तिलक टुकटुकित दिसतो. मध्यम वयाच्या, उंच, दुहेरी हाडाच्या, आम्हांला त्या फार आवडतात. पतीबरोबर त्या तीर्थयात्रेला आल्या आहेत. खरे म्हणजे पतीबरोबर त्या आल्या असे नाही. त्या सांगतात, " हा म्हातारा का मला कुठं घेऊन जाणार ? स्वत: एकटाच या तीर्थाला जाईल, त्या तीर्थाला जाईल आणि मला सांगेल, " तू नंतर कर तीर्थयात्रा ! मुलं तुला तीर्थयात्रेला नेतील. " पण मी म्हणाले, " स्वत: स्वतंत्र हिंडा आणि मला मात्र मुलांच्या माथी लादा; ते का म्हणून ? " या वेळी स्वामीजींना सांगून मीच सर्व नक्की केले आणि त्यांना सांगितले, चला. तुम्ही काही मला घेऊन जात नाही तर मीच तुम्हांला घेऊन जाते, तीर्थयात्रा करून आणते. "

' यशोरची दीदी ' बहुतेक रोजच वसुमती मांजवळ जाऊन बसतात, नाना गोष्टी ऐकतात. त्या सांगत होत्या, " मी एवढं म्हणाले, एकदा पायांना स्पर्श करू द्या, मां एकदा प्रणाम करते, तर म्हातारीची ही शिवाशीव, घाईनं पाय जवळ ओढून घेऊन झाकून टाकते. आणि म्हणते, " स्नानाच्या वेळी पायाला स्पर्श कर. " पाहा ना जगात एकोणपन्नास खुळांवर औषध आहे, औषध नाही फक्त दोन गोष्टींना, एक ' नैगीखूळ ' आणि दुसरं ' सोवळंओवळयाचं ' खूळ. "

त्यादिवशी मीसुद्धा ऐकले होते, वसुमती मा स्वत:च सांगत होत्या, " या शिवाशिवीपायी मी दुसऱ्यांना कमी का छळलंय ? एक दिवस ' हे ' जेवत होते. एकदम त्यांना शिंक आली आणि शिंकताना तोंडातलं एक शीत कुठंतरी उडालं. तीन दिवस ते भाताचं शीत शोधण्यासाठी घरात भयंकर उलथापालथ केली, पण ते काही सापडलं नाही. एकदा धोब्याला कपडे देत होते. कपड्याच्या शेल्फवरून कोट काढून

पाहिला तर नवऱ्याच्या कोटावर हळदीचे डाग. काही दिवस अगोदर हा कोट घालून ते मेजवानीला गेले होते. त्या वेळी कोटावर भाजी पडली असेल. देवा, देवा! तोच कोट मी शेल्फवर ठेवला. सारं काही उष्टं खरकटं झालं ! सर्व काही काढून धुतलं, पण मनाची खंत काही केल्या जाईना. माझ्या या 'खुळा'बद्दल कुणी काही म्हणालं, तर माझे पति म्हणत, " असू दे, असू दे. काही बोलू नका तिला. तिच्यामुळे तर आमच्या घरी लक्ष्मी आहे आणि आम्हांला काय तिचं तेवढंसं खूळही सहन करता येत नाही ? "

मी विचारले, " आणि हे ' नैगी खूळ ' म्हणजे काय ? "

वसुमती मा म्हणाल्या, " तेसुद्धा एक भयंकरच खूळ आहे. " ' नैगीखूळ ' म्हणजे बायकोचा—सुनेचा संशय घेणं, ' आता वाटतं तिनं तिकडं पाहिलं, ' ' आता वाटत कुणाकडं तरी पाहून हसली, ' हेच. दुसरं काय ? म्हणून म्हणते या दोन गोष्टीनाच औषध नाही. "

' यशोरची दीदी ' येऊन अगदी चिकटून बसल्या. त्या म्हणाल्या, " सक्काळच्या वेळी सांगायला आलेय. पतिनिंदा तर होणार नाही ना ? "

मी म्हणाले, " पतिनिंदा कसली ? पतिकीर्तन म्हणा, म्हणजे सर्व दोष धुवून जाईल. "

तोंडभर हसून यशोरच्या दीदींनी संमती दिली व त्या म्हणाल्या, "छान, छान, पतिकीर्तनच करते थोडं. तीर्थस्थानी थोडं पुण्यकर्म तरी होईल. काय सांगू आणखी म्हाताऱ्याच्या गोष्टी ! सकाळी दक्षघाटावरून स्नान करून आलो. पाणी भयंकर थंड होतं. म्हातारा त्यात उतरणार होय ? पण मी म्हटलं, माझा हात घट्ट धरून ठेवा. तोल जाऊन पडलात तर मी धरून उचलीन, मोठ्या कष्टानं त्यांना स्नान करवलं आणि परत आलो. इथं येऊन घाईघाईने कपडे उन्हात घालून ते सरळ मंदिराकडे निघाले. मी म्हटलं, 'अहो, जरा थांबा, मीही येते तुमच्या बरोबर.' तर म्हणतात कसे, ' नको, तू नंतर ये; साधूच्या समोर तुला घेऊन जायला मला लाज वाटते. ' मी म्हटलं, ' मला घेऊन जायला तुम्हांला लाज वाटते ? तुम्हांला काय वाटतं साधूंना काही माहीत नाही ? मी या साधूंना बोलावते आणि सांगते, हा जो म्हातारा पाहाता ना, मी त्याचं कुटुंब; आणि तुम्हांला बारा मुलं आहेत. ' घ्या. आता साधूंच्या समोर दाखवा तुमची साधूगिरी चांगली ! '

चारी दिशा ढगांमुळे आणि पावसामुळे कशा अंधारून आल्या होत्या. तंबूच्या आतही उजेड कमी झाला होता. पाट ढकलत ढकलत दरवाज्याजवळ घेऊन गेले. त्यानेही सोयीचे वाटेना. पावसाचे थेंब लाकडावर पडायला लागले. एक तर थंडी आणि त्यात पावसाळी हवा. थंडीनं हाताची बोटं अगदी आखडून गेली होती. मोठं कांबळं गालिच्यासारखं पसरून, अंगावर जाड शाल पांघरून, सर्व नीट झाकून घेऊन बसले. पण मनात सारखं येत होतं, उघड्या अंगानं, उघड्या जागेत बसून, गंगेच्या त्या तीरावर साधू काय करीत असतील ?

असे ऐकले आहे की, साधू अंगाला जी राख फासतात तिने थंडी थोडी कमी वाजते. पण राख पावसाच्या पाण्याने लगेच धुऊन पण जाते ना ?

आक्का म्हणाल्या, " हे पाहा, त्या दिवशी आपल्यासमोरच त्या साधूंनी गांजा घेतला. आपल्याला किती विचित्र वाटलं ते ? परंतु मी नंतर विचार केला, गांजा न खाऊन काय करणार ? या देहाला इतक्या सगळ्या गोष्टी सहन करायला लावायच्या तर एखादा काही कडक उपाय हवा ना ? "

ऐकले होते, फक्त गांजाच नव्हे, नाना तऱ्हांची औषधेही ते घेतात. ऐकलेली गोष्ट, पाहिलेली नव्हे ! असे ऐकले होते की ते 'संखिया' ('सोमल' विष) पण खातात. 'संखिया' भाजून त्याचे थोडेसे भस्म खाल्ले की या थंडीतही अंगात इतकी उष्णता येते की वाटते गंगेच्या पाण्यात बुडी मारून राहावे.

आक्का म्हणाल्या, " आणखी एक विचार मनात येतो. आपण साध्या गोष्टीवरूनसुद्धा किती बेचैन होतो. एक दिवस पत्र यायला उशीर झाला तर रात्री धड झोप लागत नाही. संसाराच्या पाच मण पाशांनी आपण जसे काही जखडले गेलो आहोत. हे लोकसुद्धा एकदा तसेच होते. पण ते सर्व विसरून जाऊन हे राहातात. माया तोडणं सोपं का आहे ? मनावर ताबा मिळवणं मोठं कठीण काम असतं. "

शशीमहाराज म्हणाले, " मनच्या गोष्टी काही सांगू नका. हेच पाहा, आज छत्तीस वर्षं मी या मार्गाचा अवलंब केला आहे, तरी मनावर ताबा मिळवता आला का ? काय सांगू, लहानपणी एकदा केव्हातरी, आठनऊ वर्षांचा असताना कुणाच्यातरी बागेतून मी आंबे चोरले होते. अलीकडेच रात्री स्वप्नात ती घटना पुन्हा दिसली. "

" मन फार वाईट असतं. साधू झालं म्हणजे मन मुठीत राहातंच असं नाही. कितीतरी वेळा मन जिंकता आलेलं नाही. खरंच सांगतो, कधीकधी जपतप करायचा कंटाळा येतो. तेव्हा काय करतो– सबंध गीता तोंडपाठ करून ठेवलीय. तीच

म्हणत बसतो. म्हणता म्हणता एखाद वेळी मन स्थिर होतं. तेव्हा जप करायला बसतो. म्हणूनच सांगत होतो, गीता तोंडपाठ करून ठेवा. पाहा किती उपयोगी पडते. मन केव्हाही विचलित झालं की गीता म्हणा. आमची पूजाअर्चासुद्धा त्यासाठीच, मन अंकित करण्यासाठीच असते– फूल वाहिलं, बेलपान वाहिलं, चंदन लावलं, स्वतःला शुद्ध केलं, हे सर्व दुसरं काही नाही– मनाला एका जागी स्थिर करण्याचा हा मार्ग आहे. ''

मला असे वाटायचे, लोक साधू होतात, सर्व काही गोष्टींचा त्याग करून इथे येतात, हरघडीला ते आमच्यासारखे मनामुळे बेचैन होत नसतील.

त्या दिवशी संध्याकाळच्या वेळी सतीकुंडावर निर्जन वनात झाडाच्या सावलीत बसले असताना याच गोष्टी मनात येत होत्या. म्हणूनच गोपेश्वरमहाराजांना सांगितले होते की, '' आपण मंडळी अशा जागी राहता की तिथं मन आपोआपच स्थिर होतं. कुठलीही गडबड बाधा आणीत नाही. ''

माझे बोलणे ऐकून दीर्घ निःश्वास सोडून ते म्हणाले होते, '' आई ग, जितकं सोपं वाटतं तितकं सोपं नाही ते. इतकी वर्षं इथं काढली. मनाची घालमेल थांबली का कुठं ? ''

एकाच गाण्याच्या काही ओळी आज मनामध्ये पुन्हा पुन्हा गुणगुण करताहेत. त्यांचा अर्थ होता– '' तू आपला हात पुढं करून माझ्या हाती दे. मी तो माझ्या हाती धरून सतत माझ्यामधे ठेवीन आणि मार्गावरून माझं एकलं चालणं रमणीय करीन. ''

केव्हा एकदा ऐकलं होतं हे गाणं !

एकदम जीव कासावीस झाला. हातातला ब्रश टाकून मी तशीच उठले, थोडं गाणं, गाणं ऐकायलाच हवं. आताच, अगदी या क्षणीच. फार फार जरुरी होती त्याची.

काय आश्चर्य ! इथे हे लोक दिलखुलासपणे गाणी का गात नाहीत ? पुष्कळांना गाण्याचा आवाज आहे हे हरिनाम स्मरणाच्या वेळी ओळखले होते, हे साधक आहेत. गायनातदेखील साधना असतेच की, हिंडता फिरताना गाण्याची तान छेडून सारी सृष्टी धुंद करून का ठेवीत नाहीत ?

एक वृद्ध साधू समोर येऊन उभे राहिले. आजच सकाळी ते इथे आले होते; ते सेवाश्रमचेच कुणी होते की नाही ते माहीत नाही. जरा वेगळेच वाटले. इतके काही उंच होते ते की मान वर करून पाहावे लागले. गळ्यात रुद्राक्षमाला आणि कमरेला बासरी. ते म्हणाले, '' आई, तुम्हांला माहीत आहे ? ही माला आणि ही

बासरी हेच माझं सर्वस्व आहे. जपमाळेनं जेव्हा थकवा येतो तेव्हा बासरी फुंकतो, '' सूर गुणगुणतच ते तंबूत शिरले. रंगाच्या ओढीनं ते दुरून आले होते.

आक्का म्हणाल्या, '' आपल्या तोंडून एक कीर्तन ऐकावं असं वाटतं. ''

ते हसले आणि कमरेची बासरी काढून त्यात त्यांनी एक फुंकर मारली आणि लगेच ते थांबले. एकाएकी एखाद्या असह्य वाटणाऱ्या, दडपून टाकलेल्या दु:खाची छाया त्यांच्या तोंडावर दिसली. आक्कांकडे पाहून ते म्हणाले, '' मी जर कीर्तन (परमेश्वरस्तवनाची गाणी) गायलो तर ते सहन करू शकाल ? ''

आक्का गप्पच राहिल्या.

साधू हळूहळू बाहेर गेले आणि आम्रवृक्षाखाली जाऊन उभे राहिले. काहीही न बोलता आम्ही त्यांच्या मागे मागे आलो. त्यांनी बासरीवर सूर वाजवून आमच्याकडे पुन्हा एकदा पाहून गाणे सुरू केले. –

**कृष्ण शोधिते, कृष्ण कुठे ग । कृष्णप्रेमी मी, डुंबत राही ।**
**म्हणती लोक, कलंकिनी मी । कृष्णाची राई ।।**

ज्ञानमहाराज फारच विचलित झाले होते. गावाहून पत्र आले होते, गुंडांनी घरावर हल्ला करून भाऊ, काका, पुतणे अशा सतरा जणांची जानवी तोडून त्यांना कलमा म्हणायला लावलं आणि लुटालूट करून ते सर्व काही घेऊन गेले. जे समर्थ होते ते लेकीसुनांना घेऊन दूर गावाला पळाले; आई-वडील वडिलोपार्जित वास्तूत पडून होते. त्यांच्याजवळ एकही वाहन नव्हते, की त्यांच्यामध्ये चालण्याची शक्ती राहिली नव्हती. भाऊ, काकांनी याच साऱ्या गोष्टी संन्यासी मुलाला पत्रात कळवल्या होत्या, '' तुला जसं जमेल तसं जाऊन त्यांची सुटका करून घेऊन ये. ''

रक्ताचे नाते, आतड्याला पीळ बसत होता. संन्यासधर्माला त्याचे मर्म काय कळणार ?

ज्ञानमहाराज सल्ला विचारायला दादांकडे आले. मिशनचे सर्व साधू जे या कामासाठी पुढे गेले होते ते तुरुंगात बंदिस्त झाले होते. आता काय करायचे ?

वसुमती मां च्या घरी बायकांनी गर्दी केली होती. वाटेत येताना ऐकू आले. वसुमती-मां म्हणत होत्या, '' मुलाचं काय रूप ! लालबुंद नुसता, वडिलांसारखा चेहेरा, जसा अगदी राजपुत्र, पहिला नातू झाला. मोठ्या घरचा मुलगा – सर्वांची धावपळ, नाव

काय ठेवायचं ? " मी म्हणाले " काशीसारखं धाम नाही आणि रामासारखं नाम नाही. नातवाचं नाव ठेवलं – रामचंद्र ! "

काल रात्रीपासूनच पावसाला उसंत नव्हती. तंबूच्या चारी बाजूंचे कापड भिजून पाणी वाहात होते. आजसुद्धा बाहेर पडायची सोय नव्हती; एका दृष्टीने बरेच झाले. पाट जमिनीवर ठेवून चित्र काढायला बसले, काहीही करून आज संपवायलाच हवे होते. नाहीतर वेळ कुठे होता आणखी ? राममय महाराजांना पकडले. " आज वाटेल तितक्या गोष्टी सांगा. हातांनी काम करीन आणि कानांनी गोष्टी ऐकेन. " मी म्हटले.

खाटेवर बसून राममय महाराज श्रीमांची गोष्ट सांगू लागले. एक एक करीत लोकांनी तंबू भरून गेला. रंगाच्या आकर्षणाने लोक दारात येत होते आणि गोष्टीच्या ओढीने आत येऊन बसत होते.

राममहाराज हसले आणि म्हणाले, " मां ना पाहिलंय मी–त्यांना जणू सर्वांच्या मनातल्या गोष्टी समजायच्या आणि त्याचप्रमाणं त्या त्याला उपदेश करायच्या. एकदा एका मुलीच्या आईनं ' मां'ना लिहिलं होतं. – ती बहुतेक वकिलाची बायको असणार, आठ पानी उलटतपासणीसारखं पत्रं होतं ते – एका मुलानं तिच्या मुलीशी लग्न करायचं वचन दिलं होतं. परंतु नंतर तो लग्नाला तयार नव्हता. तरी, ' मां'नी एकदा सांगितलं तर मुलगा लग्न करील इत्यादी-इत्यादी. मां म्हणाल्या, ' मुलानं तर मला काही लिहिलं नाही. त्याच्या मनात काय आहे ते कळल्याशिवाय त्याला आदेश कसा देणार मी ? "

" कुणाचीही लग्न करायची इच्छा असली तर मां म्हणत, 'चांगलं आहे. लग्न का वाईट असतं ? अवश्य कर. माझंही लग्न झालं होतं. पाहा ना देवदेखील जोडप्यानं आहेत – रामसीता, लक्ष्मीनारायण, शिवपार्वती. "

" आणि कुणाची लग्न करायची इच्छा नसली तर त्यानेही त्या आनंदित होत – चांगली झोप तरी मिळेल पोराला नाहीतर मुलाचा आजार, मुलीची रडारड, सगळा नुसता गोंधळ ! "

आक्कांनी विचारले, " बरं, असं ऐकलंय की, मां परदेशी लोकांबरोबरदेखील बोलतात. त्यांना तर इंग्रजी येत नव्हतं ना ? "

" यशोरदीदी ' मां 'च्या शिष्याच. त्यांनी पण सांगितले की ' मां'ना एका मेम-बरोबर बोलताना त्यांनी पाहिले होते.

राममय महाराज म्हणाले, "ती एक आणखी गंमतच आहे. त्यांना एकमेकींचे बोलणे कसे कळायचे ते त्यांचे त्यांनाच माहीत. निरनिराळे प्रश्न घेऊन कितीतरी परदेशी लोक 'मां'जवळ यायचे. बरोबर दुभाषी असायचाच. एकदा तर मीच दुभाषी म्हणून हजर होतो; परंतु काही मिनिटे झाली नाहीत तोच माझ्या लक्षात आले की प्रश्न विचारणाऱ्याने प्रश्न विचारल्याबरोबर, अगदी लगेच 'मां' उत्तर देत होत्या; आणि तो नम्रपणे मान खाली करून ऐकत होता. दुभाष्यावर तोंड उघडायची पाळीच आली नाही, हे ते गुरुदास महाराज – डच गृहस्थ आहेत –' मां 'चा मंत्र घेतला आहे त्यांनी. त्यांना मी विचारलं, "तुम्ही मंत्र जो घेतला, तुम्हांला 'मां'चं बोलणं कळलं कसं ? त्यांनी हसून उत्तर दिलं, " I understood. "

गुरुदास महाराजांना तर रोज पाहात होतो. भगव्या वस्त्राने झाकलेला लाललाल वृद्ध. आंबराईमधल्या लांब रस्त्यावर ते दोन वेळा फिरत आणि उन्हात ठेवलेल्या वेताच्या खुर्चीवर थोडा वेळ बसून राहात. दुसरे साधूसुद्धा त्यांच्याभोवती गोळा होत. त्यांच्या गप्पागोष्टी, चर्चा होत. अगदी समोरच दिसले तर मी पुढे होऊन जरा जवळ जायची. गुरुदास महाराजसुद्धा थोडा वेळ थांबत. प्रणाम करून मी निघून यायची; तेसुद्धा पुढे चालू लागत. सरळ ठरलेल्या रस्त्यावर जराही इकडे तिकडे व्हायचे नाहीत. अजूनपर्यंत मी त्यांच्याशी एकदाही बोलले नव्हते.

आज काय झाले कोण जाणे, दुरून पाहिल्यावर, रस्ता सोडून गवतावरून चालत ते आपणहून पुढे आले. गालातल्या गालात हसत माझ्या डोळ्यांकडे पाहात ते जोरजोराने म्हणाले, ' शिव, शिव ',

परवाच्या दिवशी देवाच्या वेदीसमोरची जमिनीवरची जागा मी रंगित फुलांची नक्षी काढून सुशोभित केली होती. ती पाहून गुरुदास महाराज फार खूष झाल्याचे मला कळले होते. ते म्हणाले होते, "प्रत्येक फुलाच्या पाकळीत पूजेचा मंत्रच जणू हातांनी ओतला आहे. नवीन आहे हा प्रकार."

म्हणूनच वाटते. त्यांचा तो आनंद अशा रीतीने ते व्यक्त करून गेले.

दुपारी जेवायच्या अगोदर आक्का मंदिरातील देवघरात गेल्या. मी बाहेरच उभी राहिले. धुक्यासारखा पाऊस पडत होता, डोळ्यांसमोरचे दिसत नव्हते, केसांतून पाणी ठिबकत होते. सोनाली (पिवळा चाफा) आणि चमेलींनी बाजूची झाडे भरून गेली होती.

अगदी सार्थ नाव; जसे रूप तसेच गुण !

आक्का म्हणाल्या, " घंटा झाली. ऐकू आली नाही ? चल लवकर. "

घाईघाईने कोपऱ्यात ठेवलेल्या लाकडी पेटीच्या आत हिरव्या पानात ठेवलेल्या रक्तचंदनाचा टिळा कपाळी लावून आम्ही स्वयंपाकघराच्या व्हरांड्यात आलो.

कितीतरी पिवळ्या रंगाची आंबट फळे आणि हिरव्या मिरच्या कागदांत गुंडाळून बरोबर घेऊन यशोरदीदी समोरच्या पंक्तीत बसल्या. आंबट, तिखट न घातलेले शाकाहारी (निरामिष) जेवण त्यांना आवडत नसे. त्या म्हणाल्या, " गंगेत माशांची नुसती रेलचेल असते. तेल मिरची घालून लाल चुरचुरित परतले तर कसे होतील सांग पाहू राणी. " असे म्हणून त्यांनी मिटक्या मारल्या.

पद्मापारची ती स्त्री. तिची आठवण राहून राहून येत नाही असे कसे शपथेवर सांगणार ?

संध्याकाळच्या वेळी वसुमती मां या तंबूत आल्या. त्यांनी बाहेरूनच डोकावून पाट पाहिला आणि म्हणाल्या, "सगळं संपल्यावर मला सांग. तुमच्याबरोबर एकदा बसेन. देवासमोर हा पाट ठेवून दोन गाणी म्हणून नयनजलांनी जरा पूजा करून येऊ. "

वसुमती मा सबंध दिवसभरात या अशा एकदाच उठायच्या. हात, तोंड धुऊन स्नान करायच्या; एखाद्या दिवशी स्नानाला गंगेवर जायच्या. त्यांच्याबरोबरची मोलकरीण सांगते. "काय त्या एकदोन डुबक्या ? डुबुक, डुबुक सारख्या नुसत्या बुड्याच मारतात आणि म्हणतात, "पाहा बरं, माझे सगळे केस भिजले की नाहीत ? डोकं सगळं पाण्यात बुडलं की नाही ?' "

सेवाश्रमच्या साधूंना जेवण घालायची त्यांना फार आवड. सवड मिळताच जिलेबीचा प्रसाद करायच्या. तूपभात, मसालेभात करायला लावायच्या. त्या म्हणत, " चांगलंचुंगलं असं काय खातात हे ? दोन वेळा नुसती दोन मुठी भात-भाजी; त्यात आवड नाही, यांना जेवायला घालायचं नाही तर दुसऱ्या कुणाला घालायचं ?"

थोडा काही पैसा त्यांनी स्वतःसाठी शिल्लक ठेवला आहे. त्यातूनच त्या या सर्वांसाठी खर्च करतात. बाकी सर्व संपत्ती हिशोब करून दानधर्मासाठी देऊन टाकलेली आहे. नातू, नातजावई यांना काही मिळालं, बाकीचे बारा लाख रुपये रामकृष्ण मिशनच्या शिशुगृहाला मिळाले. त्यांना याचं मोठं दुःख होतं. त्या म्हणतात " सर्व कायद्याच्या हाती गेलं. देवासाठी मन भरून असं काही मला करता आलं नाही. "

केरोसिनच्या दिव्याच्या उजेडात काम पुढे करता येईना. रंग पण नीट दिसत नव्हते. दादा म्हणाले, " आता काम बंद कर. झोप. तुझी आक्का कुठं गेली ? पुष्कळ वेळ झाला दिसली नाही. "

माझेही लक्ष नव्हते. रंग लागलेले ब्रश धुतले, रंगाच्या वाटया, पाट उचलून झाकून ठेवला आणि उठले. वर मान करून पाहिले. तंबूचे छत ओले होते. रात्री पाण्याचे थेंब पाटावर पडले तर ? तीनचार दिवसांची वर्तमानपत्रे उघडून पाटावर झाकून टाकली. हो, आणि कागद भिजले तर ? चौघडी करून कागदावर कांबळेही पसरले, कांबळेसुद्धा भिजले तर ? कॅन्व्हासचा होल्डॉल उघडून त्यावर उभा आडवा नीट घातला. आता कसलीच काळजी नव्हती.

खरेच की, इतक्या रात्री आक्का गेल्या तरी कुठे ? तंबूची झापड बाजूला सारून मी बाहेर आले. सर्व तंबूंमधून शांत अंधकार होता. मी कान टवकारले. वसुमती-मांच्या तंबूतून गुणगुणणे ऐकू येत होते का ? मी फटीतून पाहिले. बरोबर होते. आक्का तिथे समोरच बसल्या होत्या. चिखल संभाळून मीही आत गेले.

वसुमती-मा गाणे म्हणून आक्कांना समजावून सांगत होत्या, त्या म्हणत होत्या, " गाणं नाही म्हटलं तर मनात भावना कशा उत्पन्न होतील ? " मधूनमधून त्या गात होत्या आणि सांगत होत्या –

" असं सुरांमध्ये ध्यान करावं, नुसती साधना नीरस असते; ह्यातच सुरसता येते. "

आक्कांनी विचारले, " हा सुरस येतो कसा ? "

" कसा येतो ? "

वसुमती-मांच्या समोर एक काड्याची पेटी पडली होती. ती हातांत घेऊन त्यांतली एक काडी खस्‌कन् पेटवून त्या म्हणाल्या, " पाहा, नुसतं खस् करून ओढलं आणि काडी पेटली, " पेटलेली काडी फिरवीत फिरवीत त्या म्हणाल्या, " आता नुसत्या एवढ्यानं समस्त कोणखल जळून जाईल. "

'फू' करून फुंकर घालून काडी विझवून त्यांनी ती दूर फेकून दिली. त्या म्हणाल्या, " अगोदर ही आग पेटवायला हवी. आधी जमीन तयार करायची मगच ना झाड लावायचं ? जमीनच तयार नसेल तर झाड कसं वाचेल ? ठाकूर (रामकृष्ण परमहंस) सांगायचे " –

मी मध्येच विचारले, " आपण ठाकुरांना पाहिलं ? "

" हो पाहिलं ! त्यांचा स्पर्शही मला लाभला. अगदी परिसाचा स्पर्श. लहानपणी

आजोळी असताना आईचा हात धरून मी कितीदातरी ठाकुरांकडे गेले. ठाकूर म्हणायचे, " ही कुमारी कन्या, हिला आधी जेवायला वाढा बघू. "

" ठाकुरांची कृपा कधी सांगून संपते का ? इतक्या निग्रहाने वागत असतानासुद्धा त्यांचा अनुग्रह मला मिळतो, तसं पाहिलं तर मी निर्वंश आहे; परंतु ते खरं का ? ठाकूर म्हणायचे, ' जिवंत कुत्र्यापेक्षा मेलेला सिंह पुष्कळ चांगला. माझे ते सर्व नातेवाईक मृत सिंह होऊन जिवंत आहेत. सर्व देवाचीच कृपा; त्यानंच दिलं होतं, चांगल्या हेतूनं त्यानंच उचलून नेलं. "

" ठाकूर माझ्यावर फार प्रेम करीत. लग्न ठरलं. काळी मुलगी सासूला आवडली नाही, त्या म्हणाल्या, " माझा सुदर मुलगा. काळी सून कशी आणायची ?" ठाकूर म्हणाले, " ही काळी मुलगीच करा, धन दौलत, संतती, संपत्ती, लक्ष्मीचा लाभ होईल तुम्हांला. "

" माझी आई म्हणाली, तांदूळ नाही, चूल नाही, मामाच्या घरात वाढला, अशा त्या मुलाला मुलगी द्यायची ! माझ्या मुलीला अन्नवस्त्राचीसुद्धा ददात पडेल. "

" ठाकूर म्हणाले, काकी – आईला ते काकीच म्हणत – आणि एका नात्यानं ती काकीच लागायची – याच घरात तुमची मुलगी द्या, तुमची मुलगी राजाची राणी होईल. "

" त्यांचं सांगणंच शेवटी दोन्ही पक्षांनी मान्य केलं; लग्न झालं. लोक म्हणायचे 'काळी मुलगी, काळी मुलगी' ते मझ्या मनाला फार लागायचं. "

" लहान असले तरी मी फार स्वाभिमानी होते. विवेकानंदांनीसुद्धा विचारलं होतं, 'काळी मुलगी लग्न करणार का ? तिच्या पोटी काळी प्रजाच जन्माला येईल'. ह्या सर्व गोष्टी माझ्या कानी आल्या होत्या. लग्नानंतर जेव्हा मला सांगितलं, 'नरेन आला आहे, सुपारी कातरून दे.' तेव्हा मी उत्तर दिलं होतं, ' मला जमणार नाही, तो मला 'काळी मुलगी' म्हणाला होता, लहान वय, खोडकर वृत्ती, 'काळी मुलगी' म्हणाला हे माझ्या चांगलं लक्षांत राहिलं होतं. आम्ही सर्व लहानपणाचे संवगडी. माझे पती आणि मी मिळून पूजेसाठी कितीदा तरी फुलं गोळा केली होती. या आळीतून त्या आळीत फुलं गोळा करीत आम्ही फिरलो होतो. विवेकानंदांच्या घरी स्थलपद्म (जमिनीवर येणारी कमळं) चांगली मोठमोठाली होती. ते झोपेतून उठून फुलं काढून परडीत ठेवायला यायचे. त्यांचे टपोरे डोळे, खरोखर अगदी कमलिनीच्या पाकळ्याच जणू ! फारच सुंदर ! आम्ही एकमेकांच्या किती खोड्या काढल्या होत्या. लग्नानंतर नवीन सून पाहायला आले तेव्हा माझा घुंघट बाजूला

करून, आंबाडा हालवून ते म्हणाले, " अरे, तू आलीसच का शेवटी यांचा संसार करायला ? "

"माझं नावसुद्धा ठाकूरांनीच ठेवलं होतं. आधी माझं नाव होतं ' हाबी ' भावाचं नाव होतं 'हेबो' ठाकूर म्हणाले, " काकी, हे कसलं नाव ठेवलं मुलीचं ? "

आई म्हणाली, " मग तूच ठेव ना एखादं. "

ठाकूर म्हणाले, " तुमची ती कुसूम, नलिनी, कामिनी, मालती असली नावं मला ठेवता येणार नाहीत. मी नाव ठेवतो – 'भवतारिणी, दक्षिणेश्वर कालीचं हे नाव.' तेव्हापासून माझं नाव भवतारिणीच झालं. "

" माझे पती तेव्हा वयाने लहान होते, आताच्या मानाने लहानच म्हणायचे. वडील वारल्यावर मायलेकांनी मामाच्या घरी आश्रय घेतला होता. तेव्हापासूनच त्यांचं ठाकुरांकडं जाणं येणं होतं. अर्थात मामांच्या नकळत हे करावं लागे, मामांना हे कळलं असतं तर जीवच घेतला असता. ठाकुरांना तेव्हा कुणी ओळखलं नव्हतं, उलट लोक त्यांना बदनामच करायचे. ते म्हणत, लहान लहान मुलांना हा वेडा बिघडवून टाकतो. मामेसासरे माझ्या पतींना वरच्या खोलीत कोंडून ठेवीत. परंतु त्यांना ठाकुरांची ओढ किती होती ते पाहा. ते खिडकीचे लाकडी गज मोडून, आपलं धोतर टांगून त्याला धरून उतरून जात. आई-मामी एखाद्या दिवशी लपवा-लपवी करायच्या. पण एखाद्या दिवशी मारपीट, भांडाभांडी व्हायची. ठाकुरांसाठी त्यांनी किती मार खाल्ला असेल त्याची गणतीच नाही. एक दिवस काय झालं, मामांनी भाच्याला कुलूप लावून बंद करून ठेवलं, पण भाचा गज मोडून पळाला. नंतर दार उघडून मामांनी पाहिलं तर काय ? मुलगा आत नव्हता. त्या दिवशी मामा असे चिडले ! – ' आता काही उपाय नाही, मुलगा हातचा गेला. मामाच्या घरात मुलाला चांगलं वळण लागलं नाही, उडाणटप्पू झाला. असंच लोक म्हणणार ! आणि हेच ऐकायचं माझ्या नशिबी होतं ! ' रागानं, दु:खानं मामीला शाप देत ते म्हणाले, ' आज तू या मुलाला राख घालून भात नाही वाढलास तर तुझ्या वडिलांच्या तोंडात – ' मामांनी एका अभक्ष्य वस्तूचं नाव घेतलं.

" काय हा वडिलांना उद्देशून शाप ! मामींच्या डोळ्यांतून अश्रूंचे पूर लोटले, आई रडली. तिलासुद्धा काही कमी दु:ख झालं नव्हतं. तिच्याच मुलामुळं भाऊभावजयींच्या संसारात हा अनर्थ घडला होता. मामी काही खाईना, पिईना. आई जाऊन शेजारणी-पाजारणींना पकडायची, ' बायांनो तुम्ही तरी जाऊन सांगा. लोकांचीच ती विनवणी करीत होती. स्वत:हून सांगायला तिच्या मुलानं तिला तोंड कुठं ठेवलं होतं ?

" मुलाचासुद्धा पत्ता नव्हता, बराच उशीर झाला होता. अखेरीस मुलगा आला आणि तडक मामीकडे जाऊन दरडावून म्हणाला, ' मामी किती उशीर झाला. लवकर जेवायला वाढ. मी स्नान करून आलोच. '

" मामी काय करणार बिचारी ? भुकेल्या मुलाला जेवायला नाही वाढणार ? अन इकडं मामांचा शाप.

" मामींनी ताटात भातभाजी नेहमीप्रमाणे वाढून, लहानशी एक गोवरी जाळून अगदी संभाळून भाताच्या बाजूला ठेवली. अन ताट चांगलं नीट मांडून त्या चुली कडं तोंड फिरवून बसल्या.

" भाचा जेवायला बसला. ' मामी, ऐकतेस ना ? हे काय आणखी ? राख कशाला ताटात ? दिसली नाही वाटतं ? अन पाठ फिरवून काय बसलीस ? बोलणार नाहीस का ? आज झालंय तरी काय ? मामी – ? '

" मामींनी हूं केलं नाही की चू केलं नाही. दगडासारख्या अगदी स्तब्ध बसून राहिल्या.

" भाच्यानं जरा वेळ बडबड केली अन राख टाकून देऊन, तो जेवू लागला.

" तेव्हा मामी वळून बसल्या, त्या म्हणाल्या, ' बाबारे, आज तुझ्यामुळं माझ्या वडिलांच्या तोंडी अभक्ष्य पडायची वेळ आली. आता आणखी किती छळणार आहेस मला ? '

" भाच्यानं सर्व काही ऐकून घेतलं. आणि नंतर तो म्हणाला, ' बरं मामी, तू आता जेव. मी वचन देतो की यापुढं पुन्हा कधीही तिथं जाणार नाही. '

" मामी म्हणाल्या, ' ते शक्य नाही. त्यांनी शाप दिला आहे. तीन दिवस मी अन्नग्रहण करणार नाही. '

" भाचा जेवून खाऊन उठला. त्याला फार वाईट वाटत होतं. मामीला वचन दिलं होतं, उद्यापासून जाणार नाही म्हणून. त्याला वाटलं शेवटचं एकदा फिरून यावं, विचार करता करता तो निघून गेला. तो जेव्हा परत आला तेव्हा मामींनी विचारलं. ' पुन्हा जाणार नाहीस ना ?'

" भाचा म्हणाला, ' नाही मामी. "

" त्यांना सांगून आलास का हे ? "

" हो, सर्व काही नीट सांगितलंय ? "

" ते काय म्हणाले ? "

" काहीच नाही. फक्त मी निघताना त्यांनी विचारलं, कायरे, तुमच्या घरी देव आहेत ? "

" मी सांगितलं., ' हो गोपीनाथाची मूर्ती आहे. ' आनंदित होऊन त्यांनी विचारलं, ' प्रसाद होतो कारे ? ' मी म्हटलं, ' हो. ' ते म्हणाले, ' एक दिवस मला प्रसाद देशील ? फार खावासा वाटतो. '

" हे ऐकून मामींचा जीव खालीवर होऊ लागला.

" ठाकुरांचा युक्तिवाद कळला ना तुम्हांला ? जेवायला घालायला बायकांना कुणी सापडलं की त्यांना दुसरं काही नको असतं ना ?

" मामींनी विचारले, ' तर मग तू काय सांगून आलास ? '

' काहीच सांगितलं नाही; निघून आलो. '

' असं कसं होईल ? प्रसाद खायला मागितला, उद्या सकाळीच मी स्वयंपाक करीन, तू त्यांना प्रसाद नेऊन दे. '

" भाचा म्हणाला, ' मी तर वचन दिलंय, पुन्हा जाणार नाही म्हणून. '

" मामी प्रेमानं म्हणाल्या, " अरे वेड्या, प्रसाद घेऊन जाण्यात काही पाप नाही. मीच तर सांगतेय ना तुला जायला. '

" दुसऱ्या दिवशी पहाट झाली नाही तोच मामी उठल्या आणि इतर कामं उरकून स्वयंपाकाला लागल्या. खेडेगावचा स्वयंपाक निराळाच असतो. कालिया[1], कुर्मा असं काही नसतं, केळफुलाची भाजी, भजी, रस्सा, पायस असा सर्व स्वयंपाक मामींनी केला, मामींच्या हातचा स्वयंपाक गावात सर्वांना माहीत होता. सर्व नीटनेटकं ठेवून मामींनी पुजाऱ्याला घाई केली – 'आज जरा लवकर आटपा; गोपीनाथला नैवेद्य दाखवा. '

" शेवटी तो प्रसादाचा भात – खेड्यांतले लोक भातच जास्त खातात माहीत असेलच – खूपसा पितळी तसराळ्यांत गरम राहावा म्हणून दाबून दाबून घातला आणि त्यावर वाट्यांमध्ये भाज्या घातल्या, खीर घातली, वरून केळ्याचे पान झाकले आणि एका पंच्यात तसराळं चांगलं व्यवस्थित बांधून भाच्याच्या हातात दिलं. त्या म्हणाल्या, ' पाय उचल आणि लवकर जा, ठाकूरांना प्रसाद वाढून ये, आणि हे पैसे घे काही गाडीभाड्यासाठी लागले तर ! बघ वाटेत उशीर करू नकोस. '

" घाईगर्दी करून मामींनी अखेर भाच्याला पाठवून दिलं, जणू काही त्यांनाच

१. टीप :– मांसाहारी मसालेदार रस्सा.

जास्त गरज होती. भाचा गेल्यावर केव्हा परत येतो ते पाहायला मामी उगीच आतबाहेर करीत होत्या.

" तिकडे ठाकूर अगदी जेवायला बसणार एवढ्यात माझे पति प्रसाद घेऊन तिथं हजर झाले. ठाकूर काय खूष ! अरे वा ! छान वेळेवर आलास, पाहू, पाहू काय आणलंस. आः काय सुवास आहे स्वयंपाकाचा ! जे कोणी जवळ होते त्यांना ठाकु-रांनी स्वतःच्या हातांनी प्रसाद वाटला. स्वतःही खाल्ला, ते प्रत्येक पदार्थ खात होते आणि म्हणत होते ' पाहिलंत ? काय छान स्वाद आहे ! पूर्वी कधीही असं खाल्लं नाही. खीर तरी काय मस्त झाली आहे ! ' पानांतलं सगळं त्यांनी चाटून पुसून खाऊन टाकलं. ते सारखे म्हणत होते, ' अमृत खाल्लं आज. अरे, गोपीनाथला आज खरो-खरच नैवेद्य झाला. म्हणूनच त्याची ही चव आहे. '

" इकडं मामा शोधीत होते. 'अमूक' कुठं आहे ?" आई–मामींनी उडवाउडवी केली, ' इथंच तर होता, येईलच इतक्यात '

" संध्याकाळी भाचा परत येताच मामी धावत गेल्या–' काय रे प्रसाद देऊन आलास ? काय म्हणाले ?'

' ते म्हणाले, तुमच्या गोपीनाथला खरोखरच नैवेद्य झाला, अमृत खाल्लं मी ! मामी, काय खूष झाले ते ! चाटून पुसून सर्व खाल्लं आणि म्हणाले, असा स्वयंपाक कधी जेवलो नव्हतो. '

" आता जाणार कुठं ? स्वैंपाक चांगला म्हणाले, बाईमाणसाचं मन एकदम विर-घळलं, नणंद-भावजया लपवून छपवून मुलाच्या हातून रोज प्रसाद पाठवायला लागल्या. वर आणखी दोनचार पैसे नावेच्या भाड्यासाठी, गाडी-भाड्यासाठी देत होत्या. जायला जायला मुलाला त्रास नको. एखाद्या दिवशी मुलगा बिथरायचा. म्हणायचा रोज रोज घेऊन जायला मला जमणार नाही. त्या वेळी आई–मामी त्याला विनवीत–' अरे आजचा दिवस जा बेटा. तू शहाणा आहेस ना ? आज मालपुआचा नैवेद्य दाखवला आहे. ' आज काय खव्याचा लाडू, आज पोह्याची भजी, आज बटाट्याच्या वड्या, रोज काही ना काही असेच चालले होते.

" ठाकुरांचा महिमा हा असा होता ! नुसतं खायचं पाठवून समाधान नव्हतं. शेवटी त्याच स्वतः जायला लागल्या.

" मी सून ! मीसुद्धा घुंघट ओढून त्यांच्याबरोबर जायची. ठाकुरांना दुधाची साय खायला दिली होती मी.

"त्या वेळी ठाकूर काशीपूरला आजारी होते. त्यांच्या गळयाला जखम झाली होती. काहीच खाता येत नव्हतं.

त्यांनी साय खायला मागितली, एकानं आणून दिली. बोटांनी चाचपून ठाकुरांनी ती बाजूला काढून ठेवली. कडक साय होती ती. खाताना घशाला लागणार, मी ते पाहिलं. घरी येऊन सासूबाईंना विचारलं, 'एक दिवस ठाकुरांसाठी साय घेऊन जाऊ? सासूबाईंनी संमती दिली. गरिबीचा संसार. दूध तरी ते किती, अर्धा शेर नाही तर तीन पाव. तेच चुलीवर ठेवलं. उकळी आल्याबरोबर खाली उतरवून वरचा फेस काढून घेतला. मला आठवण होती त्या दिवशी सासूबाई म्हणाल्या होत्या, 'अरेरे, साय घट्ट होती म्हणून ठाकुरांना खाता आली नाही.'

"माझी एक हिरव्या रंगाची काचेची वाटी होती. 'बेलोयारी चुडी' म्हणून ते ओरडत जातात ना, त्यांच्याकडून ती मी चार आण्यांना विकत घेतली होती. वाटी अजूनही आहे. हं, तर त्या वाटीत साय घेतली आणि आहिरी टोल्याच्या मा शीत-लाच्या प्रसादाची थोडी लाल साखर –इतकीशी होती घरात– ती कागदात पुडी बांधून घेतली. डाव्या हातात वाटी घेऊन, उजव्या हातानं अशी झाकून घेऊन सासू-बाईंबरोबर घोडयाच्या गाडीत बसून ठाकूरांकडे गेले.

"ठाकूर तक्तपोसावर झोपले होते. आजानुबाहू, म्हणून जे म्हणतात, तसेच होते त्यांचे बाहू. विशाल वक्ष. फोटो पाहता ते काहीच नाहीत. पांढरा अभ्रा घातलेल्या तक्क्याला टेकून अर्धवट बसल्यासारखे ते एका कुशीवर पडले होते. शेजारी आणखी एक तक्क्या होता. मी गेले आणि अगदी लाडात येऊन त्यांच्याजवळ बसले. पहा. विस्तवात हात घातला म्हणजे इच्छा असली तरी भाजतो, इच्छा नसली तरी भाजतो. मी हात पोळून घेतला होता. भक्तबिक्ती काही कळत नव्हतं तेव्हा. लाडात येता आलं म्हणजेच मी विरघळून जायची. तर तसं ठाकुरांच्या जवळ बसून, घुंघट घेऊनच मी म्हणाले, 'आपल्यासाठी थोडी साय आणली आहे.' हे ऐकून तक्क्या बाजूला करून ठाकूर उठून बसले. घशाला जखम होती. बोलताही येत नव्हतं त्यांना. डॉक्टरांनीही बोलायला मनाई केली होती.'

"हात पुढे करून वाटी त्यांच्यासमोर धरली. साखर दाखवून त्यांना विचारलं, 'हा मा शीतलाचा प्रसाद.' पुन्हा ओठ काढून म्हटलं, 'साखर काळी आहे.' ठाकुरांनी साखर हातात घेतली. अन त्यातला कण अन् कण तिथे होते त्या सर्वांच्या हातात दिला. शेवटी कागदाला जी लागलेली होती ती सायीवर टाकून दोन बोटांनी सर्व साय खाल्ली. खाऊन झाल्यावर त्यांनी खूण करून थोडं पाणी मागितलं. वाटीत

थोडं पाणी घालून धुऊन तेमुद्धा त्यांनी पिऊन टाकलं.

" आता सारखं वाटतं, पुन्हा पुन्हा का घेऊन गेले नाही ? पुन्हा का खायला दिली नाही ? सून मी, लाज वाटली पुन्हा घरात सांगायला. त्या फक्त एकाच वेळेला त्यांनी माझ्या हातून साय खाल्ली. तेव्हा जरा दुखावलेच मी–साय खाल्ली पण बरं वाईट काहीच बोलले नाहीत. मी तसं कसं सोडणार ? शाबासकी मिळवायला हवी ना ? मान पुढं करून हळूच फुमफुम करून मी म्हटलं, ' साय कोवळी होती. ' पक्की आणि कोवळी काय कळत होतं मला ? पण तेव्हा सासूबाई म्हणाल्या होत्या, –' अरेरे, साय पक्की होती '– म्हणून मी माझ्या नरम सायीला कोवळी साय म्हटलं आणि त्यांना तेच मुद्दाम सांगितलं– कोवळी साय.

ठाकूर हसले आणि उजवा हात सावकाश उचलून माझ्या पाठीवर ठेवीत म्हणाले, ' पण तू तर पक्की आहेस. '

' माझ्या आनंदाला पारावार उरला नाही. '

मी विचारलं, " ठाकुरांकडूनच आपण दीक्षा घेतली का ? "

" दीक्षा बीक्षा मला कळत नाही. एक दिवस गेले अन म्हणाले, ' आज मंत्र घेणार. ' ठाकूर म्हणाले, ' माझ्याजवळ हिडिम्, विडिम्, मिडिम् तसलं काही नाही. हरेकृष्ण म्हणत जा. ' अन माझ्या पतीचे नाव घेऊन म्हणाले, ' अमूक जे सांगेल ते शिकून घे. ही झाली माझी दीक्षा, हे नामच माझ्या जीवनात सारसर्वस्व आहे.

" ठाकुरांच्या पुस्तकात वाचलं नाहीत ? माझ्या पतींच्या पायाला सर्पदंश झाला होता. ठाकुरांचं शव खांद्यावर घेऊन काही जण जात होते. त्यात माझे पतीही होते. ते जात होते तेव्हाच त्यांच्या पायाला सर्पदंश झाला. सर्व ओरडायला लागले. माझ्या पतींना देववाणी ऐकू आली, सापाला मारू नकोस; आजपासून तुझं भाग्य उदयाला येईल. सर्वजण काही ना काही घेऊन पाय बांधू पहात होते. परंतु माझ्या पतींनी खांद्यावरची तिरडी सोडली नाही.

" इकडं घरी सगळा हलकल्लोळ माजला होता. सर्पदंश झाला म्हणून बातमी आली होती. रडारड सुरू झाली. पती परत आले. बरोबरच्या लोकांनी सांगितलं, ' त्यांना जेवायला देऊ नका. ' पती म्हणाले, ' भूक लागली आहे, आधी जेवायला वाढा. ' आई, मामी हाहाकार करू लागल्या. त्या दिवशी घरात सत्यनारायणाची पूजा झाली होती. खोलीत एका कोपऱ्यात प्रसाद झाकून ठेवला होता. पती स्वतः गेले आणि झाकण काढून मालपुआ, ताडाचे वडे, त्यांनी पोट भरून खाल्ले आणि

दार लावून झोपले. काय होणार या काळजीने सर्व अस्वस्थ होते. चांगली झोप काढून हसत हसत पती बाहेर आले."

"तर आता पाहा आई, फार रात्र झाली. जी गाणी लिहून घेतलीत ती माझ्या सुरात सूर मिसळून एकदा माझ्याबरोबर गा पाहू. हृद्पद्मासनी त्यांना आधी बसवायचं नंतर आवाहन करायचं–

**" आई, अंतरी मम तू जागृत होई**
**जागृत होई गे कुलकुंडलिनी–**
**अंतर ना वेशी दिव्ययामिनी**
**ये मम मानसमंदिरी–"**

दुसऱ्यांदा म्हणा – **" ये मम मानसमंदिरी तारा गे–"**
आणि नंतर म्हणा, " श्यामा गे,

**ये मानसमंदिरी काली गे,**
**पूजितो तुजसी रात्रंदिनी,**
**जन्म सफल करी गे जननी."**

" मस्त गाणं आहे. लिहून मागितलंस म्हणून तेच सांगितलं. मी माझी पूजा गाणं म्हणूनच करते. गाण्याच्या सुरांमुळे जो एक भक्तिभाव मनात सहज जागृत होतो, तसा इतर कशानेही होत नाही. किती गाणी लिहिणार ? विसरून जाते मी ओळी. मनात भाव आला म्हणजे आपोआपच शब्द फुटतात. म्हणून लिहून ठेवायची गरज कधी वाटली नाही.

एकदा काय झालं, नातवाचं लग्न होतं. काव्यामध्ये आशीर्वाद लिहायचा होता. सर्व वाद घालायला लागले तेव्हा मुलगा म्हणाला. तुम्ही काय लिहिणार ? आईला पकडा, आई लिहून देईल. जाऊ द्या त्या गोष्टी म्हणा–

**" विहर मा सदा रंगे। षट्चक्र शिवसंगे ।।**
**अनिवार करुणा तव । याचितसे भवतारिणी ।।**

" भवतारिणी हे तर माझं नाव. तुम्ही गाल तेव्हा म्हणा– " याचितसे ही अधमा–
**जाग जाग जाग मम माते तू ।।**

" गाण्यासारखी दुसरी गोष्ट नाही. वेळ मिळाला की आपल्या मनाशीच गाणं म्हणावं. शेवटची ओळ काय लिहिलीत ?

**" चिरशांती लाभो ही आस ।**
**शोकातुर भवतारिणी धरिते तव कास ।।"**

" इथं लिहा, ' तनया ' अगोदरच्या ओळीत लिहिलं होतं ' ही अधमा ' एकच एक पुन्हा पुन्हा कानाला बरं वाटत नाही, आता म्हणा–

शोकातुरा तनया विहरे
मा श्यामाच्या चरण-स्थली
सच्चिदानंद पारावार
जाग, जाग, जाग मम माते तू '

" यासाठीच मी आई होते. मधूनच एक वादळ आलं अन मला काष्ठमय करून गेलं. "

वसुमती-मांच्या तंबूतून बाहेर पडून आमच्या तंबूकडे येत असताना अचानक चारी दिशा कंपायमान करीत वीज कडाडली.

काशीतली पहिली सकाळ. सेवाश्रमचा पंडचा 'श्रीपंडचा' याच्यासाठी थांबलो होतो. असे ठरले होते की तो येऊन आम्हांला घेऊन जाईल. काशीच्या गंगेत बुडी मारून विश्वनाथाचे दर्शन घेऊन मग दुसरी कामे करणार होतो. आक्काची हौस होती. इतके सगळे झालेच आहे तर परत जाताना वाटेत काशीला उतरून शिवाला दोन फुले बेलपत्री वाहून मगच पुढे जावे. आशुतोष, तो सदाच तुष्ट; त्याला प्रसन्न करायला आणखी काय लागतं. एक धोत्र्याचे फूल आणि एक ओंजळभर गंगाजल, बस.

पहाट झाली नाही तोच भोलामामा येऊन हजर झाला. आश्रमातील कुठचे घर केव्हा विकत घेतले होते; सध्याच्या प्रेसिडेंटपेक्षा अगोदरचा प्रेसिडेंट किती चांगला होता. गवळ्याची गाय किती दूध देते, तो प्रचंड काळा रेडा नुकताच विकत घेतलाय, वाटेतच तो बांधून ठेवला होता, तो आम्ही पाहिला की नाही इत्यादी असंख्य प्रश्न एकाच सपाट्यात तो विचारीत होता आणि स्वतःच उत्तरे देत होता. एके काळी भोलामामा बागकाम फार चांगले करीत असे. आसाम ॲग्रिकल्चरल डिपार्टमेंटमध्ये त्यांच्यासारखा कलम करणारा दुसरा कोणी नव्हता. आक्कांनी सांगितले, " मध्यंतरी भोलामामा बराच आजारी होता. बाबांनी पुष्कळ पैसा खर्च करून औधधोपचार केले. अचानक एक दिवस भोलामामा बेपत्ता झाला. किती शोधाशोध केली पण पत्ता लागला नाही. आम्ही सर्वांनीच आशा सोडून दिली होती. तो आता हयात नाही असंच धरून चाललो होतो आणि आता इतक्या वर्षांनंतर काल अकस्मात भेट झाली."

काल आम्ही इथे आलो आणि ऑफिसमध्ये प्रेसिडेंटबरोबर बोलत होतो. तेव्हा मी पाहिले आक्का अचानक विमनस्क होऊन कपाळाला आठ्या घालून त्या तिकडे कोपऱ्यात, धुळीने भरलेली पुस्तके उचलून कपाटात ठेवणाऱ्या त्या माणसाकडे

पाहू लागल्या होत्या. बराच वेळ पाहून झाल्यावर आक्का त्याच्याकडे गेल्या आणि म्हणाल्या, " भोलामामा, तू इथं. मला ओळखलं नाहीस ? मी हिरण."

म्हाताऱ्याने मान हलवली, " हं, हं, ओळखलं नव्हतं, पण आता ओळखलं, तू माझी आई. "

भोलामामा म्हणजे आजेसासऱ्याच्या कारकुनाचा दासीपुत्र. आक्का त्यांच्या फार लाडक्या होत्या. अगदी मुलीसारख्या. लग्न, घरसंसार त्याने कधीच केले नाही. घरच्या मुलाबाळांचे लाड, जबाबदारी यातच त्याने आयुष्य घालवले.

आक्कांनी विचारले, " भोलामामा, खरंच का तू आम्हांला विसरलास? इथं कसा आलास ?"

भोलामामाने सांगितले, " आसामहून चट्टग्रामला जाऊन दोन वर्षे राहिलो, त्यानंतर इथं आलो. आगगाडीत ताप आला. बेशुद्ध झालो. शुद्धीवर आल्यावर पाहतो तो यांच्या हॉस्पिटलमध्ये होतो. बरा झाल्यावर म्हटलं, आणखी कुठं जाणार. इथंच राहावं. या लोकांनी ऑफिसमध्ये काम दिलं. पत्र नेण्याआणण्याचं काम करतो, टेलिफोन्स घेतो, दोन वेळा जेवतो, दिवस निघून जातो."

गगनमहाराज म्हणाले, " याचं वय झालं म्हणून काय झालं, अजून अंगात जोर आहे ! आणि खूप विश्वासूही आहे. "

आम्ही तयारच होतो. पंड्या आल्याबरोबर बाहेर पडलोच.

" दशाश्वमेध घाट तर हाताशीच आहे. वाटेत जाऊन स्नान करता येईल. आज मणिकर्णिकेच्या घाटावर जाऊ या. काय म्हणता ? " असे म्हणून दादांनी आक्कांकडे पाहिले.

हा घाट नाही तो घाट यांसारख्या क्षुल्लक गोष्टीसाठी, आक्का स्वतःच्या म्हणण्याला महत्त्व देत नाहीत. दादांच्या म्हणण्याप्रमाणेच त्या निघाल्या.

ही गल्ली ती गल्ली, बसलेले रेडे, चालणारे रेडे,चिखल, पाणी, थुंकलेली पानाची पिचकारी,या सर्व गोष्टी टाळीत टाळीत चालताना जीव जायची पाळी आली. उगीच वाटायचे, आता संपले वाटते, पण पाहावे तर पुन्हा एक गल्ली आहेच.

मी म्हणाले, " अहो पंड्याबाबा, परत जाताना मात्र या रस्त्यानं नको."

पंड्याला समजले नाही–" का ?" तो वळून उभा राहिला.

मी म्हणाले, " स्नान करून विश्वनाथाच्या दर्शनाला जाणार, जरा स्वच्छ रस्त्यानं गेलं तर बरं नाही का होणार ?

पंड्या म्हणाला, " या रस्त्यापेक्षा चांगला रस्ता तुम्हांला काशीत कुठं मिळणार ?

" जाऊ दे, माझं काय ? पायाखाली घाण आली तर त्याच पायांनी मंदिरात जाईन." मी मनातल्या मनात कुरकुरत होते.

वाटेत विशालाक्षीचे मंदिर लागले, पंड्या म्हणाला, " पाहून घ्या. इथं सती पार्वतीचे डोळे पडले होते म्हणून हे विशालाक्षीचे मंदिर ? हे एक पीठस्थान आहे. (५१ पीठांपैकी एक)

लहानशा दरवाज्याने आत गेलो. गल्ली, घर, मंदिर सगळीकडे अंधार, अरुंद काळोख्या बोळासारखे. इकडेतिकडे पाहायला वेळ नव्हता. घाईघाईने आत शिरायचे, समोर जे दिसेल ते पाहायचे. शक्य झाले तर चिखल-पाण्याने भरलेल्या जमिनीवरून एक दोन पावले जपून टाकीत पुढे जाऊन पटकन एक प्रणाम करायचा.

विशालाक्षीच्या शेजारी महालक्ष्मी आणि तिच्या बाजूला नवग्रह. एकदाची कशीबशी चक्कर मारून बाहेर आले. उभे राहण्याची सोय नव्हती. प्रातःस्नानानंतर मंत्र म्हणत देवीला प्रदक्षिणा घालण्यात ब्राह्मण पंडित व्यग्र होते. मूर्तीच्या समोर जरा थांबलो तर लगेच टाळी वाजवून हाताच्या इशाऱ्यानेच बाजूला व्हायला सांगायचे. नाहीतर त्यांच्या प्रदक्षिणेची वाट अडवली जाते ना !

बेचैन होऊन मी बाहेर आले. पंड्या म्हणाला, " काय, विशालाक्षी पाहिलीत ना ? या रस्त्यानं आलो नसतो तर मंदिर पहायला मिळालं असतं का ?"

मणिकर्णिका घाटावर आलो. कशी अगदी विचित्र घाण येत होती. कशाची होती ते लगेच लक्षात आले.

दादा म्हणाले, " पुढं चला, महास्मशान पाहून येऊ."

दादा पुढे झाले, मी एक पाऊल पुढे जायची, दोन पावले मागे व्हायची. इकडे तिकडे पाहायची, मागेपुढे करायची, कळत नव्हते काय करावे ते.

तेवढ्यात दादा आणि आक्का कठडा असलेल्या जागेसमोर जाऊन पोचले होते. खालून वर्तुळाकार धूर उठत होता. आगीच्या ज्वाळा उन्हामध्ये धगधगत होत्या, त्या प्रखर अग्निशिखांमधून काय पाहण्यासाठी कठड्यावरून लोक वाकले होते ?

उघड्या अंगांनी तिथे बसून काही मुले खेळत होती. त्यांचे इकडे तिकडे मुळीच लक्ष नव्हते. गुडघ्यावर चापटी मारून ती टाळ्या वाजवायची आणि खदखदून हसायची.

'काय पाहायचं, कसं पाहायचं' या धसक्याने मन कुंठित होत होते. ते साध्या मुलांचा खेळ पाहून शरमिंधे होऊन एका धक्क्यानिशी समोर गेले. डोळे उघडून नीट पाहिले – खाली गंगेच्या घाटावर महास्मशानांतील अग्नी धाडधाड

जळत होता – डोक्याची बाजू जळलेल्या लाकडांनी, राखेने, धुराने मिसळून एकाकार झाली होती. पायाच्या बाजूला लाकडाच्या फटीतून दिसते ते काय ? आळता लावलेली पावले ! अरेरे, काय हे ! काठीच्या एका खोच्याने लाकडे उलटीपालटी केली गेली, चिडचिड आवाज करीत ठिणग्यांची फुलबाजी उडाली; धुराच्या वासाने नाक डोळे बंद झाले. पदरांत तोंड लपवून पळून आले तिथून.

रक्ताचा टिळा कपाळाला लावलेला एक तांत्रिक पुढे झाला आणि हातांतली कवटी पुढे करून म्हणाला, " हा संसार मिथ्या, मायेचं बंधन. मिथ्या, सर्व मिथ्या, फक्त महास्मशान सत्य. जाताना बरोबर काही जाणार नाही. भिक्षा वाढा खापरीत, हे एक पुण्यच फक्त बरोबर जाईल."

स्मशानाच्या डाव्या बाजूला स्नानाचा घाट. घाटावरच एका कडेला पांढऱ्या दगडाची दोन लहान लहान पावले.

पंड्या म्हणाला, " विष्णूनं इथं पन्नास हजार वर्ष तपस्या केली होती. अन हे जे कुंड पाहता, इथं विष्णूची कुंडल पडली होती. विष्णूच्या तपश्चर्येनं प्रसन्न होऊन महादेव म्हणाले, ' वारे मुला, छान तपस्या करतोस की. अन त्यांनी विष्णूला हलवलं, तेव्हा विष्णूच्या कानातली कुंडलं ओघळून इथं पडली. म्हणून या घाटाचं नाव ' मणिकर्णिका '. अन तपस्या करता करता विष्णूच्या अंगातून येणाऱ्या घामानं या कुंडाची उत्पत्ती झाली. बसा बसा. या फळीवर बसा, पुढचं सांगतो, ऐका."

घाटावर लाकडी फळ्या टाकून पंड्याने माचा बनवलेला होता. आणि त्याच्यावर पानांच्या मोठमोठ्या छत्र्या होत्या, सगळीकडं कडक ऊन पडलं होतं. थोडी सावली मिळाल्याबरोबर तिथंच बसलो.

पंड्या म्हणाला, " कपडे वगैरे सर्व ठेवा. नीट आरामात बसा."

त्याने सांगितल्याप्रमाणे आरामातच बसलो. पंड्याही येऊन आरामात बसला. आणखीही गोष्टी ऐकण्यासाठी मी त्याच्याकडे पाहिले. पंड्या म्हणाला, " हं, त्यानंतर हे जे कुंड पाहता – शिवाने दिलेल्या वरामुळे विष्णूने तर सर्व मागून घेतले – " इथं जो स्नान करील त्याला सर्व तीर्थस्नानाचं पुण्यफळ मिळेल. इथं स्नान करून मग गंगेत स्नान करायचं असतं. आता ब्राह्मणाला पंचरत्नं दान करून या कुंडात स्नान करा – जा. हे पाहा सर्व यात्री पंचरत्नं दान देत आहेत."

पायऱ्यावर रांगेरांगेने यात्रेकरू बसले होते. एक नारळ आणि एक कागदाची पुडी – पंचरत्नांची असणार बहुतेक – यात्रीच्या हाताला लावून मंत्र म्हणत होते व पैसे कनवटीला लावीत होते.

आक्का म्हणाल्या, " इथं आणलं आहेच, तर जे करायचं ते करा लवकर."

" पैसे किती लागतील ?"

" सव्वा रुपया. "

दादा, आक्का खाली उतरून गेले. कुजलेली फुले आणि बेलपानांनी हिरवे झालेले पाणी कुंडात साचले होते.

मी ओरडून म्हणाले, " थोडंसं पाणी आणून स्वतः तुम्हीच तुमच्या हातांनी माझ्या डोक्यावर शिंपडा, मला तेवढं पुरे."

पंचरत्ने दान न करता पुण्य वाटेला लावू, पण पंड्या ? घाटावरचा पंड्या म्हणाला, " घाटावर बसलात त्याबद्दल दक्षिणा द्या."

गंगेच्या घाटावर फळ्याफळ्यांवर छप्पर घालून पंड्यांनी पायऱ्या केल्या होत्या. छप्पर आणि छत्र्यांवर जागोजाग ठोकाठोकी चालली होती. सर्वच ओरडत होते. " इथं या, इथं कपडे ठेवा."

आता मात्र कुणाचेही ऐकले नाही. सर सर पुढे गेले. घाटाच्या अगदी शेवटाला, नियम गुंडाळून ठेवून साबण लावून कपडे धुऊन लोक स्नान करीत होते. इकडे तिकडे जरा नीट पाहून कोरड्या पायरीवर कपडे ठेवले आणि झपाझप दोन बुड्या मारून तीरावर निघून आले.

या घाटावरूनच वीरेश्वर मंदिराचा जिना पायऱ्यापायऱ्यांनी वर गेला होता.

पायऱ्या चढून जाता जाता आक्का म्हणाल्या, " या वीरेश्वरालाच नवस करून विवेकानंद त्याच्या आईला लाभले होते."

इथंही तेच. मंदिराच्या आतसुद्धा लहान लहान बोळ, लहान दरवाजे, त्यातल्याच एकाने आत शिरताच मागून पंड्या म्हणाला, " आता समोर जाऊन डाव्या हाताला जा. तिथे दिसेल वीरेश्वर."

अंधार गुडुप, थोडे थांबल्यावर मग दिसायला लागले, खोलीच्या जमिनीवरच बांधलेला एक छोटासा हौद स्नान करून आल्यावर गंगाजल इथे ओतून सर्व लोक आपापला कमंडलू रिकामा करतात. फुले आणि बेलपानांनी हौद गच्च भरलेला होता. ह्यामध्ये वीरेश्वर कुठे ? हात घालून पाणी हलवले, काहीतरी दगडासारखे हाताला लागले. हेच का ते वीरेश्वर ? ओला हात डोक्याला लावला; पाण्यातून मूठभर फुले काढून घेतली. कात्यायनी–वीरभद्रांला प्रदक्षिणा घालून बाहेरच्या उजेडात आले. मूठ उघडून पाहिली तर एक जुडी जंगली फुले.

संकटा देवीचे मंदिर शेजारीच होते. खुमूखुमू करून आक्कांनी दादांना अगो-

दरच सांगितले, " संकटादेवीच्या मंदिरात काही जास्त द्या."

मंदिराच्या दारात पाय ठेवताच मंत्राचा गुरुगंभीर आवाज ऐकू आला. देवीच्या समोर दर्भासन घालून ब्राह्मण पंडित ओळीने बसले होते. पानामागून पाने उलटून ते चण्डीपाठ करीत होते.

आक्का म्हणाल्या, " पाहा, पाहा, एकेका ब्राह्मणाचे काय रूप न रंग."

सोवळी नेसलेले, कपाळी शेंदराचा टिळा लावलेले ते ब्राह्मण. त्यांना पाहून आपो-आपच मान आदराने खाली होते.

मंदिरात शिरल्याबरोबर संकटादेवीचा डावा पाय प्रथम दृष्टीस पडतो. उजवा पाय फुलापानांनी झाकलेला, बाकी सर्व अंगाखांद्यांवर, हातांत, साडी, दागिने, हार घातलेले. चकचकणाऱ्या सोनेरी गालावर डुलणारी माणकांची नथ समईच्या उजे-डात स्वच्छ दिसत होती.

सुगंधी धुपाने, फुलांनी आणि मंत्रपठणांनी सगळी जागा कशी भारून गेली होती. तिथेच एका कोपऱ्यात शांतपणे बसून मंत्रपाठाचा सूर फक्त ऐकत राहावा असे वाटले.

विश्वनाथ मंदिराचे दार बंद होऊन जाईल. वेळ थोडा होता. आम्ही सर्वच भर-भर चालू लागलो. वाटेतच ओटी भरून फुलेपाने विकत घेतली होती.

जरा पुढे गेल्याबरोबर एकाएकी एका गर्दीच्या प्रवाहात सापडलो. आक्का आणि मी एकमेकींचे हात धरीत होतो, सोडीत होतो. गर्दीमध्ये लोकांच्या डोक्यांवरून हात पुढे करून एक दुसरीला धरू पाहात होतो, दुसऱ्याच क्षणी हरवीत होतो. जणू काही पाण्यात डुबकी मारता मारता डोके वर काढीत होतो, पुष्कळ गटा-गळ्या खाल्ल्यानंतर दोघींनी दोघींना पकडून ठेवले.

आक्कांनी विचारले, " ते कुठं आहेत ?"

मी म्हणाले, " मी पण तेच म्हणते कुठं आहेत ते ?" ' कुठं कुठं ' करीत पाहिले तर तेही ' त्या कुठं ', 'त्या कुठं ' असे विचारीत शोधीत आले आणि खप करून त्यांनी हात धरला.

पंड्या त्याचा जाडजूड देह सावरीत, सावरीत मंदिरात जाता जाता म्हणाला, " माझ्या कमरेला धरून एकामागून एक या."

एवढीशी जागा आणि अगणित लोक एकदम आत शिरू पाहात होते. जावं का ? लोकांची मारामारी, धक्काबुक्की, ढकलाढकली, भांडाभांडी सर्व कांही चालले होते—विश्वनाथाच्या समोरच एका उत्तर हिंदुस्थानी स्त्रीच्या लाल कुडत्याची बाहीच

गर्दीमध्ये नाहीशी झाली. ते पाहून गंगाजल भरलेला तांब्या तिने शेजारच्या माणसाच्या खांद्यावर रागाने जोरात मारला. शंकराच्या डोक्यावर घालायला आणलेले गंगाजल कुणाच्या डोक्यावर घातले याची तिला शुद्धच नव्हती.

मंदिरात शिरता आले नाही तर जसे काही पंड्याचेच जास्त नुकसान होणार होते. आतला एकंदर प्रकार पाहून तो त्याचे विशाल शरीर डावीकडे, उजवीकडे डोलवू लागला. त्याच्या या डोलण्याने क्षणात तिथे एक पोकळी तयार झाली. आक्का, दादा आणि मी त्यात शिरलो. क्षणार्धात पोकळी भरून गेली.

विश्वनाथाच्या डोक्यावर ओटी भरून आणलेली फुले घातली आणि मी बाहेर निघून आले. त्याच्या लठ्ठ दोन हातांनी आम्हांला जपून पुढे नेऊन पंड्या अंगणात उभा राहिला; तो म्हणाला, " हा पहा बाबाचा चांदीचा दरवाजा आणि हा पाहा वर सोन्याचा कळस."

बाबाच्या अगदी जवळच होते मा अन्नपूर्णेचे मंदिर. देवीचे मंदिर पाहून ज्या रस्त्यावर आलो त्या बोळानेच घरी परत निघालो. दगडाचे तुकडे टाकून बांधलेला रस्ता, दोन दगडांच्या मध्येमध्ये लहानशी फट, त्यांतल्याच एका फटीत पडले होते, पंख न फुटलेले, फिक्क्या पिवळ्या रंगाचे साळुंकीचे लहानसे पिल्लू. यात्रेकरूंच्या पायापायांनी चिरडलेल्या अंगावर दोन छोटे पाय आवळलेले होते. जणू काही दोन्ही हात जोडून छातीशी धरले होते.

दोन मजली घर, निस्तब्ध दुपारची वेळ, खिडकीजवळ तक्तपोसावर मी पडले होते. जुन्या चिंचेच्या आणि कडुनिंबाच्या काळ्या काळ्या फांद्यांनी आकाशावर जाळे विणले होते. कोवळ्या कोवळ्या पानांचे आजच भाताबरोबर निमवांग (कडुनिंब घातलेली वांग्याची भाजी) खाल्ले. म्हणजे उन्हाळा सुरू झाला तर.

उन्हाच्या तापाने कावळा ओरडत होता—काव, काव ऐकून घशाला कोरड पडत होती. दोन्ही डोळे मिटून बिछान्यात पडून राहिले. बेलाच्या झाडाच्या आडून घुबड ओरडत होते घू–घू , जिथे जायला नको म्हणून प्रयत्न करीत होते तिथेच मनाची धाव गेली.

बंद केलेले डोळे उघडले. हिरव्या कोवळ्या पानांवर उन्हाची किरणे पडली होती. जणू स्वप्नांतले चित्रच डोळ्यांसमोर साकार झाले होते.

ओले कपडे उन्हामध्ये उलटेपालटे करून वाळवून, घड्या करून आक्का घरात

आणीत, होत्या. तांब्यात, खुज्यात पाणी भरून ठेवीत होत्या. निरनिराळ्या देवींचा प्रसाद म्हणून मिळालेली फुले पाने वर्तमानपत्रांच्या कागदावर पसरून व्हरांड्यातल्या संध्याकाळच्या उन्हात सरकवून ठेवीत होत्या. गावी परत गेल्यावर सर्वांना थोडी थोडी द्यायची होती. वाळवून नाही नेली तर इतक्या दिवसांत कुजून जातील. आक्कांच्या कामाला अंत नव्हता. कुठून कुठून त्या काम काढतात. त्या म्हणतात, " त्याशिवाय माझा वेळच जात नाही."

दादा म्हणाले, " चला तयार व्हा. केदारेश्वर पाहून येऊ."

अगदी घड्याळ पाहून दादा चालत. म्हणून इकडे तिकडे व्हायचे नाही. हिंडता फिरताना सात वाजून दहा मिनिटांनी परत यायचे ठरले असले तर सात वाजून आठ मिनिटालाच ते परत येणार. ते म्हणत, " उशीर करण्यापेक्षा दोन मिनिटे आधी आलेले बरे."

ज्ञानमहाराजांच्या आईंनी सांगितले होते, " दोन रिक्षा करून जा. सहा सहा आणे म्हणजे बारा आणे लागतील." त्या थोड्या वेळापूर्वीच आल्या होत्या. अनोळखी माणूस, पहिल्यानं मी ओळखलं नाही. ज्ञानमहाराज म्हणाले होते, " काशीला जाता, माझ्या आईला भेटा." सकाळी त्यांच्या घरी गेलो तर भेट झाली नाही. त्या मंदिरात गेल्या होत्या. म्हणून दुपारी त्या स्वतःच आल्या.

मी म्हटले, " ज्ञानमहाराजांची आई म्हटल्यावर असं वाटलं होतं की डोक्यावरच्या पिकलेल्या केसात शेंदूर फासलेली अशी एखादी ठुसठुशित म्हातारी असेल.

त्यांनी हसून विचारलं, " आणि आता काय वाटतं ?"

" आता माझीच धाकटी बहीण असल्यासारखं वाटतं."

सुंदर हसतमुख महिला. सेवाश्रमच्या जवळच राहातात. ज्ञानमहाराज त्यांना 'मा' म्हणतात. पुष्कळ वेळ बसून आमच्याशी गप्पागोष्टी करून त्या गेल्या. त्यांनीच सांगितले, " केदारेश्वर पाहून तसंच तिळ-भांडेश्वरदेखील पाहून या. जवळजवळच आहेत."

परंतु रिक्शावाले अनोळखी माणसांना ओळखतात. " ए रिक्षावाला, केदारेश्वर जायेगा ? कितना लेगा ? " हे ऐकल्याबरोबर ते म्हणतात, " अढाई रुपिया."

पुष्कळ त्रासानंतर एक कॉनव्हॉय पार केल्यानंतर दोन रिक्शांबरोबर समझोता झाला. केदारेश्वरला गेलो. इथंही एक आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे. दुरून मंदिराचा कळस दिसेल असे वाटते. पण तसं होत नाही. गल्ल्यांमधून जाता जाता एकदम एका दरवाज्याशी रिक्शा थांबली. तो म्हणाला, " मंदिर आ गया."

डोके खाली वाकवून आत शिरलो. अंधाऱ्या निसरड्या वाटेने पुढे गेलो, आणखी जास्तच अंधारात पुढे सरकलो, डोके जास्तच खाली वाकवले, तेव्हा कुठे दिसला केदारेश्वर ओबडधोबड गोल दगड जमिनीत बसवलेला गिरिगोवर्धनासारखा, शिवलिंग जसे दगडावर खोदून केलेले असते तसे हे नव्हते–हे नैसर्गिक होते.

केदारेश्वरावरची फुले, बेलपत्री बाजूला करून पंड्या म्हणाला, "हे पाहा, ही जो वरखाली जागा आहे, इथं गौरी आहे, हर आणि गौरी." असे म्हणून त्याने माझा हात ओढला आणि केदारेश्वराच्या डोक्यावर घासला. शेवाळाने निसरडा झालेला दगड. काही कळले नाही. कप्पाळसुद्धा.

पंड्या म्हणाला, "एकदा या केदारेश्वराला आलं तर अठरा वेळा बदरीकेदारला गेल्याचं फळ मिळतं."

धाईधाईने दादांनी केदारेश्वराला स्पर्श केला आणि ते म्हणाले, "एकदा तरी बदरीकेदारला जातो की नाही, कुणास ठाऊक ? एका दमात अठरा वेळा गेल्याचं फळ तरी पदरी पाडून घेऊ देत."

तेवढ्यात पंड्या आक्कांच्या मागे हात धुवून लागला, "मा, बाबूना सांगा, केदारेश्वराला अडीच रुपयांचा प्रसाद द्यायला." दादा हसले. ते म्हणाले, "काय आश्चर्य पाहा, मी बायकोचा आज्ञाधारक आहे हे पंड्यानंसुद्धा ओळखलं." आक्कांच्या हातांत पैसे देऊन ते तिथून बाहेर पडले.

"अहो, बाबू, बाबू, देवीचा साजशृंगार तर पाहून जा." दुसरा एक पंड्या मागे धावत गेला.

सर्व काही पहाण्याची कुतूहली वृत्ती असल्यामुळे मन तिथंच थबकलं. लाकडी दरवाज्यांच्या भोकातून पंड्या दाखवीत होता, "हे पाहा."

खोलीच्या आत लांब अंतरावर या प्रांताचा पुजारी गौरीला साडी नेसवीत होता. गुलाबी रंगाची सुती साडी, निऱ्या खोवून पदर नीट चापून चोपून बसवून कमरेला चांदीचा कमरपट्टा घातला, हार घातला, चंदन लावले. संध्यारतीच्या अगोदरचे प्रसाधन पूर्ण झाले होते.

पंड्या म्हणाला, "वा, हे काय असं ? निघालात की ! देवीचा शृंगार म्हणजे अशी बघण्यासारखी गोष्ट, ती मी दाखवली, चांगली दक्षिणा द्या."

तिळ-भांडेश्वरला मात्र ही काही पीडा नव्हती. केदारेश्वराहून इथे आल्यामुळे मनाला जास्तच आराम वाटला.

तिळ-भांडेश्वर प्रचंड होते, खोलीत जणू काही पांढरी जमीन व्यापून एक काळे

घुमट होते. त्याला साज चढवून झाला होता. लाल, पिवळ्या, पांढऱ्या फुलांच्या मांडणीमध्ये हिरव्या बेलपत्रीची कौशल्यपूर्ण ओळींची रचना किती सुंदर दिसत होती–गुळगुळित केलेल्या काळ्या दगडावर मध्यभागी रुद्राक्षांची माळ गोलाकार ठेवली होती. जणू काही डोक्यावर बांधलेल्या जटाच.

पुजारी आरतीच्या आधी पांढऱ्या दगडाची जमीन धुवून पुसून स्वच्छ करीत होता. आत देवाच्या खोलीत जायला परवानगी नव्हती आणि जायला मनही करीत नव्हते – इतके मंगल स्वच्छ होते तिथे !

दरवाज्याजवळ बसल्या बसल्या मला आठवत होत्या – अवनींद्रनाथांनी त्यांच्या कत्थक गुरूंचे वर्णन करून सांगितलेल्या गोष्टी, – "काळे कुळकुळित शरीर, गुरूजी पठण करायला बसायचे तेव्हा अगदी तिळ-भांडेश्वर वाटायचे." त्या वेळी नाव ऐकले होते. आज प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले.

तिळ-भांडेश्वरांनी सर्वांच्या मनांत प्रसन्नता आणली. म्हणून आज विश्वनाथाची आरती पाहावीच असे ठरवले. अजूनही अवकाश होता. जाऊन पोचता येईल, विश्वनाथाची आरती म्हणे बघण्यासारखी असते.

आक्का म्हणाल्या, "मागच्या वेळेस आलो होतो तेव्हा लोकांच्या डोक्यांवरून डोकावून, वाकून पाहिली होती. आरती अशी किती दिसली,– पण तरीसुद्धा किती सुंदर !"

श्रीपंड्या हा खरा आमचा पंड्या. त्याला आक्कांनी पकडले. "पंड्या गुरुजी, आज आम्हांला विश्वनाथबाबांची आरती दाखवली पाहिजे."

पंड्या म्हणाला, "हो, हो, मीच तर दाखवणार, मी नाही दाखवली तर कोण दाखवणार ? या माझ्याबरोबर."

पंड्या आम्हांला घेऊन गेला आणि विश्वनाथमंदिराच्या चार दरवाज्यांपैकी एका दरवाज्यापाशी त्याने आम्हांला बसवले. तो म्हणाला, "इथं बसून राहा, इकडं तिकडं हिंडू फिरू नका, दुसरे लोक जागा पटकावतील."

सबंध दिवसभराच्या पाण्याने, चिखलाने भरलेले विश्वनाथाचे देवघर, गर्दी अडवून ठेवून दोन पुजारी जमीन स्वच्छ करीत होते. शिवकुंडामधून राशीराशी फुले, बेल, पाने, टोपल्या भरभरून काढीत होते. लाल कपड्याच्या तुकड्याने पुसून ओली जागा कोरडी करीत होते.

चांदीच्या शिवकुंडातला नळ बहुतेक आतून उघडला होता, दूध ओतलेले पांढरे पाणी हळूहळू त्या वाटेने बाहेर जात होते आणि हळूहळू विश्वनाथाची मूर्ती वर येत होती.

"हर हर ओम", "शिवप्रभू" एक ठेंगणासा वृद्ध ब्राह्मण तोंडाने म्हणत होता आणि गुडघ्यावर बसून शिवाच्या अंगावरून हात फिरवून स्वच्छ करीत होता.

पाणी कमी होता होता आता दिसली ताम्रवेदी. दोन्ही हात डोक्यापर्यंत उचलून वज्र स्वरात तो वृद्ध म्हणाला, "दाता शिवप्रभू की जय हो,"

त्याच्या त्या हाकेने आत बाहेर सर्व थरारले, तो आवाज काही कमी होईना, 'गुरू गुरू' आवाज घुमतच राहिला, जणू काही काळ्या मेघांची गर्जनाच, जणू काही वज्राघाताची प्रथम सूचनाच. छपरावर, भिंतीवर, हवेत माणसांचे धक्के खात खात फिरतच राहिली, विश्राम म्हणून नाहीच.

पुजारी बाहेर गेले. आतमध्ये शांत बसलेला तो फक्त एक वृद्ध, एक किशोर घडाभर दूध, परडीभर हार, ताटभर प्रसाद,निरांजन, इतर नाना तऱ्हेचे पूजासाहित्य घेऊन आत आला. वृद्धाचे कुठेही लक्ष नव्हते, तन्मयतेने तो विश्वनाथाकडे पाहत होता आणि डुलतडुलत आपल्याशीच हसत होता.

पूजासाहित्य जवळ घेऊन तो मुलगा पुढे सरकून बसला, घडा उचलून त्याने वृद्धाच्या हातात दिला; भडाभडा दूध ओतून वृद्धाने शिवाला स्नान घातले, दुधानंतर त्याने पाणी ओतले. पाण्यानंतर दही व सुवासिक द्रव्य, स्नानपर्व संपल्यावर इतर प्रसाधनांची पाळी. चांदीच्या वाटीभर चंदनकुंकुम शिवाच्या डोक्यावर त्यांनी हातांनी थापले, आतप (उकडे नाहीत ते) तांदुळाच्या ओल्या अक्षता टाकून त्यांनी अंगावर चंदन-तिलक लावला, चंदन माखलेल्या शिवाच्या मूर्तीवर चिकटून राहिलेले पांढरे तांदूळ फार बहारीचे दिसत होते. घटलेल्या हातचा साज, वृद्धाचा तो एकाग्र भाव मान फिरवून फिरवून पाहात होतो. तो बालक एक एक पूजासामग्री उचलून देत होता आणि तो वृद्ध, स्वत:ला विसरून पूजा करीत होता, जणू एक भोलानाथ दुसऱ्या भोलानाथाची पूजा करीत होता. चंदन लावून तो जेव्हा करकमल जोडून पुन्हा पुन्हा कपाळाला लावीत होता तेव्हा ते पाहून पाहणाऱ्यांची मनेसुद्धा उचंबळून येत होती. दगडाच्या देवाच्या अंगावर या दोन हातांचा किती कोमल स्पर्श होत होता. 'देवाला दुखापत झाली वाटतं,' असेच जणू त्याच्या बोटांना वाटत होते.

आता त्या मुलाने पांढऱ्या धोत्र्याचे गुच्छ पुढे केले; शिवाच्या डोक्यावर त्या वृद्धाने ते सांभाळून वाहिले, धोत्र्याच्या फुलांची कडा झालरीसारखी शिवशिरी पडली होती. त्यावर त्याने झेंडूचे गजरे ठेवले आणि त्या गजऱ्यांवर पुन्हा धोत्र्याचे गोंडे, पुन्हा गजरे, पुन्हा गोंडे असे करता करता थरावर थर रचले गेले, मोठ्या-

पासून लहान होत होत शेवटी वर धोत्र्याचा कळस चढला. गौरीशंकराच्या शिखरावर जणू बर्फ पडला होता.

सर्वांत शेवटी एक लांब हार त्याने शिवाला घातला. तो हार गळ्यापासून तो थेट खाली कुंडातील पाण्यात दुधात लोळत होता.

"हर हर शंकर," "जय जय हरे" या जयजयकाराने पूजा संपली.

दोन पंड्ये भिंतीला चिकटून उभे होते, धूम ठोकून त्यांनी दुरूनच हार, गोंडे वृद्धाच्या गळ्यात फेकले. शिवाच्या डोक्यावर वाहिलेली धोत्र्याची फुले त्यांनी उचलली, चंदनकुंकुम वाटीत भरून घेतले. धक्काधक्की करीत अकरा पुजारी आत शिरले.

आता खरी आरती होणार, अकरा पुजाऱ्यांच्या परड्या, दुधाचे घडे, पाण्याच्या कळश्या, पंचारती, दही, मिठाई, आसन, डमरू या सर्व गोष्टींनी जागा भरून गेली, विश्वनाथाभोवती अकरा पुजारी बसले, अकरा घडे दूध घातले, पाणी घातले, अकरा वाट्या चंदन, दही लेपले, अकरा जुड्या बेलपत्री, तुलसी मंजरी डोक्यावर वाहिल्या, अकरा हार गळ्यात घातले, चांदीच्या पंचसर्पांचा फणा डोक्यामधून गळ्यात घातला, पाच सापांचे पाच फणे शिवाच्या गळ्यात शोभून दिसत होते, फण्याफण्यांत हार झुलत होते, हाराहारांनी कुंड झाकळून गेले.

अकरा घंटा वाजवून, अकरा दीप लावून अकरा पुजारी आरती करीत होते. कर्पुरारतीच्या ज्वाला धगधगत होत्या. हाताच्या हृदयाच्या मांसपेशी तालातालांत नाचत होत्या. मंत्रगायनाच्या शिरशिरीने हवा कंपित होत होती, डमरू वाजत होते, झांजा वाजत होत्या आणि शिंग वाजत होते. अकरा तुळसीपत्र घालून चांदीच्या ताटात नैवेद्य दाखवला, ओंकाराचा जयध्वनी काढून सर्वांनी लोटांगण घातले, विश्वनाथाची आरती संपली.

प्रसादाचे कुंकू, फुले, चंदन, मिठाई घेऊन आम्ही मोकळ्या रस्त्यावर आलो, असे वाटत होते जणू एक पर्व, एक अभिनय एक नाटक पाहून आलो. व्रजरमण म्हणाले, "नुसता अभिनय नाही, अभिनव अभिनय."

आक्का म्हणाल्या, "जन्मोजन्मीचं पुण्य; म्हणून इतकं सुंदर दर्शन झालं."

पंड्यांला विचारले, "पुजाऱ्यांनी आरती केली; पण अगोदरचा तो वृद्ध कोण?"

"तो एक भक्त, पंड्यांबरोबर ओळखदेख आहे, सर्वांच्या आधी तो रोज विश्वनाथाची पूजा करतो. लहान मुलगा त्याचा नातू."

"आणि ती स्त्री? ती लहान वयाची, पोरसवदा--फारतर एकोणीस वीस

वर्षांची कुमारी--केस मोकळे सोडलेले, भाळी शेंदूर लावलेली लालकाठाची रेशमी साडी नेसलेली, दोन गृहस्थांबरोबर--बाप-दादा असतील--आली ती ? 'साधूमा,' 'साधूमा' म्हणून तुझ्या त्या पुतण्याने अगदी स्वागत करून दाराजवळ बसवलं तिला, ती कोण ? "

"ते कुणालाच माहीत नाही, परमेश्वराची मर्जी, किती नाना रूपं घेऊन येतात, आम्ही कसं सांगणार ? "

काय मस्त स्नानगृह, अगदी झोपायच्या खोलीला लागून, नळाचे पाणी, स्वच्छ, चकचकित जमीन, काचेच्या खिडक्या; विलासी मनाला बरे वाटते असे स्नान करायला.

सकाळी साडी, साबण हातात घेऊन या स्नानगृहात जात होते इतक्यात आक्कांनी येऊन धमकावले, "इथं आंघोळ करणार की काय ? गंगेवर चल," मी म्हटले, "राहू दे ना आज --"

"नाही, आज षष्ठी, वासंती पूजेचा पहिला दिवस, गंगेत स्नान करणार नाही असं बोलू नये."

"त्याच्या दुसऱ्या दिवशी सप्तमी, 'सर्वनाश !' सप्तमीला गंगेवर स्नान न करून कसं चालेल ? "

"महाअष्टमीला गंगेत बुडी मारली नाही तर चालणारच नाही, तिथी म्हणजे तिथी ? ज्याला महाअष्टमी म्हणतात ती ! "

अष्टमीनंतर नवमी, "ही अशीतशी नवमी नाही, रामनवमी, श्रीरामचंद्राचा जन्मदिवस, दिवसेंदिवस जग रसातळास चाललंय. धर्मजगत् उद्ध्वस्त होत आहे. कोणत्या पापामुळं घराघरांत ही दुर्गती होत आहे, कोण जाणे ? तू घरची सून, माझ्या भावाचं कल्याण होवो; चल, अशा दिवशी गंगामाईत बुडी मारून येऊ."

सुटकाच नव्हती,

विन्ध्याचलला जाण्यासाठी रस्त्याच्या वळणावर ओळीने टॅक्सी उभ्या होत्या, घाटावर जाता-येता दर विचारला, जायला-यायला ऐंशी रुपये भाडे मागत होते. सकाळी जाऊन संध्याकाळी इथे परत आणणार.

मी विचारले, "काही कमी होणार नाही ? "

तो म्हणाला, "हे जे सांगितलं ते कमी करूनच सांगितलंय; आपण बंगाली, मीही बंगाली म्हणून. सध्या एकसारखे लोक विंध्याचलला जात आहेत, तिथी आहे

ना; इथं येऊन स्टँडवर थांबायलासुद्धा फुरसत मिळत नाही, ठरवाठरवी तर लांबच राहिली, घेऊन जावं म्हणून लोक खुशामत करतात. पुढचे दोन दिवस 'बुक्ड्' आहेत. परवा चला, आता जाऊन काय करणार ? काय ती गर्दी ! एवढ्या जाल, पण देवीचं दर्शनही होणार नाही, आत शिरतासुद्धा येणार नाही."

"येईल. येईल" असे म्हणत दुसरा एक टॅक्सी ड्रायव्हर शेजारच्या टॅक्सीतून उतरून आला. तो म्हणाला, "तिथं पंड्या असतो, त्याला पकडलंत तर तो तुम्हांला देवीचं दर्शन घडवील. मी पंच्याहत्तर रुपयांत न्यायला तयार आहे. चला."

पहिला ड्रायव्हर चिडला, तो म्हणाला, "काल मी गेलो होतो. गर्दी कशाला म्हणतात, ते स्वतः डोळ्यांनी पाहून आलोय. कपडेलत्ते फाटून, घामानं डबडबून मरायची पाळी येते सर्वांना. जायचं तर जा, पण दर्शन होईल की नाही ते मात्र सांगू शकत नाही."

भाडं आणि गर्दी यांच्या विचाराने उत्साह थंडावला. आक्कांनी हात जोडून इतक्या दुरूनच देवीच्या नावाने नमस्कार केला. त्या म्हणाल्या, "आई ग अपराध मानू नकोस. या वेळी तुला पाहता आलं नाही, तरी आशा सोडणार नाही, पुन्हा तूच घेऊन ये."

काशीला आणखी कोणकोणत्या देवदेवता पाहायच्या राहिल्या ते आक्का बोटांवर मोजीत होत्या.

गगन महाराज म्हणाले, "संध्याकाळी मला सवड आहे, तुमच्याबरोबर येऊन दुर्गावाडी दाखवून आणू शकेन. तिकडं गेल्यासारखं आणखीही मंदिरं पाहतायेतील."

पहिल्याने आलो संकटमोचनला. हे वीर हनुमानाचे मंदिर, पूर्वी इथे जंगल होते, अजूनही भोवताली दाट झाडी आहे, तुलसीदासांना इथे महावीराचे दर्शन झाले, कुठे जाऊन तपस्या केली तर श्रीरामचंद्राचे दर्शन होऊ शकेल हे महावीरांनी इथेच त्यांना सांगितले होते.

गगन महाराज म्हणाले, "हे जे म्हणतात ना भुताच्या तोंडी रामनाम––एका भुतानंच तुलसीदासांना इष्ट दर्शनाचा मार्ग सुचवला होता. आहाहा, ह्याची एक फिल्म आली होती. पाहिली तुम्ही ? फारच सुंदर."

असे सांगतात, तुलसीदास प्रातर्विधीनंतर लोट्यात उरलेलं पाणी एका झाडाच्या बुंध्याशी ओतून टाकीत, एकदा ते आजारी पडले, तीनचार दिवस ते घरातून बाहेर पडले नाहीत, बरं झाल्यावर त्यांनी जेव्हा झाडाला पुन्हा पाणी घातलं तेव्हा एक भूत झाडावरून उतरून खाली आलं आणि म्हणालं, "हे पाणी पिऊनच मी या

झाडावर राहातो. गेले तीनचार दिवस पाणी मिळालं नव्हतं, फार त्रास झाला, आज पाणी मिळाल्यामुळं समाधान वाटत आहे, सांग तुझं कोणतं काम मी करू शकतो."

तुलसीदास म्हणाले, " माझी एकमात्र इच्छा आहे श्रीरामचंद्रदर्शनाची, त्याला भेटण्याचा मार्ग सांग."

भूत हसून म्हणालं, " मला ते ज्ञान अवगत असतं तर मी भूत होऊन का राहिलो असतो ? रामभक्त महावीरांना शरण जा, ते सांगू शकतील. या मंदिरात रोज रामनामसंकीर्तन होतं; एक कुष्ठरोगी सर्वांच्या आधी येऊन सर्वांच्या नंतर जातो, एका बाजूला बसून राहतो तो––हेच महावीर."

" तुलसीदास गेले आणि त्यांनी महावीराचे पाय धरले, अंगातून रक्त पू पडत होता, पण त्यांचं तिकडे लक्ष नव्हतं. छद्मवेश टाकून महावीरांनी दर्शन दिले. ते म्हणाले, " चित्रकूट पर्वतावर जाऊन तपस्या कर, रामचंद्रांचं दर्शन होईल."

" तेव्हाच्या तेव्हा तुलसीदास चित्रकूटाला निघून गेले, प्रसिद्ध दोह्यांत आहेच–"

**" चित्रकूटके घाटपर भई संतनकी भीर।**
**तुलसीदास चंदन घिसै तिलक लेत रघुवीर।। "**

" चित्रकूटावर साधुसंतांची गर्दी जमली होती पाहायला, तुलसीदास स्वतः चंदन उगाळून देत व त्या चंदनाचा टिळा श्रीराम लावीत होते."

भक्त साधकाच्या घरचे सारे काम इष्ट देवादिकांसाठीच. हे पाहून आपण आश्चर्याने थक्क होतो; परंतु त्यांना ते किती सोपे वाटते.

इष्टदेव प्राप्त होण्याच्या मार्गातील संकटापासून तुलसीदासांना मुक्त केले होते म्हणूनच महावीर इथं ' संकटमोचन ' या नावाने अधिष्ठित झाले आहेत. महाभक्त तुलसीदासांना श्रीरामचंद्राची तपस्या करून प्रभूचा लाभ झाला होता.

शेजारीच श्रीरामचंद्राचे लहानसे मंदिर आहे. पण ' संकटमोचन 'लाच जास्त प्राधान्य आहे. गगन महाराज म्हणाले, " पाहा इथं भक्तासमोर प्रभू स्वतः किती लहान झाले आहेत."

तुलसीदासांच्या समाधीला प्रदक्षिणा घालता घालता दादा म्हणाले, " एक बंगाल सोडून भारताच्या इतर सर्व भागात तुलसीदासांचा महिमा सर्वांना विदित आहे. बंगालमध्ये निमाईची फार ख्याती आहे."

"फार काय सांगायचं, बंगाल देशाला तुलसीदासांचा महिमा कळला असता तर त्याची अशी दशा कशाला झाली असती ? 'हरेकृष्ण हरेकृष्ण' करीतच तो देश मेला." एवढे बोलून गगन महाराज पुढे चालायला लागले.

त्यांचे बोलणे व्रजरमणच्या मनाला लागले. ते म्हणाले, "महाप्रभू –"

"अरे, महाप्रभूंची गोष्ट सोडून द्या. त्यांची गोष्टच निराळी. मी त्यांच्या पंथातील लोकांविषयी बोलतोय." असे म्हणून गगन महाराज वळून उभे राहिले.

प्रचंड मोठा वटवृक्ष. झाडाचा बुंधा केव्हाच झिजून गेला होता. पारंब्या खाली येऊन एका खोडाऐवजो कितीतरी खोडे तयार झाली होती.

या वृक्षाखाली बसून तुलसीदास साधना करीत, सर्वांत मोठ्या पारंबीच्या तळा-जवळून आक्कांनी माती उकरली आणि एक पसाभर माती आणून माझ्या पिशवीत घातली. त्या म्हणाल्या, "पवित्र माती आहे, चुकून फेकून देऊ नकोस."

तिथून पायी चालत चालत दुर्गावाडीला आलो. मंदिराला लागूनच अति प्राचीन जीर्ण झालेले असे चिंचेचे झाड होते. एके काळी ते कसे दिसत होते कोण जाणे पण आता मात्र पीळ घातलेल्या दोरीसारखे दिसते. झाडाची मुळे जर्जरित झालेली. फांद्या आकमून गेलेल्या, बाळलेल्या, अतिशय बुभुक्षित असा तो वृक्ष दिसतो. मंदिराच्या लाल दगडाच्या पार्श्वभूमीवर मी जितक्या वेळा ते झाड पाहिले तितक्या वेळा नन्ददांनी काढलेले चित्र डोळ्यांसमोर आले – अन्नपूर्णेच्या दारात क्षुधार्त महाकाल उभा – अगदी हुबेहूब तेच चित्र जणू. जणूकाही झाडाच्या सालीवर ते दोन कराल दातसुद्धा दिसत होते.

व्हरांड्यात, भिंतींवर ओळीओळीनी माकडे बसली होती. गगन महाराज म्हणाले, "वानर आलं अन त्यानं पकडलं तर, काही करू नका, फक्त हात उघडून गप्प उभे राहा. हात बंद असले तर त्यांना वाटतं काही तरी खायचं असेल."

माझ्याजवळ ओंजळभर फुलं-बेलपत्री होती. मीं विचारलं, "वानर फुलं ओळख-तात ना ?"

"हो ओळखतात," त्यांनी आश्वासन दिलं.

सोन्याची दुर्गा. या सोन्याचाच गवगवा फार. सर्वच विचारीत, "सोन्याची दुर्गा पाहिलीत ? चला सोन्याची दुर्गा पाहून येऊ."

सोनेरी डोक्यावर सोनेरी मुकुट चकाकत होता. संध्याकाळचा प्रकाश गालावर हनुवटीवर पडल्यामुळे हास्यरेषा उमटल्यासारख्या वाटत होत्या. प्रकाशाचा हा खेळ

फार मजेचा होता. या मजेतच कधी मूर्ती गंभीर दिसत होती, कधी रागीट दिसत होती, तर कधी खुशीत चमकत होती.

त्या दिवशी संध्याकाळी ' काळभैरव ' बघायला गेलो. गोपेश्वर महाराजांनी सांगून ठेवले होते, ' काशीमध्ये या बेटयाचा प्रभावच जास्त आहे. विश्वनाथाजवळ कुणी राहायचं, कुणी राहायचं नाही, हे तोच ठरवतो. अति रागीट. त्याच्याकडे जाऊनच अगोदर मनातल्या कामना, वासना सांगा. त्याला संतुष्ट ठेवलंत तरच विश्वनाथांची भेट होईल."

म्हणून त्या दिवशी तिथेच गेलो. कोण जाणे कशी मूर्ती असेल असे वाटले होते. काळया दगडाची, विचित्र आकाराची असेल ? पण जाऊन पाहिले तर तसे काहीच नव्हते; मस्त सोन्यासारखा चकाकणारा चेहेरा, वस्त्रालंकारांनी झाकलेले अंग. चांगले मोकळे निर्मळ वातावरण. आरती सुरू झाली. दारात उभे राहून पाहात होतो. आत पुजाऱ्याच्या काळया पाठीच्या पलीकडे, हातातील पंचारतीचा प्रकाश काळभैरवाच्या नाकावर, कपाळावर, गालावर, मिशांवर, खांद्यावर पडला. चेहेरा उजळला. जणू काही पंचारतीच्या पाच ज्योतींनी तिथं स्पर्शच केला. लगेच काळ-भैरवाचे रूप स्पष्ट दिसू लागले.

टक लावून पाहात होते आणि विचार करीत होते. भ्यायचं का भ्यायचं नाही ?

आरतीनंतर सर्वच आत गेले. शेजारचा दिवा रात्रंदिवस जळत असायचा आणि त्याच्यावर झाकण टांगलेले असायचे. त्याच झाकणातून सर्वांनी बोटांनी काजळ काढून घेतले. त्यांचं पाहून मी पण काजळ घ्यायला गेले अन पाहिले तर मी अगदी काळभैरवाच्या समोर उभी होते. मी पाहिले. चेहरा काही तितकासा भीषण नव्हता. त्यावर आनंदाचा भावही होता. बाजूच्या दिव्याच्या प्रकाशामुळे गालांवर हसू फुटल्यासारखे दिसत होते.

दुर्गावाडी मंदिराच्या आवाराभोवती छत असलेला एक व्हरांडा होता. गळयात दोरी बांधलेल्या बकऱ्यांनी तो भरला होता. गेले कित्येक दिवस इथं अगणित बळी चालले होते.

" नहीं मिलेगा जाव; पाँव मत पकडना " असे बोलून पाय झाडून टाकायला दादा गेले अन हसायलाच लागले. त्यांनी पाहिले तर पोटाशी पिल्लू असलेले एक वानर त्यांचे पाय धरीत होते – त्याला खायला पाहिजे होते. दादांना वाटले होते. एखाद्या भिकाऱ्याच्या मुलाने पाय धरले म्हणून.

बलिस्थानासमोर पुजारी एका काळ्या बकऱ्याला घट्ट धरून ठेवून मंतरलेली फुले, शेंदूर लावीत होता, लगेच एक बळी होणार होता.

घाईघाईने मी बाहेरच्या दाराशी गेले. गगन महाराज म्हणाले, "निघून जाऊन चालणार नाही. साक्षीगोपाळाजवळ इथं आल्याबद्दलची साक्ष ठेवून जा."

तसे पाहिले तर प्रत्येक देवळात एकेक साक्षी होताच. विश्वनाथचासुद्धा साक्षी आहे – गणेश. हिशोबात चूक झाली तर हे साक्ष देतात की, "हो, ही व्यक्ती आपल्या दर्शनाला आली होती."

हानिफची आईपण सांगायची,

त्या दिवशी एकदा आली होती. तोंड कसे सुकून गेले होते. मी विचारले, "काय झालं. जेवणखाण झालं नाही?"

ती म्हणाली, "खाणार कशी, रोजा आहे ना."

मी विचारले, "नुकतेच तर आता रोजा केलेत, ईद पण झाली. पुन्हा रोजा कसला?"

"साक्षीपुरावा ठेवायला हवा ना? मेल्यावर जेव्हा चौकशी होईल तेव्हा अल्ला प्रथम कबूल करणार नाही, म्हणणार तू रोजा केले नाहीस. म्हणून एक महिनाभर रोजा केल्यावर पुन्हा हे सहा रोजा केले. ते साक्ष देतील, ते सांगतील, आम्हांला माहीत आहे, हिने रोजा केलेत. त्यांनी साक्ष दिल्यावरच नीट चौकशी होईल."

चालता चालता मागे राहिले. गगन महाराज ओरडले, "त्या दिवशी तैलंगस्वामी पाहिले. आता त्यांच्या जोडीचे भास्करानंद पहायचे असतील तर चला."

त्या वेळी सध्याकाळ सरत आली होती. पश्चिमेचा सूर्य, सरळ येऊन भास्करानंदांच्या दगडाच्या मूर्तीवर पडला होता. जणू माणके झरत होती.

अशक्त मोहोरा. तैलंगस्वामीच्या नेमके उलट. टोकेरी नाक.

दादा म्हणाले, "असं वाटतं की हे पंजाबी होते."

माणूस नव्हताच हे हजार वेळा माहीत असूनही, असे आपले मनात येते की हे तेच आहेत. या सर्वांचा हा एक प्रभाव!

आक्कांनी विचारले "काय झालं, हसतेस ती?"

मी म्हटले, "जरा कल्पना करा, या गोऱ्या माणसानं एक दिवस रस्त्यामध्ये त्या काळ्या, विशाल त्रैलंगस्वामीना आलिंगन दिलं होतं. हातात तो मावला कसा?"

गोष्ट ऐकली होती. भास्करानंद, तैलंगस्वामी दोघे दोन प्रांतांत होते. दोघांच्याही मनात एकाच वेळी कसली तरी समस्या उत्पन्न झाली. दोघेही एकमेकांकडे, समस्येबद्दल चर्चा करायला निघाले. अर्ध्या वाटेतच दोघांची भेट झाली. आवेगाने आलिंगनबद्ध होताच एकमेकांच्या स्पर्शाने, शंका नाहीशी झाली. आणखी जास्त काही बोलावेच लागले नाही. हसत हसत जो तो आपल्या वाटेने निघून गेला.

तैलंगस्वामींनासुद्धा काही पाहिलेले नव्हते, तरी त्यांना लहानपणापासून पाहिल्यासारखे वाटत होते. आई-मावशींकडून कितीतरी गोष्टी ऐकत आले होते. काशीच्या घाटावर एकच बुडी मारून ते दुसऱ्या एखाद्या दूरच्या घाटावर बाहेर यायचे, त्या बुडीतच शिवाच्या डोक्यावर अपकर्म करीत. कडक उन्हाळ्यात गरम वाळूवर झोपून राहात आणि थंडीमध्ये गंगेच्या पाण्यावर तरंगत राहात.

गगनमहाराजांनी सांगितले, "ते तरंगणं तरी काय एखाद दुसऱ्या दिवसापुरतं थोडंच होतं ? मेलेल्या म्हशीसारखे सहासहा महीने पाण्यावर तरंगतच राहात."

तीनशे साठ वर्षे ते जिवंत होते. काशीलाच समाधी घेतली. संध्याकाळनंतर पाहायला गेलो. बोळात दाट अंधकार होता. चंद्रप्रकाश आत येऊ शकत नव्हता. रस्त्याच्या एका बाजूच्या घरांच्या सावल्या दुसऱ्या बाजूच्या घरांवर पडत. भुवया आकुंचित करून, पायाखालच्या पाचोळ्यांत बारीक लक्ष ठेवून मागेपुढे पावले टाकीत एकापेक्षा एक अरुंद बोळातून आम्ही चाललो होतो. एकाएकी एक खिडकी दाखवून गगन महाराज म्हणाले, "ते पाहा तैलंगस्वामी बसलेले."

"कुठं ?" असे म्हणून विमनस्कपणे मी मान फिरवली.

गगन महाराज म्हणाले, "हे काय मागं राहिलं. हरकत नाही. पुन्हा पाहाता येईल. मुख्य दारानंच जाऊ, जरा मागं जायला लागेल इतकंच, दुसरं काय ?"

मुख्य दरवाज्याने आत जाऊन दोन जिने चढत होतो, एक उतरत होतो, चार पावले पुढे जात होतो, दोन पायऱ्या उड्या मारून जात होतो, असे करीत करीत गच्चीवर आलो. मस्तपैकी काळ्या दगडाची एक मूर्ती जमिनीवर बसवलेली होती. भगव्या वस्त्राने सर्व अंग झाकले होते. पणतीच्या क्षीण प्रकाशात मी मूर्ती नीट न्याहाळून पाहात होते. नाक, तोंड, कपाळ, ओठ, सुंदर तरुण पुरुषाची मूर्ती, चिरतरुण भाव चेहेऱ्यावर—त्या सुंदर काळ्या चेहेऱ्यावर—पांढऱ्या दगडाचे डोळे चमकत होते. ही दगडाची मूर्ती आहे असे वाटले नाही. हातपाय जोडून, अंधारामध्ये खरोखरच तैलंगस्वामी बसले आहेत असे वाटत होते. डोळ्यात भरण्यासारखे काय अपूर्व व्यक्तिमत्त्व ! मी अगोदरच लहान, त्यांच्यासमोर तर आणखीनच लहान झाले.

गगन महाराजांनी हात पुढे करून चाचपडत तैलंगस्वामींच्या पायांना स्पर्श केला. मीही हात पुढे केला. पण तो त्या बसकट मूर्तीच्या मांडीला लागला. मी एकदम शहारले. मी असे ऐकले होते की तपश्चर्येच्या तीव्रतेमुळे महात्म्यांची शरीरेसुद्धा दगडासारखी कठीण होतात. मला वाटले, तशा कठीण शरीरालाच जणू मी स्पर्श केला.

या मूर्तीच्या मागच्या बाजूला काली मातेचे मंदिर होते. या देवीचीच ते तपश्चर्या करीत. एके काळी त्यांच्या हातचीच पूजा देवीला लाभली होती. समोरच्या छोट्या अंगणात एक प्रचंड शिवलिंग होते. एखाद्या पहिलवानालासुद्धा दोन हातांनी धरता आले नसते, एवढे मोठे शिवलिंग पूर्वी कधी पाहिले नव्हते.

गगन महाराज म्हणाले, "एक दिवस याच शिवाला गंगेतून उचलून व बखोटीला मारून तैलंगस्वामी घेऊन आले होते. तेव्हापासून तिथेच आहे."

एवढे वजन उचलून आणणे एका माणसाला कसे शक्य झाले असेल ? शिवदेव असला तरी तो दगडच ना. दगडाला वजन नाही असे कसे म्हणता येईल ?

कुणास ठाऊक; शंकेने शंका वाढते. सरळ सरळ विश्वास ठेवला आणि शांत झाले.

संकटमोचनहून दुर्गावाडी, दुर्गावाडीहून भास्करानंदाची समाधी – ही काही कमी वाट नव्हती. थकवा वाटत होता. दगडाच्या थंड व्हराड्यात धपकन बसले.

दादा म्हणाले, "भास्करानंदांच्यासुद्धा किती अद्‌भुत अशा गोष्टी आहेत. त्यांच्या चरित्रात वाचल्या आहेत. तेसुद्धा लोकांना औषध वगैरे देत."

असे ऐकले आहे की मोठमोठे साधू लोक पुष्कळ वेळा रोग्यांना औषधे देतात आणि लोक रोगमुक्तही होतात. मुळ्या वगैरे किती गुणकारी आहेत आणि योगबलाचाही गुण किती आहे ! आता बोलले जाते योगबलात अजिबात अर्थ नाही असे म्हणता येणार नाही. कितीदातरी असे पाहायला मिळते की हजार औषधांनीसुद्धा जिथे उपयोग झाला नाही, तिथे क्षुल्लक अशा एखाद्या मुळी धुतलेल्या पाण्याने काम झाले. याला काय म्हणायचे ?

दादा म्हणाले, "असं ऐकलं होतं की, भोलागिरींजवळ एकजण आला आणि त्याने रडारड सुरू केली. त्याला डोळ्यांनी दिसत नव्हतं, त्यासाठी त्याला औषध हवं होतं. भोलागिरींना दया आली. समोरच्या कुंपणावर वेल फोफावली होती. ती दाखवून भोलागिरी म्हणाले, "जा त्या वेलीच्या पानांचा रस तीन दिवस डोळ्यांत घाल." आणि खरोखरच तो रोगी बरा झाला. काही दिवसांनंतर आणखी एकजण

डोळ्यांनी दिसत नव्हते म्हणून भोलगिरींकडे आला. ते तेव्हा जप करायला बसले होते. शिष्याला वाटले कशाला बसवून ठेवायचे, ही एकच वेल ना ? तो शिष्य म्हणाला, "या पानांचाच रस लाव जा." तो जेव्हा वेलीची पाने काढू लागला तेव्हा भोलागिरी बाहेर आले आणि हसून म्हणाले, "नुसत्या पानांत काही नाही ?"

गगन महाराज म्हणाले, "साधू-संन्यासी दिसले ना दिसले की औषध मागायचं हा जणू एक रोगच झालाय. अगदी सुशिक्षित लोकांमध्येही हा पाहिलाय. एक गोष्ट सांगतो, माझा स्वतःचा अनुभवच आहे. सहारनपूरला माझ्या एका मित्राचं घर होतं. मोठं काम करीत असे तो. त्याची आई मला पुन:पुन्हा बोलवायची. ती म्हणायची, "बाबा, एकदा ये आमच्या घरी." कितीतरी वेळा गेलो होतो; परंतु तिची काही भेट व्हायची नाही. मी कामासाठी जायचा, काम झालं की परत यायचा. ते ऐकून तिला वाईट वाटायचं. एकदा फक्त तिलाच भेटायचं असं मनाशी ठरवून मी सहारनपूरला गेलो. मित्राच्या आईला फार आनंद झाला. मी मनापासून जेवणारा हे तिला माहीत होतं. नाना तऱ्हेचे पदार्थ करून तिनं मला जेवायला वाढलं. मी जेवायला सुरुवातसुद्धा केली नव्हती. जेमतेम भात कालवत होतो, तेवढ्यात शेजारच्या घरातली पंचवीस-सव्वीस वर्षांची एक पंजाबी स्त्री आली आणि हात जोडून समोर उभी राहून ओक्साबोक्शी रडायला लागली. मी बुचकळ्यात पडलो. ताट समोर वाढलेलं आणि एक स्त्री अशी समोर रडत उभी. तिची भाषा मला कळत नव्हती. मित्राच्या आईला विचारले, "काय प्रकरण आहे ?" ती म्हणाली, "ही एखादं औषध मागते आहे तुमच्याजवळ. तिला मुलं होतात पण वाचत नाहीत, बाळंतपणातच जातात. तुम्ही साधू आहात असं ऐकलं, म्हणून धावत आली." मी म्हणालो, "ही मोठी पंचाईतच आहे. मला औषधबिवषध काही माहीत नाही. ती स्त्री काही ऐकेना, ती जास्तच रडायला लागली आणि हात जोडून दयेची याचना करू लागली. मित्राची आई म्हणाली, "अरे, बिचारी इतकी रडते आहे. काहीतरी एखादं सांगून टाक ना." मी म्हणालो, "काय सांगू ? खोटं काही तरी सांगण्यात काय फायदा आहे ? मला काही औषधं माहीत नाहीत, हे परमेश्वराला माहीत आहे आणि ही स्त्री संतानप्राप्तीसाठी व्याकुळ झाली आहे. हेही परमेश्वराला माहीत आहेत. तेव्हा मी फार तर अशी प्रार्थना करू शकेन की "परमेश्वर हिची मनीषा पूर्ण करो."

"काही कालावधी गेल्यानंतर मित्राच्या आईनं कळवलं की त्या स्त्रीला अपत्यलाभ झाला आणि ते सुखरूपही आहे व राहीलही. आता याला आपण काय

म्हणणार ? यात योगबलाचा किंवा औषधाचा काही संबंध नव्हता हे मला माहीत आहे. ”

दादा हसले अन म्हणाले, “ परंतु काय छान बातमी फुकट गेली. वर्तमानपत्रात छापून आली असती तर आपल्या नावाचा उदोउदो तरी झाला असता. ”

वाटेत विष्णुमंदिरात दर्शन घेऊन जगन्नाथवाडीला आलो. काशीला हे फक्त एकच जगन्नाथाचं मंदिर आहे. रथाच्या वेळी इथं यात्रा भरते.

गगन महाराज म्हणाले, “ चला, आता जी मूर्ती दाखवीन ती पाहून भीती वाटेल. ”

जगन्नाथमंदिराच्या मागेच दुसरे एक मंदिर होते. त्या मंदिरात सबंध खोलीएवढा अगदी छतापर्यंत असा प्रचंड नृसिंहदेव. एकदम पाहिले तर खरोखरच दचकायला व्हायचे. पायाजवळ प्रल्हाद पडलेला. नृसिंहदेवाचा उजवा हात अलगत त्याच्या डोक्यावर ठेवलेला, जणू त्याला या मुलाचे फारच प्रेम; आणि डाव्या हाताने अभयदान दिलेले. याशिवाय दयामायेचे चिन्ह म्हणून साऱ्या मूर्तीत कुठेही नव्हते.

व्रजरमण म्हणाले, “ श्रीभगवानाचं हे रूप पाहून देवी लक्ष्मीदेखील भयभीत झाली होती. तिलासुद्धा जवळ जाण्याचे धाडस झाले नव्हते. हा एक प्रल्हादच काय तो जवळ जाऊन उभा राहिला होता. ”

तत्त्वानंदस्वामीसुद्धा आमच्या बरोबर होते. ते म्हणाले, “ नृसिंहाला तर दोन डोळे होते असं म्हणतात अन इथं तर कपाळावर आणखी एक तिसरा चांदीचा डोळा दिसतोय. त्रिनयनी मूर्ती तर दुर्गेची. हे पुरुषवेशधारी – ”

पुजाऱ्यालासुद्धा या प्रश्नाचे उत्तर माहीत नव्हते. तो फक्त पूजा करायचा.

जाऊ दे. असू देत नृसिंहाला तीन डोळे. आम्ही बाहेर आलो आणि निःश्वास सोडला.

पूर्वेच्या बाजूला भिंतीला अगदी लागून एक फार सुंदर अश्वत्थ वृक्ष होता. लाल-लाल कोवळ्या पानांनी फांद्या भरून गेल्या होत्या. लांबलांब देठ असलेली कोवळी पाने वाऱ्याने हेलकावे खात होती. लहान मुलांच्या गुलाबी गालांवरचे हसूच जणू काही.

संध्याकाळच्या अर्धवट उजेडात फरसबंद अरुंद रस्त्याने मान खाली करून मी चालले होते. मनात नाना विचार येत होते. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना उतरत्या जमिनीवर लहानमोठे वृक्ष असलेले बगीचे होते. मुलांना बाजूला खेळायला सोडून,

दोन माता समोरासमोर बसून, घुंघट वर करून बोलत बसल्या होत्या. ती दोन मुले पायाच्या अंगठ्यांवर भार देऊन उभी राहून घडी केलेले कागद आकाशात उडवीत होती. कागदाची घडी हवेत गेल्यावर तिचा एक प्रकारचा आवाज व्हायचा तो ऐकून आनंदाने ती मुले ओरडायची, " ही पडली, ही पडली " आणि खदखदून हसायची. जणू काही कल्पनेनं ती आकाशातून काही तरी पाडीत होती. आवाज येत होता त्यानेच ती संतुष्ट होत होती.

जवळ जाऊन त्यांच्या नजरेला नजर लावून वर पाहिले, पानागणिक हिरवी कैरी झाडाला लागली होती. मोहोर केव्हा आला होता कुणास ठाऊक ?

कु—ऊ, कु—ऊ.

डांबरी रस्ता. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पक्की घरे. वर आकाशात इलेक्ट्रिकच्या तारांचे जाळे झाले होते आणि इथे कोकिळा कुठे बसून ओरडत होती ? चोहोकडे वळून पाहिले.

तो काय तिथे दुसऱ्या मजल्यावर फाटक्या चिकाच्या पडद्याच्या फटीतून दिसत होता. लोखंडी तारांचा पिंजरा. त्यात बसलेली पाळलेली कोकिळा शेपटी झुलवीत एकटीच ओरडत होती कु—ऊ, कु—ऊ.

काशीला संध्याकाळच्या वेळी गंगेत नौकाविहार करण्याची एक पद्धतच आहे. येणारे सर्वच एकदा तरी नौकेत बसून गंगेची हवा खातातच. गंगेभोवती अर्धचंद्राकृती अशी जी काशी नगरी तिची शोभा पाहातात.

आज जाऊ. उद्या जाऊ करता करता इतक्या दिवसांत जमले नव्हते. आता संधी आली आणि सवडही झाली. आनंदमयी 'मां'चा आश्रम इथेच होता. काशीच्या जवळजवळ दुसऱ्या टोकाला. गंगेवर उंच खांब उभारून त्यावर दुमजली प्रासाद बांधला होता. त्याच्याच एका बाजूला एक मंदिर होते. नुकत्याच काही दिवस अगोदर आनंदमयी 'मां'नी सावित्रीयज्ञाला सुरुवात केली होती. त्याच होमाचा अग्नी अजूनही कुलूप लावलेल्या मंदिरात जळत होता. गेली कित्येक वर्षे यज्ञाची सांगता व्हावी म्हणून अग्नि अविरत जळत होता. प्रतिष्ठापनेच्या वेळी आनंदमयी 'मां'नी पाच महात्म्यांना आमंत्रण दिले होते. त्या पाचजणांपैकी एक होते ' हरिबाबा. '

अंगणाच्या समोरच्या मंदिरात वासंती प्रतिमा होती. तिथे पुष्कळ लोक जमले होते.

गंगेच्या किनाऱ्याला लागून बोगद्यासारख्या पायऱ्या खाली गेल्या होत्या. बाहेर जोडीजोडीने जोडे पडले होते. आक्का आणि मीसुद्धा त्याच खुणांच्या दिशेने उतरलो.

एक प्रचंड ' हॉल ' होता. गंगेच्या पात्रावरून जी एक उंच भिंत होती त्याच्या आतच एक लांबट खोली होती. उतरता उतरता असे वाटले जणू गंगेतच उतरलो. गंगेचे पाणी भिंतीवर आपटले म्हणजे पाण्याचा खुळखुळ असा आवाज होत होता.

उन्हाळयाच्या दिवसांत या ठिकाणी किती थंड असते कोण जाणे. खोलीच्या चारी भिंती आनंदमयी मांच्या फोटोंनी भरल्या होत्या. एखाद्या फोटोत त्या केसांत फुले माळून हातात बासरी घेऊन कृष्णवेषात दिसत होत्या तर एखाद्या फोटोत नाना अलंकारांनी विभूषित राजाच्या राणीसारख्या सिंहासनावर बसलेल्या दिसत होत्या. कधी विचारात मग्न अशा दारातच पाय पसरून बसलेल्या तर कधी प्रसन्न दृष्टींनी ' गुरुप्रिया'कडे पाहात असलेल्या ! यांपैकी एक फोटो तर पहायला फारच आवडला – समुद्रकिनारी आनंदमयी मा पायी चालत येत आहेत. पाण्याच्या लाटांनी पावले भिजत होती आणि साडीचे लाल काठ भिजत होते. मोकळे सोडलेले केस सैरावैरा उडत होते. चालण्याची साधी पद्धत, चेहेऱ्यावर स्वाभाविक हास्य आणि खेडेगावातल्या स्त्रियांप्रमाणे दोन फेर घेऊन चापून चोपून नेसलेली साडी.

आक्का म्हणाल्या " या तर आमच्याच गावच्या सर्वसाधारण सासुरवाशिणी असतात तशा साध्यासुध्या, सरळ, अशिक्षित. सासरी आल्या तेव्हा रांधताना, वाढताना कष्टी होत. पारोश्या कामाचा ढीग पडून राही. शेगडीवर भाजी करपून जाई. त्यांचे कशातच म्हणून लक्ष नसायचे. सर्व म्हणाले, 'वेडी सून' सर्वांच्या मनात असंतोष पसरला. कुणाच्या मनात काय असते ते कुणाला कळते ? पूर्वजन्मावर आपण कधी मनापासून विश्वास ठेवतो का ? नाहीतर ही खेडवळ बाई अशी कशाने झाली की ती देवघरात बालानंद स्वामींच्या खांद्यावर जाऊन बसली ? बालानंद हसून म्हणाले होते " बेटी तो सिंहवाहिनी है ! "

एक अल्पवयाची गृहिणी आली आणि तिने आक्कांना नमस्कार केला. आक्कांच्या तोंडून ब्र नाही निघाला. आश्चर्याने त्या पाहात राहिल्या. त्या म्हणाल्या, " तुम्ही इथं ? आम्ही किती काळजीत पडलो होतो. एक कुटुंब अकस्मात बेपत्ता झालं ! काळजीला सीमा नव्हती. मुली कुठं आहेत ? "

" मुली इथंच आहेत. त्यांच्यासाठी म्हणूनच तर पळून आले. मैत्रिणींनी सल्ला दिला की निघन जाणार याचा कुणाला पत्ता लागू देऊ नकोस. नाहीतर अडवून

ठेवतील. म्हणून एक दिवस माहेरचं नाव पुढं करून पाकिस्तानची सीमा पार करून सरळ काशीला पळून आले. माहेरी, सासरी कुणालाही कळवायचा धीर झाला नाही. कुणाला कुठून कळलं तर ऐन वेळी मार्गात अडथळे निर्माण करतील. इथं येऊन तर पडलो. आता दिवस निघेनात. काय खाणार अन काय नेसणार ? शहरातच एक खोली घेऊन राहते. आश्रमाच्या एका ओळखीच्या स्वामीनंच घर नक्की ठरवलं, इकडं तिकडं हिंडून फिरून ह्याचे त्याचे दोन चार कपडे शिवून देते. पण असं किती दिवस चालणार ? ''

बाजूला येऊन आक्का म्हणाल्या, '' माहीत आहे, ही आहे आमच्या अमक्याची मावशी. परम सुंदर अशा या दोघीजणी कॉलेजमध्ये शिकत होत्या. देशाची फाळणी झाली. दुष्टचक्रापुढं अब्रूनं राहाणं अशक्य होऊ लागलं. शेवटी सर्व चांगला धंदा सोडून, दोन्ही मुलींना घेऊन रातोरात आईवडील बेपत्ता झाले. आम्ही नाना तर्क करीत होतो. चांगली सुखवस्तू स्थिती होती यांची आणि आता पाहा काय झालं ! ''

आनंदमयी मांच्या आश्रमाच्या घाटावरच नौका मिळाली. दरडोई दोन आणे घेणार होते आणि पोचवणार होते दशाश्वमेघ घाटावर.

प्रवाहाच्या उलट दिशेने नौका निघाली. नावाडी दोन्ही हातांनी दोन बाजूंना वल्ही मारीत होते. झपाझप वल्ही पाण्यांत पडत होती आणि हळूहळू नौका पुढे जात होती. पलीकडचा तीर शांत आणि स्थिर; क्षितिज आकाशाने झाकलेले, जणू काही कोणत्यातरी रहस्यमय धुक्याचे आवरणच तिथे होते. फक्त राजवाड्यांतला एक तेजस्वी दिवा, एकाक्ष दानवाच्या एका डोळ्याप्रमाणे अंधारात जळत होता.

आकाशाच्या पार्श्वभूमीवर डोक्यावर हंसांचे थवे उडत होते; एखाददुसरा मागे पडत होता, पुन्हापुन्हा साद घालून पुढे गेलेल्यांची तो चाहूल घेत होता. नौकेच्या नाळेवर फक्त मी एकटीच होते. मी तो मार्ग शोधीत होते. रस्ता मिसळून जात होता, यात्रेकरूही मिसळून जात होते.

एक फुलांचा हार पाण्यात वाहात आला. कोणत्या देवतेचा हा हार, कुठं जाऊन पोचणार कोण जाणे !

स्नान करण्यासाठी घाटावर उतरल्यावर राजकन्येने फुलांच्या पाकळीत आपले केस घालून फूल पाण्यात सोडून दिले. देशदेशांतर पार करून प्रवाहावरोबर वाहात येऊन ते दुसऱ्या एका घाटावर राजपुत्राच्या छातीला लागले. राजपुत्राने फूल

उचलून घेतले. केसांची ती एक बट राजपुत्राला वेडे करते. केशवती राजकुमारीला तो शोधून काढतो.

हार धरण्यासाठी मी हात पुढे केला, संध्याचमेलीचा हार हलत डुलत माझ्या हातापासून दूर गेला.

गम् गम् आवाजाने चमकले. शहराच्या अगदी जवळ आलो होतो. घाटाघाटावर लोकांची गर्दी आणि आरतीचा ध्वनी, सजीव प्राण्यांचा स्वयंस्फूर्त आवाज, जोराचा कोलाहल चालला होता. असे वाटायला लागले जणू काही एखाद्या समाधीचा भंग होऊन बाजारात येऊन पडलो. कडेवरच्या मुलाला आईने जणू काही धपकन जमिनीवर उतरवले.

गगन महाराज म्हणाले, " ही पाहा पूररेषा. हे जे उंचावरचं मंदिर आहे. त्याच्यावर पांढरा डाग दिसतो ना, अठ्ठेचाळीस साली तिथपर्यंत पाणी चढलं होतं, शहर वाहून गेलं होतं, आमच्या आश्रमाच्या वाटेवर नौका चालवीत होते. त्यावरून कल्पना करा किती मोठा पूर आला होता.

खाली गंगेच्या पाण्यातले हे एक मोठे शिवमंदिर, सभामंडपासह छातीपर्यंतच्या पाण्यांत बुडून कलते झाले होते. हरघडी असे वाटते, की हे आता ढासळून पडणार. मी विचारले, " त्या पुरानंच असं झालं वाटतं ? "

" छे, तसं नाही. लहानपणापासून हे देऊळ याच अवस्थेत पाहतो आहे. आमच्या अगोदर ज्यांनी पाहिलं, तेही ही एकच कथा सांगतात. गोष्ट अशी आहे की कुणा एका माणसानं त्याच्या आईच्या नावानं मंदिर बांधून त्यात शिवमूर्तीची प्रतिष्ठापना केली आणि म्हणाला, " इतक्या दिवसांनी मी आईच्या ऋणाची परतफेड केली. " तो हे बोलल्यावर मंदिर खचलं. तेव्हापासून हे मंदिर असंच आहे. मागं इतका मोठा पूर आला होता. वाटेत येताना तुम्ही पाहिलंत ना, किनाऱ्यावरचे घाट किती ठिकाणी उद्ध्वस्त झाले आहेत. हजारो वाळूची पोती लावून पाणी अडवलंय पण हे मंदिर सुरुवातीला जितकं खचलं होतं, ते तसंच राहिलं, एक केसभरदेखील इकडचं तिकडं झालं नाही. "

हे ऐकून, ' मातृण अपरिशोध्य ', असे म्हणून व्रजरमणने दीर्घ नि:श्वास सोडला.

घाटावर उतरून आक्कांनी हातातोंडांना पाणी लावले. त्या म्हणाल्या, " तूही पाणी लाव, बरं वाटेल, अशी अगदी वाकून काय पाहातेस तिकडं ? "

सांगितले, ' तेच राखी रंगाचं मांजर. "

आजच सकाळी घाटावर स्नान करायला आलो तेव्हा पाहिले होते. एक भंगीण

फाटक्या साडीचा नक्षीदार काठ कमरेला बांधून मेलेल्या मांजराला ओढीत घेऊन चालली होती. या घाटाच्या लाकडी फळ्यांच्या फटीत ते आता अडकले होते.

घाटावर एका दुकानात विजेच्या दिव्याखाली गर्दी जमली होती.

फ्रेम केलेल्या दुर्गामातेच्या फोटोच्या पाठीमागे दुकानदारांनी कसले तरी यंत्र बसवले होते. यंत्र टक् टक् असे चालू व्हायचे आणि त्याच तालावर समोर दुर्गेची मान हलत होती, हातांतली तलवार हलत होती, मांडीवर उचलून ठेवलेले पाऊल हलत होते.

शेवटी विंध्याचलला जाण्याचे ठरले. जाता येता गाडी दिसताच आम्ही विचारीत होतो, " विंध्याचलला येणार ? काय घेणार ? " ही जणू एक सवयच झाली होती. आज गंगेवर स्नान आटोपून परत येत होतो, वाटेत एक रिकामी स्टेशनवॅगन दिसली. मी विचारले, " विंध्याचलला येणार ? " तो लगेच तयार झाला. परंतु ड्रायव्हर धरून फक्त सहाजण, त्यापेक्षा जास्त माणसे घ्यायला तो तयार नव्हता. तो म्हणाला, " गाडी इतकी मोठी आहे तेव्हा पुष्कळांना जाता येईल; परंतु पोलिसांनी पकडले तर कोण संभाळणार ? तुम्ही घ्याल जबाबदारी ?"

दादा म्हणाले, " राहू दे. राहू दे इतकं बोलायची गरज काय ? आपण कितीजण आहोत, तत्त्वानंद स्वामी आणि गिरिजा ब्रह्मचारीसुद्धा यायला मागत होते. त्यांना घेतले की होईल. "

आक्का म्हणाल्या, " आणि ते बारिसालहून एक स्वामीजी आले आहेत त्यांनाही आपल्या बरोबर यायचं होतं. "

चटकन् पळत जाऊन ओल्या कपड्यांचे गाठोडे व्हरांड्यातल्या दोरीला अडकवले आणि गाडीत येऊन बसले. वेळ बराच झाला होता. सूर्य जवळजवळ डोक्यावर आला होता. गरम हवेच्या झळांनी डोळ्यांची, तोंडाची लाही लाही होत होती. उंच-सखल रस्ता. फाटलेल्या गादीवर बसून हिंदकळत हिंदकळत चाललो होतो. खिडकीच्या काचा खडखड वाजत होत्या.

शहराच्या गजबजलेल्या वस्तीच्या शेवटाला होते बड्या लोकांचे मोठमोठे पडिक बंगले. दारे, खिडक्या मोडलेल्या, अंजिरांच्या झाडांनी भरलेली सारी जागा. हेही सर्व मागे टाकून खुल्या रस्त्यावर आलो. दोन्ही बाजूंना क्षितिजाला जाऊन मिळणारे मोठे मैदान होते. पिकून तयार झालेले धान्य कापून शेतकऱ्यांनी घरात भरून ठेवले

होते. रिकामी पडलेली शेते कडक उन्हाचे मृगजळ छातीवर बाळगून होती. जुन्या कडूनिंब, चिंच, अश्वत्थ या वृक्षांच्या सावलींनी रस्ता आच्छादलेला होता. त्या रस्त्यावरून आवाज काढीत मोटर चालली होती.

डोळ्यांवर झापड आली. डोके मागे टेकून बसले. पाय लांब केले आणि आळसात पडून राहिले.

महुआ फुलांचा वास येत होता बहुतेक! म्हणजे महुआ फुलायला सुरुवात झाली तर?

आमच्या आश्रमात या सुमारास महुआ झाडाखाली किती गर्दी जमते. ताज्या महुआ फुलांनी झाडाखालची जागा झाकून जाते. पहाट झाली नाही तोच संताळ नावाड्यांच्या बायका येऊन गोळा करतात आणि ओटी भरभरून घेऊन जातात. ताजी ताजी खाऊन जी शिल्लक राहतात ती उन्हात वाळवून ठेवून देतात. अडीअडचणीला खाण्यात जास्त सुख.

परंतु इतक्यातच महुआची फुले फुलायला सुरुवात झाली? म्हणजे परत गेल्यावर साल वृक्षाची फुलेसुद्धा नाही मिळायची. ही एकाच वेळी फुटतात. परत जाई-जाईपर्यंतच फुलांचा बहर, फुलांचा सडा, सर्व संपून जाईल. इथे येण्याच्या पूर्वी साल वृक्षांनी आच्छादलेल्या रस्त्याने जाताना मी पाहिले होते, एक नावाडीण (मेझेन) बांबूला कोयता बांधून हिरव्या पानांसकट साल वृक्षाच्या फांद्या कडाकड तोडीत होती. वाळलेल्या चुयांनी जोडून पानांच्या पत्रावळी करतात. मी तिला धमकावले, " मेझेन, काय करतेस? आणखी थोड्याच दिवसांनी फुलं येतील, समोरच्या फांद्या अशा का तोडायच्या असतात? पानंच हवी असली तर जाऊन घेना आतल्या झाडावरची. "

फुलांच्या मोसमात सालवृक्षाच्छादित मार्ग काय सुंदर दिसतो! फुलांच्या पाकळ्यांनी वृक्षतल भरून जातो; जणू काही कातरलेल्या लोकरीची पांढरी जाड गादीच. लाल कंकरावर पसरलेली दिसते. भ्रमरांचे गुणगुणणे, फुलांचा सुगंध, वाऱ्याने पडणारा नाजूक पाकळ्यांचा सडा ...... तो एक दिवसरात्रीचा मोठा उत्सवच! मन वेडावून टाकणारे गोड सुरांचे कीर्तनच!!

जेव्हा परत जाईन तेव्हा आपले सर्वस्व अर्पण करून, कडक ऊन डोक्यावर घेऊन, सुसाट वारा अंगावर घेत उभी राहिलेली झाडे फक्त दिसतील. लाल धुळीमध्ये पाने पसरलेली असतील. गेल्यावर काय फक्त हेच मिळणार ना?

तसे का ? रस्त्याच्या वळणावळणावर मधुमालती आहे. घरी अंगणात मोगरा आहे. वाऱ्याच्या झुळुकांबरोबर मुचकुंद आमंत्रण देईल. काळजी कसली ?

ओलसर वारा तोंडाला स्पर्शून गेला. डोळे उघडून पाहिले. गंगेवरून गाडी चालली होती. सावकाश, सावधानपूर्वक.

लोखंडी खांबावर बांधलेला हा पूल, दर वर्षी पावसाळ्यात हा सोडवून ठेवतात आणि पाणी कमी झाल्यावर पुन्हा जोडतात. पलीकडे मिरजापूर शहर आणि त्याच्याही पुढं विंध्याचल !

गंगेचे पाणी किती स्वच्छ ! कसे खळाळत वाहात होते. एक हरिद्वारशिवाय अशी गंगा आणखी पाहिली नव्हती. आनंदाने ओतप्रोत भरून चाललेल्या प्रवाहाचा झंकार काशीच्या गंगेत नव्हता. सर्व काही वाहून नेण्याची गतीही तिच्यात नव्हती. ती जणू काही सहनशील, प्रेमळ, हृदयाशी कवटाळून धरणारी, शांत गंभीर, आई होती.

आक्का म्हणाल्या, " चला. आधी विंध्याचलच्या गंगेला स्पर्श करू या. "

मी म्हणाले, " नुसता स्पर्श नाही, डोकं बुडवून स्नानच करणार. "

परंतु बरोबर तर जास्त कपडे आणले नव्हते. जाऊ दे. इतके दिवस इतक्या घाटांवर स्नान केलं, इतक्या लोकांचं स्नान पाहिलं, त्यांची स्नानाची पद्धतच आज आपणही अमलात आणावी झालं !

पाण्यात झेप घेतली. काय छान वाटलं ! उन्हाचा ताप कमी झाला.

आक्का म्हणाल्या, " अंग कशानं पुसायचं ? "

सांगितले, " पुसायची काय गरज ? गरम वाऱ्यानं अंगावरचं पाणी अंगावर आपोआपच सुकेल पाहा. "

आमचं पाहून दादा वगैरेसुद्धा पाण्यात उतरले. ते म्हणाले, " या उन्हाळ्यात थंड पाण्याचा लोभ आवरणं फार कठीण. "

स्नानानंतर जिच्यासाठी आज एवढी धडपड करून आलो होतो, त्या विंध्य-वासिनीच्या दर्शनासाठी निघालो. सगळी गर्दी एकाच दिशेने धावत होती आणि दुसऱ्या रस्त्याने परतत होती. रस्त्याच्या दोन्ही कडांना जत्रा भरली होती. ओळी ओळींनी दुकाने होती. मधली अरुंद वाट जाता जाता शेवटी एकदम विंध्यवासि-नीच्या मंदिरासमोर जाऊन संपली होती. वडीलधाऱ्या अशा एका पंड्याची मदत घ्यावी लागली, तो आम्हांला मंदिराकडे घेऊन गेला. वरती जाऊन आम्हांला भिंती-जवळ उभे करून दोन्ही हातांनी तो गर्दी बाजूला करीत राहिला.

लहानसा दरवाजा, लोक मस्तक झुकवून ढकलाढकली करीत आत शिरत होते.

दणकट स्वयंसेवक पंडचे गर्दी आवरता आवरता एकमेकांच्या अंगांवर पडत होते. वारा वेडयासारखा वाहात होता. जणू काही त्याला थांबवणे इथे कुणालाही शक्यच नव्हते ? तुमुल तांडव, कोण कोणाला संभाळणार ? लोक घामाने डबडबून आत जात होते आणि प्राण कंठाशी आल्यासारखे लालेलाल होऊन बाहेर येत होते. आत काय जळत होते ? विचार केला तर भीती वाटत होती. आत गेल्यावर पुन्हा जिवंत बाहेर येता येईल का ?

गुडघे वाकवून डोकावून पाहिले. लहानशा खोलीमध्ये पायांच्या जोडचा ठासून भरल्या होत्या. काळे, पांढरे, कडक, नरम, सलवार घातलेले, साखळचा घातलेले पायच पाय ! हळूहळू पुढे जायच्या प्रयत्नात मागे पुढे होत होते; डावीकडे, उजवीकडे झोकांडचा खात होते.

देवीजवळ जायचे तर दूरच राहिले, दुरूनही देवीचे दर्शन लोकांना मिळत नव्हते. कसेवसे एकदा मंदिरात शिरता आले हेच समाधान मानून ते परतत होते.

देवीच्या दारी ही कसली विटंबना ? लोकांच्या इतक्या आशा-आकांक्षा. अगदी असे न देण्यासारखे काय असणार ? थोडे दर्शन, एकदा पायाला स्पर्श करून आपला भक्तिभाव देवीपुढे प्रकट करायचा, एवढेच तर ते लोक मागतात. त्यात इतकी कशाला आडकाठी ? भिंतीपुढे भिंत बांधून हा आडोसा कशाला हवा ?

अगबाई ! या खोलीमध्ये केव्हाच सर्व येऊन पोचलो होतो. फक्त खोलीच नव्हती. खोलीच्या आत कोपऱ्यात आणखी एक खोली, पितळी गज असलेली. आणि त्याच्या आत विंध्यवासिनी. तिच्या समोर येऊन उभे राहिलो.

साडी फुलांनी झाकलेली मूर्ती, चाचपडून चाचपडून आक्का देवीचे पाय शोधीत होत्या.

मूर्ती दिसतच नव्हती, तोंडाच्या भागावर नाकासारखे असे काहीतरी वाटत होते. ही कुणा मूर्तिकाराने तयार केलेली मूर्ती नव्हती. स्वतःच प्रकट झालेली स्वयंभू देवी !

जसे आत गेलो होतो तसेच शांतपणे बाहेर पडलो.

आक्का आनंदाने वेडावून गेल्या होत्या. त्या म्हणाल्या, " राणी ग, आज कुणाच्या पुण्याईनं घडलं ? देवीच्या पायांना स्पर्श करून आलो, अंगाला एवढंसंदेखील खरचटलंसुद्धा नाही. "

मी म्हणाले, " माझ्या पुण्याईनं खासच नव्हे, मी आपली तारक भट्टाचार्यांची धाकटी आई ! "

तारक भट्टाचार्यांना दोन आया होत्या. त्यांच्या वडिलांनी परप्रांतातल्या सासऱ्या-बरोबर भांडण करून नंतर मग धाकट्या आईबरोबर लग्न केले होते. त्या धाकट्या आईला दुली नावाची एकुलती एक मुलगी होती. वर्ष झाले नाही तोच नोया[1]-शेंदूर पुसून ती माहेरी माघारी आली. शेजाऱ्या-पाजाऱ्यांच्या गळ्यात पडून छोटी मा धायधाय रडायची, 'ताई ग, हे काय झालं माझं.' ताई सांत्वन करायची, 'तुम्ही काय करणार ? जसं ज्याचं नशीब. नशिबाच्या आड कोण येणार ? दुलीच्या नशिबी दुःख आहे. तुम्ही रडून का ते कमी करू शकणार ? त्यापेक्षा हृदय घट्ट करा, मुलीकडे पाहून स्वतःला सावरा. तिचं नशीब फुटकं त्याला कोण काय करणार ? नाही तर हेच पाहा ना, तुम्ही या पांढऱ्या केसांत अजूनही शेंदूर भरता. छोटी मा म्हणाली, " अग ताई, ते माझ्या नशिबामुळ नव्हे. माझा जन्म तर घोर अमावस्येच्या दिवशी झाला होता. सर्वजण म्हणाले होते. लग्नाच्या रात्रीच ही मुलगी विधवा होईल म्हणून. मी पण अजून शेंदूर लावतेय. ते माझ्या सवतीच्या नशिबाच्या जोरावरच."

मंदिराच्या बाहेर. एका बाजूला यज्ञकुंडामध्ये सात हवन चालले होते. आज पूर्णाहुती, भस्माचे स्तूप जमले होते, जसे काही सात देवळांचे सात कळसच. मातीची हंडी विकत घेऊन त्यात सात हवनांचं भस्म घेतलं.

आक्का म्हणाल्या, " गावाला, देशाला या गोष्टी अडीअडचणीला उपयोगी पडतात."

शेजारीच दुसऱ्या एका मातीच्या ढिगाऱ्यावर एक मोठं कडुनिंबाचं झाड होतं; त्यांच्या बुंध्याशी पुरलेल्या बांबूच्या खुंटांनी सर्व झाड अगदी लपून गेलं होतं. त्याच्यावर लाल झेंडा फडकत होता.

पंड्या म्हणाला, " इथं नमस्कार करा. नवरात्रात देवी इथं येऊन या झेंड्यावर राहाते."

दादा म्हणाले, " अरेरे, मग इतका त्रास करून आत कशाला गेलो ? आत आम्हांला आईचं दर्शन झालंच नाही की काय ? "

पंड्याने तत्परतेने उत्तर दिले, " छे, छे, तुम्हांला दर्शन झालं की ! जरा अगो-दरच दशमी लागली ना ! आई मंदिरात परत गेल्या आहेत."

---

१. नोया – लोखंडी बांगडी. बंगालमध्ये विवाहानंतर प्रत्येक सुवासिनी हातात लोखंडी बांगडी घालते.

देवीचं दर्शन घडवून द्यायचं असा पंड्याबरोबर आमचा करार ठरला होता.

त्यांचे बोलणे ऐकून दादा हसले आणि मागे वळून त्यांनी आक्कांकडे पाहिले. तेवढ्यात आक्का झाडाखाली बोटांनी उकरायला लागल्या होत्या. त्यांना थोडी माती घ्यायची होती.

अडीच मैल अंतरावर, डोंगरावर अष्टभुजा देवीचे मंदिर होते.

विंध्याचलला तीन कोपऱ्यांत तीन देवी अधिष्ठित आहेत. तिघीही एकमेकींपासून अडीच मैल दूर होत्या. आक्कांच्या भावाने पाहिले असते तर म्हणाले असते, " किती शहाण्या बायका ! "

तीन देवी – विंध्यवासिनी, अष्टभुजा आणि भोगमाया ! एकीला पाहिले की दुसरीला पाहावेच लागते नाहीतर त्या कोपतात म्हणे. एवढा त्रास करून आलो आहोत, कुणाला दुखवायची काय गरज ?

उभट जिन्यावरून चढत चढत वर गेलो. छाती भरून येत होती. मी मधूनमधून थांबून मागे वळून दूरचे दृश्य पाहात होते. बरोबरच्या लोकांना सांगत होते, "बघून घ्या, या हिरव्यागार जंगलामध्ये वाळूचा चर भेदून निळी गंगा कशी वळणे घेत जात आहे. गंगेऐवजी यमुना असती तरी शोभलं असतं. "

घनदाट जंगलामध्ये उंच पहाड आणि त्याच्यावर देवीचे मंदिर. ठराविक तिथी–उत्सवाला लोकांची गर्दी होते. एरवी कोण येतं उगीच ? लोकवस्ती मुळीच नव्हती, जवळपास तर कुणीच दिसले नाही. असे ऐकले होते की, आनंदमयी ' मां'चा आश्रम या पहाडावर होता. त्या बहुतेक इथेच राहायच्या. म्हणजे, त्या बाजूला डोंगराला अगदी लागून ते जे सुंदर घर दिसतंय तेच का त्यांचं ? राहायला योग्य अशीच मनोरम जागा होती ती. किती दूरपर्यंत नजर पोचत होती. सोडून देता आले असते तर कोणताही अडथळा न येता मनही सरळ तिथवर गेले असते.

मंदिरातील घंटानाद ऐकू येत होता; आणि वाटत होते आता पोचायला उशीर नाही लागणार. उत्साहाने पटापट पायऱ्या चढत होतो, अष्टभुजेच्या दारात हजर झालो, डोंगरामध्ये गुहा आणि गुहेमध्ये देवी ! बैठे, बसके आणि गुडुप अंधाराचे देऊळ ! कमरेपर्यंत वाकावे लागत होते. गुडघ्यावर छाती टेकत होती. पावला पावलांनी पुढे जाता जाता गुहेच्या शेवटपर्यंत जाऊन पोचलो. सरळ होऊन उभे राहायची सोय नव्हती. त्या स्थितीतच मान वर केली. एकमेव पणती, तिच्याच उजेडात अष्टभुजेची मूर्ती दिसली. काळी, रूपवान मुलगीच जणू. आईने भीतीने या

काळ्या दगडांमध्ये, इथे या अंधाऱ्या कोपऱ्यात फार काळजीपूर्वक लपवून ठेवलेली. आक्का म्हणाल्या, " पूर्व बंगालमध्ये आमचीही अशीच अवस्था असते. "

दिव्याच्या ज्योतीची गुहेच्या दगडावर चढलेली काजळी बोटाने घेऊन मी बाहेर आले आणि डोळ्यात काजळ घातले, डोळ्यांची आग झाली आणि डोळे पाण्यांनी डबडबले.

आता डोंगराच्या अगदी दुसऱ्या टोकाला राहिली योगमाया. तिकडे जायला फक्त दोन वाटा आहेत. एक खालचा कच्चा रस्ता आणि दुसरा डोंगराच्या शिखरा-शिखरांवरून जाणारा. इतके वर चढलो पुन्हा खाली उतरून कच्चा रस्ता धरायचा? वरच्या रस्त्यानंच जाऊ या चला. चालत तर होतो. पण रस्ता काही संपत नव्हता. तहानेने घसा कोरडा पडला. थोडे पाणी कुठे मिळाले तर ? दूर दोन-एक घरे दिसत होती. एके काळी काही श्रीमंत लोक इथे हौसेने राहिले असतील. गिरिजा ब्रह्मचारी म्हणाल्या, " पाण्याचीच तर पंचाईत, डोंगराच्या अगदी वर पाणी कुठून असणार ? या खालच्या गंगेतूनच हे पाणी आणीत असणार नक्की. "

दगड पडलेल्या रस्त्यावर मी ठेच खाल्ली. झाडाची सावली पाहून खाली बसले. वाळलेले गवत तोंडीत चाळा करीत राहिले. उठून पुन्हा चालायला लागले.

दूर गर्दी करून उभे असलेले काही लोक दिसले, काय आहे तिथे ? जाऊन पाहिले तर खरोखरच एक बांधून काढलेली मोठी विहीर ! शेजारीच दुधाचे, पेढ्याचे छोटेसे दुकान. यात्रेकरू इथे येतात अश्वत्थ वृक्षाखाली बसतात, पाणी पितात, मिठाई खातात, विश्रांती घेतात.

दोन उत्तर हिंदुस्थानी – जुळे असतील नाहीतर पाठोपाठचे भाऊ असतील – अगदी सारखे दिसायला. एकाच तऱ्हेचा पातळ सदरा घातलेले, चांगले धडधाकट, अतिशय साम्य असलेले. साधारण माझ्याच वयाचे असतील. पितळी कळशीला दोरी बांधून विहिरीतून पाणी काढीत होते.

जवळ जाऊन विचारले, " यह पानी अच्छा है ? "

पाणी काढता काढता मान हलवीत मोठ्याने म्हणाले, " उंहू, फार खारट आहे. "

खारट ! खारट आहे तर मग ते कशाला काढताहेत ? बावळटासारखी मी त्यांच्या तोंडांकडे पाहात राहिले. दुसरा भाऊ बारीक मिश्यांच्या आड ओठांतल्या ओठांत हसत होता. थकलेल्या शरीराला विनोदसुद्धा कळत नाही हे पाहून मी खजिल झाले. कळशीभर पाणी काढून आधीचा भाऊ म्हणाला, " तीर्थयात्रेला निघालात,

या विहिरीचं पाणी प्याला नाहीत तर तीर्थयात्रा कशी होणार ? सर्वांनाच प्यायला लागतं ते. असं गोड पाणी अन्यत्र कुठंही नाही."

दोन्ही हातांची ओंजळ करून ओठांजवळ धरली, त्याने माझ्या ओंजळीत पाणी घातले. घटाघट पिऊन सर्व पाणी संपवले. आणखी एक कळशीभर पाणी त्याने काढून दिले, डोक्यावर थापले आणि हातपाय धुतले.

तो म्हणाला, " आणखी देऊ ?"

मी म्हणाले, " नको, आणखी नको."

पाणी पाल्यावर शांत वाटले. त्याच्या तोंडावर समाधान दिसले.

साऱ्या रस्ताभर त्याच्या चेहऱ्यावरचा समाधानाचा भावच माझ्या डोळ्यांसमोर येत होता. कशामुळे असे होते ?

पुन्हा चालायला लागलो. एक जोडपे डोंगराच्या खालपासूनच आमच्याबरोबर येत होते. काळा, आडदांड, प्रौढ दिसणारा गोल गरगरित डोळे असलेला हिरव्या मोज्यावर पंपशू चढवलेला नवरा दाणदाण चालत होता. त्याची अशक्त कृश गृहिणी त्याच्या बरोबरीने चालू शकत नव्हती. कशीबशी धावत धावत येऊन तिने आक्कांचा पदर धरला. ती म्हणाली, " मला का कमी चालता येत होतं ? काय तब्येत होती माझी ! आता वयही बावन झालंय आणि त्याशिवाय–"

मी विचारले, " वय किती म्हणालात ? बावन म्हणजे का वय झालं ? माझंच तर बावन आहे."

आक्का उत्तेजन देत म्हणाल्या, " चला, लांब, लांब पावलं टाकीत चला. आपण लहान आहात. मला पाहताय ना ? माझं वय तर बासष्ट आहे !"

त्या बाईने आमच्याकडे नीट न्याहाळून पाहिले, आणि ती म्हणाली, " तरीसुद्धा त्या मानानं तुम्ही किती तरुण दिसता. माझे दात पडल्यामुळंच मी त्रस्त झाले आहे. म्हणून तर ह्यांना म्हणते, दात गेले म्हणजे माणसाचं सर्वस्व जातं."

अलाहाबादहून काही विधवा-सधवा बायकांचे एक पथक आले होते. आजच रात्रीच्या गाडीने परत जाणार होत्या. बंगाली पाहून त्या आमच्यात सामील झाल्या होत्या.

आक्कांनी गप्पा सुरू केल्या, " तुम्ही कोणच्या गावच्या ग ?"

समोरचा एक दात पडलेली श्यामल वर्णाची प्रौढ विधवा म्हणाली, " आम्ही सर्व वेगवेगळ्या गावच्या आहोत. त्या यशोरच्या, या मैमनसिंगच्या, त्या कुमिल्ल्याच्या, मी बरिशालची. "

आक्का म्हणाल्या, " बाई ग, काय अवस्था झालीय हल्ली बरिशालची ! काल पूर्णानंदस्वामी बरिशालहून आले; त्यांच्याकडून ज्या काही गोष्टी ऐकल्या– देवा, देवा रे सगळा हाहाकार ! काहीसुद्धा बाकी राहिलं नाही. जमिनीवरून रक्ताचे पाट वाहात गेले. आम्ही पूर्व बंगालची माणसं पण आमचे व्यापार उद्योग सगळीकडेच आहेत. आप्तेष्ट, कुटुंबीय सर्व ठिकाणी पसरले आहेत. ' अमूक ' मित्राकडची जी घटना ऐकली तिनं अंगावर काटाच उभा राहातो. गुंडांनी घराला वेढा दिला. तेव्हा तिथून निसटून जायला मार्ग राहिला नाही तेव्हा प्रौढ कुमारी मुली ओरडून म्हणाल्या, " बाबा, आम्हांला त्यांच्या हाती लागू देऊ नका. त्या आधीच स्वतःच्या हातांनी मारून टाका." गुंड आत घुसले, वडिलांनी घाईघाईने कुऱ्हाड उचलली अन दोन्ही मुलींच्या मानांवर घाव घातले. बापासारखा बाप ! पण मुलींच्या जिवाशी पशूपेक्षाही अधमपणे ते गुंड खेळतील हे पाहून त्याने बरोबर काम केले."

पदराने डोळे पुसत विधवा म्हणाली, " आणि काय सांगू, सोन्यासारखं घरदार सर्वांवर पाणी सोडून निघून आलो. त्यातसुद्धा कमी का दुःख झालं ?"

योगमायेचे मंदिर पहाडाच्या खाली होते. पायऱ्या पायऱ्यांनी जिना उतरून मंदिराच्या जवळ गेलो. काय विचित्र मूर्ती ! लाल कापडाने झाकलेला काळा दगड, नाक नाही, डोळे नाही, फक्त शेंदूर फासलेले ओठ पसरून वर पाहात असणारा एक 'आ' होता. जणू काही गुहेतील एक बोगदाच. सर्वग्रासी, भयंकर असा भाव, असह्य दृश्य.

पंडचे मागे लागले, ' इतकं द्या ', ' तितकं द्या ', ' प्रणामी द्या ', मी हाताने आक्कांकडे खूण केली अन तिथून सटकले. त्यांच्याकडेच जाऊ द्या यांना. आक्कांना धैर्य आहे. या देवीलासुद्धा त्या ' आई ' म्हणूनच हाक मारतील.

आता कोणत्या वाटेने परत जायचे ? उताराचा रस्ता तर अनोळखी. शिवाय गाडी होती अष्टभुजा मंदिराच्या खाली ! दादा म्हणाले, " पहिल्याच रस्त्यानं चला; परिचित रस्ता दूरचा वाटत नाही."

गुडघे मोडायला आले. दोन्ही हातांनी गुडघे दाबीत दाबीत पायऱ्या मोजीत होते.

ओळखीच्या फुलांचा मृदू गंध. दोन्ही बाजूला हिरवी गार झुडुपे; पण फुलं कुठं होती ? जोराने श्वास घेतला. हा तर माझा, अगदी माझाच, माझ्या फार दिवसांचा ओळखीचा वास, कोणते फूल ते ? पुन्हा जोराने वास घेतला, ओहो ! ही तर आमच्या घरच्या कोपऱ्यांतली रानजुई ! किती वर्षे ती आमच्याकडे आहे. चुकणार का मी ओळखायला !

मी म्हणाले, "आक्का ही रानजुईचीच झुडपं. लहान लहान ताऱ्यांसारखी मिरचीच्या फुलांपेक्षाही लहान असलेली त्यांची पांढरी फुलं पानांच्या आड लपून वाटसरूंना धुंद करतात."

मोटरीत येऊन बसलो. तत्त्वानंदस्वामी म्हणाले, "मोठ्या शुभ दिवशी; शुभ मुहूर्तावर आम्हांला देवीदर्शन झालं. नवरात्र, नवमी आणि मंगळवार – शुभ योगायोग."

तोच रस्ता, तोच घाट, तोच पूल, तेच मैदान. पुन्हा सर्व पार करीत चाललो होतो. नवमीचे चांदणे, दग्दिगन्तापर्यंत शुभ्र प्रकाश शिपला होता. झाडांच्या काळ्या सावलीच्या फटीफटीतून तो प्रकाश खळाळून हसत क्षणात मागे धावत जात होता. मैदानामागून मैदाने खेळात धुंद होऊन नाचत बागडत जात होती. काय अपूर्व शोभा होती! उधाण आलेल्या मनांत खुशीची भरती येत होती. स्वप्नपुरीतून आनंदाने चाललो होतो, मोटरचा 'भों भों' आवाज भ्रमरांच्या गुंजनासारखा वाटत होता.

दिवस निघून गेले. इतक्या दिवसांनंतर सामानसुमान गोळा केले. गावाहून पुन्हा कडक पत्र आलं. निर्वासितांनी सगळे शहर, गाव भरून गेले आहे. ते कुठे राहणार, काय खाणार, सर्व व्यवस्था करायला दादा-आक्कांनी येणे फार जरुरी आहे. लवकर जायला हवे.

बातमी टाळायचे म्हटले तरी टाळता येणे शक्य नव्हते. मनामध्ये दबून राहिलेली अस्वस्थता बेचैन करीत होती.

दादा म्हणाले, "अशा या मनस्थितीत कुठल्या तीर्थाला फिरत बसणार? चला त्यापेक्षा परतच जाऊ या."

आक्का म्हणाल्या, "तर मग चटकन जाऊन पुन्हा एकदा विश्वनाथाचं दर्शन घेऊन येऊ."

फक्त विश्वनाथच नाही, वाटेत काली, रक्षाकाली, कात्यायनी, भद्रकाली कुणी सुटत नाही, आज जणू सर्व पुजाऱ्यांबरोबर आक्कांची नव्यानेच ओळख झाली होती. सर्वांना त्या घरादाराचे कुशल विचारीत होत्या, कोणत्या ना कोणत्या निमित्ताने देवाच्या दारी त्या जास्तीत जास्त वेळ काढीत होत्या.

विश्वनाथाच्या मंदिरात आजसुद्धा ती तशी गर्दी होती. पूर्वीसारखेच स्नान झाल्यावर गर्दीमध्ये एक दुसऱ्याच्या डोक्यावरून हात पुढे करून विश्वनाथाच्या

डोक्यावर पाणी घालून जात होता. " हर हर बम बम, या आवाजाची दुंदुभी गर्जत होती. 'देवा', म्हणून सारखी हाक चालली होती. त्यात खंड म्हणून नव्हताच, ऑफिस-कचेरीची घाई. लोक ओला पंचा खांद्यावर टाकून जोरात आवाज करीत फिरत होते, चारी दारांवर डोके ठेवून 'बाबा' म्हणून हाक मारीत होते. गर्दीतून डोके वर काढून गर्दीमध्ये लपलेल्या विश्वनाथाचे दर्शन घेत होते. आत जायला वेळ नव्हता. बाहेरच भिंतीला डोके टेकून 'बाबा' म्हणत होते. बाहेर जाता जाता मान फिरवून सोन्याचा कळस पाहून जोराने ओरडत होते—'बाबा'. जणू काही तिसऱ्या मजल्यावरच्या बाबाला बोलावून सांगून जात होते. 'चाललो मी.'

फुलवाला फुले विकण्यात दंग होता. हिशोबाने दोन पैशांची, चार पैशांची फुल-पत्री यात्रेकरूंच्या हातांत देता देता एखादी जास्त होती ती पाकळी तो ओढून काढून घेऊन ठेवीत होता.

वय झाल्यामुळे कंबर वाकलेली एक म्हातारी वाकून काहीतरी शोधीत होती. लोकांच्या परडीतून दोन एक पाने फुले जी काय जमिनीवर पडत, ती उचलून ती पदरात ठेवीत होती, फुलपत्री झाली, आता दोन तुळशीपत्रे मिळाली की झाले! फुलवाल्यासमोर हात पसरताच त्याने तिला हाकलले. जवळची काठी उचलून त्याने ती सप्दिशी हवेतच मारली.

इकडे तिकडे पाहात पाहात पुढे चालली होती. पुन्हा पुन्हा मनात येत होते. परत जावे आणि दोन पैशांची फुले-तुळशी म्हातारीला विकत घेऊन द्यावीत. विचार करीत करीतच म्हातारीला मागे टाकून पुढे गेले.

दोन्ही बाजूंच्या सजवलेल्या दुकानांतून लाकडाची खेळणी विकत घेतली, दगडचा, पितळी बश्या, विडयाच्या पानांना चुना लावायचा छोटा चमचा, काळ्या दोऱ्याचा गंडा, सेल्युलॉइडच्या टिकल्या, तंबाखू, हे सर्व विकत घेऊन पिशवी जड करून बाहेर आले.

गल्लीच्या वळणावर श्रीपंड्याने अडवले. तो म्हणाला, " थांबा, जाऊ नका, तुमचं अजून थोडं काम शिल्लक आहे." असे बोलून तो तडक दुकानाच्या फळ्या लावून बांधलेल्या माच्यावर जाऊन बसला; आणि त्याने त्याचे पाय पुढे केले. तो म्हणाला, " आधी माझ्या पायाला हात लावून मला नमस्कार करा. मी परवानगी देईन तेव्हा ना तुम्ही जाणार."

दोहो बाजूंना अरुंद बोळाच्या भिंतींना टेकून भिकारणी, वैष्णवी, संन्यासनी, ओळी ओळीने बसल्या होत्या.

डफ वाजवीत वाजवीत संन्यासिनीला कोपरखळी मारून वैष्णवी म्हणाली, " गप्प का बसून राहिलीस ? गाणं म्हण." असे बोलून तिने स्वतःच गायला सुरुवात केली.

दादा-आक्कांचा नमस्कार करून झाला होता, मीही नमस्कार केला. श्रीपंड्यानं दोन्ही हात माझ्या खांद्यावर ठेवले व तो म्हणाला, " उठू नका, मी तुमचा तीर्थ-क्षेत्रीचा गुरू. मला विचारा–माझी तीर्थयात्रा परिपूर्ण झाली का ? "

फार छान वाटले, क्षणात मन कसे बदलून गेले. जमिनीवर डोके टेकून मी जोरात विचारले, " माझी तीर्थयात्रा परिपूर्ण झाली का ? "

खांद्यावरचे हात काढून घेऊन श्रीपंड्या म्हणाला, " हो तुमची यात्रा परिपूर्ण झाली. आता तुम्हांला तुमच्या देशी परत जाता येईल. "

तो लठ्ठ लाल कुत्रा चौकाच्या मध्ये पडल्या पडल्या झोप घेत होता. रिक्षा बाजूने जात होत्या. सायकली वळून जात होत्या, लोक ओलांडून चालायला लागायचे. पण त्याचे मुळीसुद्धा लक्ष नव्हते, डोळे अर्धवट उघडे दिसत होते आणि निश्चित मनाने तो दीर्घ श्वास घेत होता.

भट्टाचार्य महाशयांबरोबर भेट झाली. महापंडित ते ! मंदिर-प्रतिष्ठापनेच्या निमित्ताने ते पाटण्याला गेले होते. कालच परत आले होते.

दादांनी नमस्कार करून निरोप घेतला. ते म्हणाले, " निघालो, त्याची कृपा असू दे असा आशीर्वाद द्या."

भट्टाचार्यमहाशय जाण्यासाठी दोन पावले पुढे गेले होते, ते परत उभे राहिले; आणि म्हणाले, " काय म्हणालात आपण ? कृपा ? परमेश्वराची कृपा म्हणजे असा एखादा जिन्नस का आहे जो लाडूसारखा उचलून दिला तर पाहता येईल ? कृपा झाली नाही का ? हे जे इतके देश फिरून आलात, इतके सर्व पाहून आलात, माहिती करून आलात, अंगाला जरासे तरी खरचटले का ? ही काय त्याची कृपा नाही ?"

दादांनी मान हलवली. त्यांच्या तोंडावर आनंदाची प्रभा फाकली, आणखी एकदा पंडित महाशयांना नमस्कार करून ते म्हणाले, " परमेश्वर पावलोपावली डोळ्यात बोट घालून समजावून सांगत असतो. पण आम्हांलाच समजत नाही.

वेळ फार नव्हता, गाडीची शिटी होताच लोक धावले. आगगाडीचे तिकिट अगो-दरच काढलेले होते. अगदी वेळेवर स्टेशनवर गेले तरी आम्हांला चालण्यासारखे

होते. मी आक्कांना म्हटले, " गाडीत सामान ठेवीत आहात तेवढ्यात येईन. धावत जाऊन दुर्गाप्रसादांना नमस्कार करून येते."

श्रीमांचे चिरंजीव दुर्गाप्रसाद व्हरांड्यात बसले होते. वाटेत येताना मी पाहिले होते, हुबेहूब गुरुदेवांचा चेहरा, इतके साम्य फार थोडे पाहायला मिळते, आणखी थोडे उंच असते तर अजिबात फरक वाटला नसता.

मोटरचा हॉर्न वाजला. दुर्गाप्रसादांनी दोन्ही हात माझ्या डोक्यावर ठेवले. त्यांची पदधूली घेऊन मी गाडीत येऊन बसले. भोलामामांनी काय काय आणून माझ्या हातात कोंबले, मोटर निघाली आणि रस्त्याला लागली.

मी मूठ उघडून पाहिले, सुन्दर मुलीचा चेहरा असलेला, हिमानी स्नोची जाहिरात छापलेला एक गुलाबी ब्लॉटिंग पेपर; मासिकातून कापलेले विरजा-नंदाचे एक चित्र आणि फाटक्या पाकिटात गुंडाळलेला एक मॅग्नोलिआ–आजच बागेत फुलला होता. कदाचित सर्वांच्या नजरेपासून त्यांनी लपवून ठेवला असावा.

आकाशात काळा धूर सोडीत भक्भक् करीत आगगाडी चालली होती. पुन्हा खिडकीजवळ हातावर डोके टेकून बसले होते. मनात विचार करीत होते, सीताराम-दास म्हणाले होते, " प्रवाहात नौका सोडलीय तेव्हा लाटांच्या धक्क्यांनी नौका क्षणाक्षणाला हलणारच पण वल्ह्यानं वल्हवून पुढं जायलाच हवं. थांबून चालणार नाही."

पाहाता पहाता स्वतःच्या देशाला येऊन पोचलो, शेताच्या बाजूंनी शेतकऱ्यांची घरे दिसत होती. लहान लहान गुराखी गाई राखीत होते. दिवसाच्या मजुरी कामाच्या शोधात नावाडिणी (मेझेन) रस्त्यावरून चालल्या होत्या, बांबूला लावलेल्या झोळीत ठेवलेले मूल चालण्याच्या तालावर हलत होते. उजेडामध्ये पांढऱ्या नदीची पांढरी वाळू चकाकत होती. आता आणखी थोडेसे अंतर, त्यानंतर विरामच !

अभिजित हसत येऊन समोर उभा राहील. आता तो मोठा झाला आहे. सामान सांभाळून, रस्ता नीट दाखवून तो आईला आत घेऊन जाईल.

मला आठवले, मी मैत्रिणीला विचारले होते, " सखे, जो हिशोब विसरण्यासाठी तुम्ही बाहेर निघाला होता, तो विसरता आला का ? "

" कुठं विसरता आला ? " असे उत्तर देऊन अतिशय करुणपणे हसत त्या गाऊ लागल्या होत्या.

